# भारतीय साम्राज्य.

नारायण भवानराव पावगी.

यानें रचिलें असे.

तें

पुणें येथें "सत्यप्रकाश" छापखान्यांत छापिलें.

शके १८१९

विजयनाम संवत्सरे.



किंमत १४ आणे.

श्री

# सद्गुरु चरणारविंदीं

नमन करून

ही

ग्रंथरूपी

यथाशक्ति व यथामति केलेली

अत्यल्प

# देशसेवा.

## नारायण भवानराव पावगी

यानें

आपल्या दयितआर्यभूमीच्या ठिकाणीं

असलेल्या अत्युत्कट

## प्रीत्यर्थ

सकल

आर्यभगिनींस व आर्यबांधवांस

प्रीतिपूर्वक

अत्यादरानें समर्पिली असे.

# भारतीय साम्राज्य.

## पुस्तक चवथें.

### प्रस्तावना.

इतितेज्ञानमाख्यातं गुह्याद्‌गुह्यतरंमया ॥

१ भारतीय साम्राज्याच्या प्रथम पुस्तकांत आर्य-देश व तत्संबंधीं वृत्तांत याविषयींची हकीकत दिली असून त्यांत एकंदर नऊ भाग आहेतः—

१ देशस्थिति व वर्णन २ उद्‌भिज्जसंपत्ति, व मुख्य उत्पन्न होणारे पदार्थ. ३ उद्‌भिज्जसंपत्ति व शाक पुष्पफलवैचित्र्य. ४ कृषिकर्म व तत्संबंधीं खतें, राब, व साधनें. ५ कृषिकर्म व तत्संबंधीं जनावरें, आणि जमिनीचा मगदूर. ६ प्राणिजातिसंपती. ७ खनिज संपत्ति. ८ वातावरणमीमांसा. आणि ९ भरतखंड-भूरचना.

२ द्वितीय पुस्तकांत आर्य लोक व त्यांचे बुद्धि-वैभव यांचें दिग्दर्शन केलें आहे, व त्याचे पांच भाग आहेतः—

१० आर्यांचें मूलनिवासस्थान, व त्यांचें वैभव. ११ आर्यांची सामाजिकरचना, व धर्मसंस्था. १२

आर्यभाषा, व तिचें श्रेष्ठत्व. १३ वेद, व वेदांगें. आणि १४ महाकाव्यें, व गद्यपद्यादि भाषाशास्त्र.

३ तृतीय पुस्तकांत आर्येतिहास व भूगोल, याविषयींचा वृत्तांत दिला आहे, व त्याचे पांच भाग केले आहेतः—

१५ इतिहास व भूगोलासारख्या ग्रंथासंबंधीं आर्यांचें न्यूनत्व, व त्यांचीं कारणें. १६ वेदकालीन इतिहास. १७ उत्तर हिंदुस्थांतील प्राचीन नृपावलि. १८ दक्षिण हिंदुस्थानांतील प्राचीन नृपावलि. आणि १९ प्राचीन आर्यभूगोल.

प्रस्तुतच्या चवथ्या पुस्तकांत, आर्यशास्त्र व कला यांविषयींचें सविस्तर विवेचन आहे, व त्याचे बारा भाग केले आहेतः—

२० धर्मशास्त्र. २१ वेदान्तशास्त्र. २२ ज्योतिःशास्त्र, भूमितिशास्त्र, अंकगणित, व बीजगणित. २३ वैद्यशास्त्र. २४ नीतिशास्त्र. २५ धनुर्वेद. २६ गांधर्ववेद अथवा गायनकला. २७ चित्रकला. २८ शिल्पकला व निर्माणविद्या. २९ पटचातुर्य व रागकौशल्य. ३० वास्तुविद्या, यंत्रकला, गंधद्रव्यक्रिया, पाकशास्त्र, द्यूतचातुर्य, व इतर कला. आणि ३१ लेखनकला.

मुक्काम पुणें, मंगळवार. मार्गशीर्ष शुद्ध ११ शके १८१५ विजयनाम संवत्सरे.

नारायण भवानराव पावगी.

---

# अनुक्रमणिका.

## पूर्वार्ध

# पुस्तक चवथें.

## भाग २० वा.

### धर्मशास्त्र.

---

# भाग २१ वा.

## वेदान्तशास्त्र.



---

# भाग २२ वा.

## ज्योतिःशास्त्र, भूमितिशास्त्र, अंकगणित व बीजगणित.

विद्या व तिचा पुरातन शोध—हिंदुज्योतिर्विद्येचा पुरातन शोध असल्याविषयीं, नामांकित ग्रंथकारांचे अभिप्राय—आर्य ज्योतिःशास्त्राचा उदयकाळ, किंवा वैदिककाळ—त्याची वृद्धि, व यावनिक काळ—त्याचा उत्कर्ष काळ—त्याचा अस्तकाल—आर्य ज्योतिर्विद्येचे चार काळ—वैदिक किंवा उदय काळांतील शोध—सत्तावीस नक्षत्रें—सूर्याचें आकर्षण—ग्रहणाचें कारण—वारिरूपान्तर—इंद्र धनुष्य—तें पडण्याचीं कारणें—रश्मिदंड—सूर्यप्रकाश, व त्याचीं कारणें—धूमकेतु, व तत्संबंधीं शोध—ग्रीस देशाच्या तुलनेनें हिंदु ज्योतिःशास्त्राचें पौराणत्व—पुराण ज्योतिषी पराशर—यावनिक कालांतील ज्ञानप्राप्ति—हिंदूज्योतिःशास्त्रांचें चलन—हिंदूंचा ज्ञानोन्नत्ति व उत्कर्ष आणि तत्संबंधीं पाश्चिमात्यांचे अभिप्राय—उत्कर्ष कालांतील हिंदु ग्रंथकार, व त्यांचे शोध—सिद्धान्तशिरोमणींतील मूलतत्वें—पृथिवीची गोलाकृति—पृथिवीचें आकर्षण—प्राचीनकाळांतील हिंदूंच्या शोधाविषयीं, पाश्चिमात्यांचें विचार—हिंदुज्योतिर्विद्येचा अस्तकाल—दैवज्ञविद्या—तिचा यूरोप व आफ्रिका खंडांत प्रसार—राजाजयसिंगाच्या वेधशाला, व त्यांचे शोध—यूरोपांतील या वेळच्या स्थितीचें दिग्दर्शन—ग्रीस देशांतील नक्षत्रावलोकनाचा काळ—भूगोलाविषयीं आरिस्टाटल व तालिमी यांचें मत—त्यांच्या मताचें मिथ्यत्व—यांत बदल होण्याचीं कारणें—कोपर्निकस याचें मत—ग्यालिलियोचें मत—न्यूटनूचें मत—आर्यज्योतिर्विद्या, व तिचें पाश्चिमात्य देशांत पुनरुज्जीवन—ग्रीक हे हिंदूंचे चेले—वेदांतील प्राचीन शोध—इतर राष्ट्राच्या तुलनेनें हिंदूंचें प्राचीनत्व—त्यांचें भूमितिशास्त्र—त्यांचें अंकगणित व बीजगणितशास्त्र—भरतखंडाच्या तुलनेनें यूरोपांतील अज्ञान.

---

# भाग २३ वा.

## वैद्यशास्त्र.

हिंदूंचें वैद्यक हें त्यांच्या स्वतंत्र परिश्रमाचें फल—त्याचें पौराणत्व––त्याचा विकासकाल––हिंदु वैद्यकावरील अति प्राचीन ग्रंथ––ऋग्वेदांत त्याचें आदिकथन––आयुर्वेदांत त्याचें विवेचन, व तत्संबंधीं पौराणिक कथानक––अग्निवेशतंत्र––कायाचिकित्सा व शल्यचिकित्सा––चरक व त्याचा काल—सुश्रुत व त्याचा काल––—रसवैद्यक, व त्याचीं मूलतत्वें—रसवैद्यकाचा काल—वागूभट, व त्याचे ग्रंथ—अष्टांगहृदय—हिंदु वैद्यकाची पर्याप्ति—हिंदूंचीं वैद्यकीय शस्त्रें—वागूभटाचा काल, व तदंनतरचे वैद्यकावरील ग्रंथकार—हिंदूवैद्यकापासून इतर राष्ट्रांस प्राप्ति—हिंदुवैद्यकाची चढती व उतरती कला—वैद्यकांत, हिंदूंचीं क्षणोक्षणीं इतरांस मदत––आर्यवैद्यक; व त्याचा इतर राष्ट्रांवर अनुग्रह.

---

# भाग २४ वा.

## नीतिशास्त्र.

संस्कृतांतील नीतिग्रंथ—कामन्दकीय नीतिशास्त्र—पंचतंत्र, हितोपदेश, व दुसरीं नीतिकाव्यें—भारतीयांचा कथामृतनिर्झर—पंचतंत्राचीं भाषांतरें—पल्हवींत, अरबींत, इराणींत, फ्रेंच भाषेंत, इंग्रजींत, व तुर्कींत—प्राचीचें पाश्चात्यांस ऋण—प्राच्य कथांचें पौराणत्व—प्राच्य कथापर्यटन—आशियाखंडांत, युरोप-खंडांत, आणि अमेरिकेंत––ग्रीक ग्रंथाविषयीं मिथ्या व निर्मूलक-कल्पना—पंचतंत्रांतील नीतितत्वांची कीर्ति—हिंदुधर्मांतील नीति-शास्त्राचीं मूलतत्वें––त्यावर परधर्मीयांचे हल्ले व त्याचा परिणाम.

---

## भाग २५.

### आर्यकला.

आर्यकला—त्यांतील विषय—धनुर्वेद, व तत्संबंधी ग्रंथ—युद्धकलेचें शास्त्रीय विवेचन.

---

## भाग २६ वा.

### गायनकला.

गायनकला व तिचें मोहकत्व—आर्यसंगीताचें प्राचीनत्व—हिंदुसंगीताचा पौराणिक, व ऐतिहासिक काल—हिंदुसंगीताची चढती, व उतरती कळा—गायनाचे प्रकार, व सूर—संगीताचीं अंगें—वादनकला—नाट्यकला—ताल—गायनकलेंत हिंदूंचें इतर राष्ट्रांनीं केलेलें अनुकरण—गायनकलेंतील ग्रंथकार—गायनकलेची अभिवृद्धि, व तिचा ऱ्हास—हिंदु राग—गायनकलेची सांप्रतची स्थिति—तत्संबंधीं पाश्चिमात्यांचें अज्ञान, व तज्जन्य अवहेलना.

---

## भाग २७ वा.

### अर्थशास्त्र.

अर्थशास्त्र, व त्यांतील विषय—चित्रकला व तिचे प्राचीनत्व—हिंदुचित्रकलेंतील उणीव—पाणिनी व अशोक, यांच्या वेळची चित्रकलेची स्थिति—हिंदु गृहांतील चित्रनिर्मिति.

---

## भाग २८ वा.

### शिल्पकला.

शिल्पकला, व त्यांतील विषय—हिंदूंची निर्माणविद्या—त्यांनीं खोदून निर्माण केलेलीं विवरमंदिरें अथवा कोरींव लेणीं—मद्रास इलाख्यांतील लेणीं—मुंबई इलाख्यांतील लेणीं—कोरींव लेण्यांचीं मुख्य स्थलें—त्यांविषयीं परकीयांचें अभिप्राय—या निर्मितीविषयीं प्रसिद्ध एल्फिन्स्टन् इतिहासकार यांचा अभिप्राय—श्रीरंगपट्टण व बंगाल इलाख्यांतील, व भुवनेश्वर येथील देवालयें—विजया नगरचा प्रध्वंस—हिंदुस्थान व मिसर, या दोन देशांतील निर्मितीमध्यें तुलना—वेरूळ येथील अप्रतीम मंदिरें, व त्यांचा काल—जगन्नाथाचें देवालय व त्याचा काल—हिंदूंची तडागरचना—कूपरचना—सेतुरचना, व तोरणें, आणि जयस्तंभ—आर्यशिल्पाची स्वभावसिद्धता—यवनांनीं आर्यशिल्पाचें केलेलें अनुकरण.

---

## भाग २९ वा.

### पटनिर्माण विद्या व रागकौशल्य.

भारतीयकला व जीवनसाधन—भरतखंडाची इतर देशांशीं तुलना—आर्यचारुकलांचें ऐतिहासिक दृष्टीनें अन्वेषण—हिंदुग्राम संस्थाविषयीं दोन शब्द—आर्यकलांचा उत्कर्ष व ऱ्हास व त्यांचीं कारणें—त्यांचें पुनरुज्जीवन—कार्पासनिर्मितीचा पौराणिक काल—देशीमालाचा कारखाना, व त्याची निर्गत—मद्रास इलाख्यांतील मध्यप्रांतांतील, व—मुंबईतील—हिंदुस्थानांतील गिरण्यांचा अहवाल—इ० स० १८७९ सालचा—इ० स० १८८४ सालचा—बंगाल इलाख्यांतील देशी भाग—वस्त्रालंकरणांत हिंदूंचें

पाटव—डाका येथील मलमल—मद्रास येथील मलमल—मलमली वरील भरगच्चींचें काम—मुंबईतील कापडांची प्रसिद्ध ठिकाणें—रेशीम व त्याचे कारखाने—किनखाब—मखमाल—छोगे व शाली—भरजरीचीं उर्णावस्त्रें—रत्नखचित चादर—सत्रंज्या, गालीचे, व नमदे—लोंकरीच्या गिरण्या—तागाचे कारखाने व खप—कातड्याचे कारखाने—कागदाचे कारखाने—हिंदुस्थानांतील जडावाचें काम—सुवर्णाचें काम—रुप्याचें काम—ताम्रपित्तलभाजनें—पंचरस धातु, व बिडाचें काम—लोहकर्म व शिकलकाम—इकडील तलवारीच्या पाण्याविषयीं ख्याति—शस्त्रास्त्रावरील बेदरी क्रिया—मृद्भांडक्रिया—दारूतक्षण व—खचित क्रिया.

---

# भाग ३० वा.

## वास्तुविद्या व यंत्रकला.

वास्तुविद्या—अर्वाचीन भवन सौन्दर्य—गंधद्रव्यक्रिया—पाकशास्त्र—द्यूतादिकला.

---

# भाग ३१ वा.

## लेखनकला.

लेखनकला—तिचा उद्गम—लेखनकलेच्या उद्गमाचीं कारणें—अति पुराण शिलालेख—ऋग्वेद व यजुःसंहितेंतील लेखनक्रियेचा अंतर्भाव—सूत्रांवरून लेखनकलेचें अंतःप्रमाण—मनुस्मृतीवरून लेखनकलेचें प्राचीनत्व—आर्यलेखनकला फार प्राचीन असल्याविषयीं नूतन शोध—भरतखंडांतून पाश्चिमात्य देशांत लेखनकलेचें गमन—तत्संबंधीं कांहीं पाश्चात्य पंडितांचें मत—मोक्षमुलरच्या मताचें निरसन.

# भारतीय साम्राज्य.

## पूर्वार्ध.

## पुस्तक चवथें.

आर्यशास्त्र व कला.

## भाग २० वा.

## आर्यशास्त्र.

आर्यांची शोधक-बुद्धि, व तन्निर्मित

आमचे पूर्वज आर्य हे प्रत्येक गोष्टीचा फारच शोधक-बुद्धीनें, दूरवर, आणि अति उत्सुकतेनें, विचार करीत. त्यामुळें त्यांच्या कुशाग्रबुद्धीच्या तडाक्यांतून एकही शास्त्र सुनें गेलें नाहीं. कोणतेंही शास्त्र घेतलें तरी त्यांत त्यांचें नैसर्गिक प्रागल्भ्य, आणि सखोलान्वेषण, हीं दृष्टिगोचर झाल्यावांचून राहतच नाहींत. व

ह्यामुळेंच त्यांच्या बुद्धिमत्तेचें आणि पराक्रमशीलतेचें मोठें आश्चर्य वाटतें.

चौदा विद्या, चौसष्ट कला, आणि षट्शास्त्रें, व अठरापुराणें.

**चौदा विद्या**[1], **चौसष्ट कला**[2], **षट्शास्त्रें**,† आणि **अठरा पुराणें**,‡ इत्यादि **ब्राह्मण**निर्मित जें **ज्ञान**भाण्डार, त्याचें अवलोकन केलें, म्हणजे त्यांच्या प्रचुरबुद्धितेजाचें आणि अत्युत्कट उत्साहश-

१. चार वेद ( ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, आणि अथर्वण वेद ); सहा अंगें ( शिक्षा, कल्प, व्याकारण, निघंट, ज्योतिष, आणि छंद ); व चार उपांगें ( मीमांसा, न्याय, पुराणें, आणि धर्मशास्त्र); अशा एकंदर चौदा विद्या आहेत.

२. १ गीत, २ वाद्य, ३ नृत्य, ४ नाट्य, ५ आलेख्यविशेषकच्छेद्य, ६ तंडुल, ७ कुसुमबलिप्रकार, ८ पुष्पास्तर, ९ दशनवसनांगराग, १० मणिभूमिकाकर्म, ११ शयनरचना, १२ उदकवाद्य, १३ नेपथ्ययोग, १४उदकघात, १५ चित्रयोग, १६ माल्यग्रथन विकल्प, १७ कर्णपत्रभंग, १८ पानकरसरागासवयोजन, १९ सूचीवानकर्म, २० सूत्रक्रीडा, २१ सुगंधयुक्ति, २२ वीणाडमरुकवाद्य, २३ प्रहेलीकाकूटवाणी ज्ञान, २४ प्रतिमाला, २५ दुर्वचकयोग, २६ पुस्तकवाचन, २७ नाटकाख्यायिकादर्शन, २८ काव्यसमस्यापूरण, २९ पटिकावेत्रबाण विकल्प, ३० पुष्पवाटिकानिमित्तज्ञान, ३१ यंत्र मातृकाधारण मातृका संवाच्य, ३२ मानसीकार्यक्रिया, ३३ छलित योग, ३४ तर्ककर्म, ३५ तक्षण, ३६ वास्तु, ३७ रौप्यरत्नपरीक्षा, ३८ धातुवाद, ३९ मणिरागज्ञान, ४० बालक्रीडन, ४१ आकर-

( पुढें चालू )

† ‡ ह्या टिपा पुढील पानावर पहा.

क्तीचें कुतूहल वाटून, तज्जन्य विस्मयानें आपला जीव अगदीं थक्क होऊन जातो. खरोखर, **विद्येच्या** प्रत्येक शाखेंत **ब्राम्हण** हे परिपूर्णतेस पोहोंचले आहेत, ( " Early excellence of the Bráhmans in all these branches of learning " ) ह्मणून प्रसिद्ध इतिहासकार **एलफिन्स्टन्** यांनीं जो अभिप्राय आपल्या इतिहासांत प्रदर्शित केला आहे, तो केवळ यथार्थ आहे, असें प्रत्येक विवेकी मनुष्याच्या हृत्पटिकेवर बिंबल्यावांचून राहणार नाहीं.

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू )

ज्ञान, ४२ वृक्षायुर्वेदयोग, ४३ मेषकुक्कुटलावकयुद्धविधि, ४४ शुकसारिकाप्रलापन, ४५ उत्साहन, ४६ केशमार्जन कौशल, ४७ अभिधानकोश, ४८ शकगर्पाडयोजन, ४९ भूषणयोजन, ५० ऐंद्रजाल, ५१ क्रौंचमारणयोग, ५२ हस्तलाघव, ५३ चित्रशाकापूणभक्तविकारक्रिया, ५४ अक्षरमुष्टिकाकथन, ५५ देशभाषाज्ञान, ५६ छंदोज्ञान, ५७ क्रियाविकल्प, ५८ वस्त्रगोपन, ५९ द्यूतविशेष, ६० आकर्षकक्रीडा, ६१ म्लेच्छितकविकल्प, ६२ वैनायिकविद्याज्ञान, ६३ वैजयिक विद्याज्ञान, आणि ६४ वैतालिक विद्याज्ञान, अशा चौसष्ट कला आहेत.

† १ सांख्यदर्शन, २ योग ( पंतजलि ) दर्शन, ३ जैमिनिदर्शन, ४ वेदान्तदर्शन, ५ वैशेषिकदर्शन, आणि ६ न्यायदर्शन, अशीं षट्शास्त्रें आहेत.

‡ १ ब्रह्म, २ पद्म, ३ विष्णु, ४ शिव, ५ लिंग, ६ गरुड, ७ नारद, ८ भागवत, ९ अग्नि, १० स्कंद, ११ भविष्य, १२ ब्रह्मवैवर्तक, १३ मार्कंडेय, १४ वामन, १५ वराह, १६ मत्स्य, १७ कूर्म, आणि १८ ब्रह्मांड, अशीं अठरा पुराणें आहेत.

आतां, सर्व शास्त्रांत, ऐहिक व पारमार्थिक सुखोत्पत्तीच्या संबंधानें, **धर्मशास्त्र** हें शिरोभागीं होय. सबब तत्संबंधींच आपण प्रथमतः विचार करूं.

त्यांचें धर्मशास्त्र.

---

# धर्मशास्त्र.

सर्व सुधारलेल्या देशांत, आणि प्रत्येक समनूजस व उन्नत्तीप्रत पावलेल्या राष्ट्रांत, **सामाजिक** व्यवस्था उत्कृष्ठ रीतीनें, व अबाधित, आणि यथान्याय चालावी यासाठीं, **धर्मशास्त्राचें** अवलंबन करण्याची मोठीच अवश्यकता असते. हें **धर्मशास्त्र** ह्मटलें ह्मणजे मुख्यत्वेंकरून **ईश्वरनिष्ठा, नीतिनैपुण्य, व्यवहारदाक्षिण्य, संप्रदायपटुत्व,** आणि **आचारशीलन,** इत्यादि मूलतत्वांचें एकीकरण, किंवा विन्यास होय.

त्यांतील मूलतत्त्वें.

आह्यां **हिंदूंचें धर्मशास्त्र** विन्यासरूपानें इसवी सनापूर्वी, नऊशें किंवा दहाशें वर्षें उदयास आलें असून, या भूतलावर तें सर्वांत जुनें असल्याचें समजतें. तथापि, त्यांतील तत्वांचें बीजारोपण सदहू कालाच्याही फारच अगोदरचें असून, तें **वेदांत,** आणि विशेषतः **सूत्रांत,** स्पष्टपणें व्यक्त होतें. आतां **वेद** चार असून, या **वेद चतुष्टयासच** समुच्चयरूपानें **श्रुति** असें

त्यांचा विन्यास.

ह्मणतात. ह्या सर्वांचा शिरोभाग ह्मटला म्हणजे **उपनिषदें** होत. या **उपनिषदांत ईशनिष्ठा**, आणि तदंतर्गत सर्वैक्यता, हीं ठायीं ठायीं व्यक्त होतात, हें जास्त सांगावयास नको. प्रत्येक वेदाचीं जशीं **उपनिषदें** आहेत, त्याप्रमाणेंच प्रत्येक **वेदांचीं सूत्रें**ही आहेत; व त्यांत नीति, व्यवहार, संप्रदाय, आणि आचार, इत्यादिकांचें थोडेंबहुत तरी विवेचन असतें. हींच सामाजिकस्थितींचीं सर्वत्र व्याकीर्ण झालेलीं मूलतत्वें, मानवी कुटुंबाच्या व्यवस्थेसाठीं, व तीं सुलभ रीतीनें स्मृतींत राहवीं या हेतूनें. विद्वान् आणि दूरदृष्टी, अशा आमच्या **ऋषींनीं** एकत्र केलीं, व त्यांसच **स्मृति** असें म्हणतात. ज्या विद्वन्मुकुटमणींनीं ह्या **स्मृति** रचल्या, त्यांस **स्मृतिकार** असें ह्मणतात. **स्मृतीं**ची एकंदर व्यवस्था, त्यांची रचना, त्यांचा विन्यास, त्यांतील भाषापद्धति, त्यांत वारंवार दृष्टिगोचर होणारीं **वेदवचनें** आणि त्यांचा उल्लेख, याविषयीं पूर्ण विचार केला म्हणजे ह्या **स्मृति वेदांनंतर** निर्माण झाल्या, अशाबद्दल यत्किंचित्ही शंका राहत नाहीं.

वेदविन्यासकाल.

**वेदांचा** विन्यासकाल इसवी शकापूर्वी तीन ३००० हजार वर्षे असल्याविषयीं मागील भागांत साद्यंत विवेचन केलेलें आहे. वेदकालानंतरचा **ब्राम्हण** काल असून, तो १४००।१५०० वर्षापासून तों इसवी शकापूर्वी १००० हजार वर्षापर्यंत असावा असें वाटतें.

सूत्रांचा काल, व स्मृतिविन्यास.

तदनंतरचा **सूत्रकाल** होय. व याच कालांत **स्मृतींचा** विन्यास झाला असल्याविषयीं सर्वानुमतें ठरतें. ह्या कालाची व्याप्ति इसवी शकापूर्वी एक १००० हजार वर्षापासून तों इ० स० पू० ५४३ वर्षं असावी, असें वाटतें.

**मानव** गृह्यसूत्रें, **कात्यायनकृत कर्मप्रदीप**, **अपस्तंबकृत धर्मसूत्रें**, **शौनककृत प्रतिसांख्य** सूत्रें, **पारस्करकृत कातीय** गृह्यसूत्रें, **अश्वलायन** श्रौत व गृह्यसूत्रें, **सांख्य गृह्यसूत्रें**, आणि **बौध्यायन** सूत्रें, इत्यादिकांत **धर्मशास्त्राचीं** मूलतत्वें आढळून येतात. तसेंच **गौतम**, **विष्णु**, आणि **वशिष्ठकृत धर्मशास्त्रांतही** त्यांचें प्राचुर्य दिसून येतें.

धर्मशास्त्रावरील ग्रंथ.

**धर्मशास्त्रावर** एकंदर लहान मोठें ग्रंथ एकशें बावीस असून, शिवाय आणखी **चतुर्विंशति**, **षट्त्रिंशत्**, **सप्तर्षि**, **षडशीति**, **षण्णवति**, वगैरे **स्मृतिसमुदायवाचक** दुसरे ग्रंथ आहेत. **मनु**, **याज्ञवल्क्य**, **पारस्कर**, **कात्यायन**, **कण्व**, **गौतम**, **शाण्डिल्य**, **जाबालि**, **पाराशर**, **शंख**, **हारीत**, **नारद**, **बृहस्पति**, **संवर्त**, **कोकिल**, **गोभिल**, **सूर्यारुण**, **लघुपराशर**, **वृद्धपराशर**, **लघुबृहस्पति**, **लघुशौनक**, वगैरे अनेक **स्मृतिकार** आहेत. परंतु त्या सर्वांत **मनु** हा शिरोभागीं होय.

मनूचा काल.

**मनु** हा इसवी शकापूर्वी नवव्यां किंवा दहाव्या शतकांत उदयास आला असल्याविषयीं पूर्वी सांगितलेंच आहे. **मनूनंतर** त्याच्या खालोखाल महत्वाचा, व दुसऱ्या पंक्तीचा **स्मृतिकार** ह्मटला ह्मणजे **याज्ञवल्क्य** होय.

याज्ञवल्क्याचा काल.

ह्याचा काल इसवी शकाच्या दुसऱ्या शतकांत असावा, अशी कल्पना आहे. **मनुस्मृतीवर कुल्लूक भट्टाचार्यांची** प्रसिद्ध टीका असून, **याज्ञवल्क्यावर मिताक्षराची** टीका आहे.

धर्म शब्दाची व्याख्या.

आतां **हिंदु धर्मशास्त्रांतील** विषयांचें प्रतिपादन करण्यापूर्वी, **धर्म** ह्मणजे काय हें पाहणें महत्वाचें असल्यामुळें, तत्संबंधीं थोडा विचार करूं. **धर्मा**ची व्याख्या खालीं लिहिल्याप्रमाणें एके ठिकाणीं थोडक्यांत दिली आहेः—

**धृतिः क्षमो दमोऽस्तेयंशौचमिंद्रिय निग्रहः ।**
**धीर्विद्या सत्यमक्रोधो दशकं धर्मलक्षणम् ॥**

याप्रमाणें दशगुणान्वित **धर्म** असून, **महाभारतांत**

1. "This would make the author of the Code live about 900 years before Christ." That the Code is very ancient is proved by the difference of religion and manners from those of present times, no less than by the obsolete style".

( Elphinstone's India. P. 438 ).

सुद्धां, " **आत्मज्ञानं तितिक्षा च धर्मः साधारणः,** " असें ह्मटलें आहे. **याज्ञवल्क्य स्मृतींत धर्मा**ची व्याख्या सांगितली आहे, तिजवरून धर्म ह्मणजे १ इज्या, २ आचार, ३ दम, ४ अहिंसा, ५ दान, ६ स्वाध्यायकर्म, आणि योगसाधनाच्या द्वारें ७ आत्मदर्शन, हीं होत.

**इज्याचार दमा हिंसा दानं स्वाध्यायकर्मच ।**
**अयं तु परमो धर्मो यद्योगेनात्मदर्शनम् ॥**

( याज्ञवल्क्य. )

" **श्रुतिप्रमाणकोधर्मः** " असें **हारीताचें** वाक्य असून, " **चोदनालक्षणोऽर्थो धर्मः** " असें **जैमिनि** ह्मणतो. **भविष्य पुराणांत** व **मनुस्मृतींत,** धर्माची व्याप्ति खालीं लिहिल्याप्रमाणें दिली आहेतः-

धर्मः श्रेयः समुद्दिष्टं श्रेयोऽभ्युदय लक्षणम् ।
सतुपञ्चविधः प्रोक्तो वेदमूलः सनातनः ॥
अस्य सम्यगनुष्ठानात्स्वर्गो मोक्षश्च जायते ।
इहलोके सुखैश्वर्यमतुलंच खगाधिप ॥

( भविष्यपुराण. )

विद्वद्भिः सेवितः सद्भिर्नित्यमद्वेषरागिभिः ।
हृदयेनाभ्यनुज्ञातो यो धर्मस्तं निबोधत ॥ १ ॥

( मनुस्मृति. अध्याय २ श्लोक १. )

**सर्व** स्मृतिकारांत **मनु** हा आद्य असून, सर्वमान्यही

मनुस्मृति.

आहे. यानें मानवधर्म, आणि वर्णाश्रमधर्म, यांविषयीं साद्यंत मीमांसा केली आहे. ह्या मानवधर्मशास्त्रांत जगत् कसें निर्माण झालें याविषयीं प्रथम सांगून, तदनंतर सर्व कोटींतल्या प्राण्यांची व मनुष्यमात्रांची कशी उत्पत्ती झाली, हें सविस्तर कथन केलेलें आहे.

**आसीदिदं तमोभूतमप्रज्ञातमलक्षणम् ।**
**अप्रतर्क्यमविज्ञेयं प्रसुप्तमिव सर्वतः ॥ ५ ॥**
**ततः स्वयंभूर्भगवानव्यक्तो व्यञ्जयन्निदम् ।**
**महाभूतादि वृत्तौजाः प्रादुरासीत्तमोनुदः ॥ ६ ॥**
**योऽसावतीन्द्रिय ग्राह्यः सूक्ष्मोऽव्यक्तः सनातनः ।**
**सर्वभूतमयोऽचिन्त्यः सएव स्वयमुद्बभौ ॥ ७ ॥**
**सोऽभिध्याय शरीरात् स्वात्सिसृक्षुर्विविधा प्रजाः ।**
**आपः एवससर्जादौ तासुबीज मवासृजत् ॥ ८ ॥**
**तदण्डमभवद्धैमं सहस्रांशु समप्रभम् ।**
**तस्मिञ्जज्ञे स्वयंब्रह्मा सर्वलोकपितामहः ॥ ९ ॥**
**तस्मिन्नण्डेस भगवानुषित्वा परिवत्सरम् ।**
**स्वयमेवात्मनोध्यानात्तदण्डमकरोद्द्विधा ॥ १२ ॥**
**ताभ्यांस शकला भ्यांच दिवं भूमिंच निर्ममे ।**
**मध्ये व्योम दिशश्चाष्टावपां स्थानंचशाश्वतम् ॥ १३ ॥**
**एवमेतैरिदं सर्वं मन्नियोगान्महात्मभिः ।**
**यथा कर्म तपोयोगात्सृष्टं स्थावर जंगमम् ॥ ४१ ॥**

पशवश्च मृगाश्चैव व्यालाश्चोभयतोदतः ।
रक्षांसि च पिशाचाश्च मनुष्याश्च जरायुजाः ॥४३॥
एवं सर्वं स सृष्ट्वेदं मांचाचिन्त्य पराक्रमः ।
आत्मन्यन्तर्दधेभूयः कालंकालेन पीडयन् ॥ ५१ ॥
तपः परं कृतयुगे त्रेतायां ज्ञानमुच्यते ।
द्वापरे यज्ञमेवाहुर्दानमेकं कलौयुगे ॥ ८६ ॥
सर्व सास्य तु सर्गस्य गुप्त्यर्थं समहाद्युति :
मुख बाहूरुपज्जानां पृथक्कर्माण्यकल्पयत् ॥ ८७ ॥
अध्यापनमध्ययनं यजनं याजनं तथा ।
दानं प्रतिग्रहंचैव ब्राह्मणानामकल्पयत् ॥ ८८ ॥
प्रजानां रक्षणं दानमिज्याध्ययनमेवच ।
विषयेष्वप्रसक्तिश्च क्षत्रियस्य समासतः ॥ ८९ ॥
पशूनां रक्षणं दानमिज्याध्ययनमेवच ।
वणिक्पथं कुसीदंच वैश्यस्य कृषिमेवच ॥९० ॥
एकमेवतुशूद्रस्य प्रभुः कर्मसमादिशत् ।
एतेषामेववर्णानां शुश्रूषा मन सूयया ॥ ९१ ॥
भूतानां प्राणिनः श्रेष्ठाः प्राणिनां बुद्धिजीविनः ।
बुद्धिमत्सुनरा श्रेष्ठाः नरेषु ब्राह्मणाः स्मृताः ॥९६ ॥
ब्राम्हणेषुच विद्वांसो विद्वांसो विद्वत्सुकृतबुद्धयः
कृतबुद्धिषुकर्तारः कर्तृषुब्रम्हवेदिनः ॥ ९७ ॥

( मनुस्मृति अध्याय १. )

ह्या स्थावर जंगमात्मक सृष्टीची रचना होण्यापूर्वी, सर्व

सृष्टिरचना.

कांहीं तमोमय होतें. तथापि स्वयंभू असा जो **भगवान्** तो तदन्तर्गतच असून, त्या **प्रलयकाल**च्या अवस्थेंत अगदीं प्रसुप्त होता. अशा वेळीं, तो अहंकारामुळें एकाएकी प्रबुद्ध होऊन, त्यानें ही अखिल चराचर सृष्टि, नानाविध प्रजा, आणि जारज, अण्डज, व स्वेदज, वगैरे कोटींतील असंख्य प्राणी निर्माण केले. पुढें मनुष्यमात्राच्या सामाजिक स्थितीची व्यवस्था लावण्यासाठीं, त्यांचे **ब्राम्हण, क्षत्रिय, वैश्य,** आणि **शूद्र**, असे चार भेद कल्पून, त्या प्रत्येकांचीं पृथक् पृथक् कर्मे, व विहिताचरण, हीं त्यांच्या मागें लावून दिलीं. अशा प्रकारें ही **हिंदुसमाज**स्थिति उदयास आली, असें **ऋग्वेदा**वलोकनानें व **मनुस्मर्ती**वरून चांगलें लक्षांत येतें.

मनुस्मृतींतील सारांश.

**मनुस्मृती**चें समग्र अवलोकन केलें ह्मणजे असें सहज लक्षांत येईल कीं, मनुष्याच्या उत्पत्तीपासून, किंबहुना या जगाच्या उत्पत्तीपासून, तों तहत् त्याच्या अन्तापर्यंत, मनुष्यमात्राच्या इतिकर्तव्यतेचें त्यांत साद्यन्त विवेचन केलें आहे. ह्मणजे जगदुत्पत्ति, नृदेह संस्कारविधि, व्रतचर्योपचार, स्नानविधि, दाराधिगमन, विवाहलक्षण, महांयज्ञविधान, श्राद्धकल्प, वृत्तिलक्षण, स्नातकव्रत, भक्ष्याभक्ष्य व शौचविचार, द्रव्यशुद्धि, स्त्रीधर्मयोग; तसेंच तापस्य, मोक्ष, व संन्यास लक्षण, राजधर्म, साक्षिप्रश्नवि-

धान, स्त्रीपुरुषधर्म, विभागधर्म, द्यूतकंटक शोधन, वैश्य-शूद्रोपचार, संकीर्णसंभव, आपद्धर्म, वर्णप्रायश्चित्तविधि, संसारगमन, त्रिविध कर्मांच्या गुणदोषांचें परीक्षण, देश-धर्म, जातिधर्म, कुलधर्म, आणि पाषण्डगणधर्म, याविषयीं सविस्तर वर्णन मोठ्या मार्मिकपणानें केलें आहे. पहिल्या आध्यायाच्या ८८ व्या श्लोकांत **ब्राह्मणांचें** कर्तव्यकर्म सांगितलें असून, त्यांत, **अध्यापन** आणि **अध्ययन** यांची योजना शिरोभागीं केली आहे. त्यावरून विद्यादान व विद्यार्जन करण्याच्या कामीं, **ब्राम्हण** हे पूर्वीच्या काळीं अति निपुण होते. इतकेंच नाहीं तर, त्यांची त्या कामीं असलेली ख्याति आजमितिसही जशीच्या तशीच कायम आहे. **वाराणशीं** सारख्या मोठमोठ्या क्षेत्रांत, आणि **पुण्यपत्तना**सारख्या विस्तीर्ण शहरांत, तसेंच **ब्राम्हण** वस्तीच्या लहान लहान गांवांत, अजूनही **वैदिक** विद्वज्जन आपल्या छात्रवर्गास **वेदाध्यापन** करीत असल्याचें हम्मेश दिसून येतें. परोपकार व देशसमृद्धि यांसाठीं विद्यादान, आणि ज्ञान व आत्मोन्नति यासाठीं विद्यार्जन, हें जणुकाय **ब्राम्हणांचें** ब्रीदच असून, तें त्यांच्या पिण्डांतच खिळल्यासारखें दिसतें. अशा प्रकारची त्यांस विद्येची अनुपम गोडी होती, म्हणूनच ते इतक्या योग्यतेस चढले, आणि आपला पुराण देश एवढ्या

ब्राह्मणांचें कर्तव्य-कर्म.

मोठया वैभवास आणिला. बाल्यावस्थेपासून तों युवास्थेपर्यंत, आणि युवावस्थेपासून तों वृद्धावस्थेपर्यंत, विद्यार्जनाचीच उत्कट इच्छा असल्यामुळें, ते आपलें सर्व आयुष्य त्यांतच घालवीत, व विद्यामृत सेवनानें सदैव आनंदांत कालक्रमणा करीत. खरोखर, ह्या जगांत विद्येसारखी दुसरी कोणतीही कर्मणूक नाहीं. आणि ज्यानें कां एकदां विद्यामृताची चव घेतली आहे, त्याला ह्मणून दुसरा कोणताही विषय गोड लागणार नाहीं. रात्रंदिवस **वेद**पठण, व्याकरणशास्त्राध्ययन, न्यायशास्त्रमीमांसा, ज्योतिःशास्त्रान्वेषण, आयुर्वेदनिरूपण, साहित्यशास्त्रविवेचन, आणि नानाविधकलाकलाप वर्णन, यांतच त्यांचें सर्व आयुष्य खर्च होई. ह्या सर्व गोष्टींचा विचार केला ह्मणजे आमचे पूर्वींचे **ब्राम्हण** किती उत्साही, किती उद्योगी, आणि किती विद्वान् होते, याचें चांगलें दिग्दर्शन झाल्याशिवाय खचित राहणार नाहीं.

वेदपठण.

आतां "**राजा कालस्य कारणम्**" ही ह्मण जरी सर्वांशीं खरी आहे, आणि आजकाल **इंग्रजी** राज्यसत्ता बहुतेक सर्वत्र असल्यामुळें **इंग्रजी**भाषा जरी सर्व ठिकाणीं चालू आहे, तरी देखील या अतिपुराण **भरतखंडांत**, आजमितीसही **वेदमंत्रपठणा**चा **ध्वनि**, आणि **शास्त्राध्ययना**चा **घोष**, हे कर्णरन्ध्रात ठिकाठिकाणीं यथेष्ट दुमदुमून मनास अत्यानंद

देत आहेत. ज्या प्रमाणें **ब्राम्हणांस** अध्यापन व अध्ययन सांगितलें आहे, त्याचप्रमाणें **क्षत्रिय** आणि **वैश्य** या वर्गांस अध्ययन सांगितलें आहे. ( मनुस्मृति. अध्याय १ श्लोक ८९।९० ). व ह्यांस अध्यापन करण्याचें काम प्राचीनकाळीं **ब्राह्मण** मोठ्या आनंदानें करीत. असें असतांही, **ब्राम्हण**-वर्णांतील **पुरोहित** वर्गानें, दुसऱ्या वर्णांस आज्ञानांधकारांत ठेवण्याच्या कपटबुद्धीनें, आपल्या जवळच ज्ञानभांडारा-च्या किल्ल्या ठेविल्या, ह्मणून कांहीं अविचारी व कांहीं अज्ञान अशा **यूरोपस्थांचा** त्यांजवर आरोप आहे. आतां, हा आरोप किती अनृत आणि भ्रांतिमूलक आहे, हें **धर्म-शास्त्रावरून** व **ब्राम्हणांच्या** आचरणावरून तर निर्विवादच सिद्ध होत आहे; सबब त्याविषयीं जास्त विवेचन करण्याचें कारण नाहीं. मात्र, याठिकाणीं इतकें सांगणें जरूर आहे कीं, **मोक्षमूलरसारख्या** गौरकाय विद्वन्मणीनें देखील हा आरोप अगदीं खोडसाळ ठरविला आहे. ते ह्मणतात कीं:—

---

१ प्रत्येक वर्णाची इति कर्तव्यता खालीं लिहिल्याप्रमाणें सांगि-तली आहे.

अध्यापनमध्ययनं यजनं याजनं तथा ।
दानं प्रतिग्रहंचैव ब्राह्मणानामकल्पयत् ॥ ८८ ॥
प्रजानां रक्षणं दान मिज्याध्ययन मेवच ।
विषयेष्वप्रसक्तिश्च क्षत्रियस्य समासतः ॥ ८९ ॥
पशूनां रक्षणं दान मिज्याध्ययन मेवच ।
वणिक्पथं कुसीदंच वैश्यस्य कृषिमेवच ॥ ९० ॥

How for this license of ignorant assertion may be carried is shown by the same authorities who denied the importance of the Veda for a historial study of Indian thought, boldly charging those wily preists, the Brahmans, with having withheld their sacred literature from any but their own caste. Now so far from withholding it, the Brahamans have always been striving, and often striving invain, to make the study of their sacred literature obligatory on all castes except the Sudrás, and the passages just quoted from Manu show what penalties were threatened, if children of the second and third castes, the Kshatriya's and Vaisyas, were not instructed in the sacred literature of the Brâhamans.

( What can India teach us ? P. P. 142 143. )

चतुर्वर्णाचीं कर्मे.

**ब्राह्मणांनीं** १ अध्यापन, २ अध्ययन, ३ यजन, ४ याजन, ५ दान, आणि ६ प्रतिग्रह, हीं षट्कर्मे करावीं. **क्षत्रियांनीं** प्रजारक्षण, दान, गुरूपासून अध्ययन, व इंद्रियसंयमन, हीं आचरावीं. **वैश्यांनीं** पशूरक्षण, दान, गुरूपासून अध्ययन, वाणिज्य, कुसीद, आणि कृषिकर्म, हीं करावीं. व शेवटल्या शूद्र वर्गानें वरीष्ठ तीन वर्गाची सेवा करावी; **अशी स्मृतिकारांची** आज्ञा असून हा श्रमविभाग प्रत्येक

वर्णाची बुद्धिमत्ता, त्याची कर्तबगारी, आणि त्याची लायकी, ह्यांस अनुसरून ज्याच्या त्याच्या सामर्थ्यानुरूप विचारपूर्वकच केल्यासारखें दिसतें.

आश्रमचतुष्टय.

ह्याप्रमाणें वर्णव्यवस्था लाविल्यावर, आपलें स्वतःचें कर्तव्यकर्म पूर्णपणें बजाविलें जावें या हेतूनें, **ब्राह्मणांनीं** आपणांकरितां अतिकठिण व तीव्र नियम करून ठेविले, आणि **आश्रमचतुष्टयाचें** बंधन लावून घेतलें. उपनयन झाल्यावर प्रत्येक **ब्राम्हणानें** नित्य स्नान करून देवर्षि पितृतर्पण, देवताभ्यर्चन, आणि समिद्धोम केला पाहिजे.

ब्रह्मचर्य व्रत.

गंध, माल्य, व स्त्री, अशीं **ब्रम्हचर्यावस्थेंत** अगदीं वर्ज्य केलीं पाहिजेत. काम, क्रोध, लोभ, नर्तन, गीतवादन, द्यूत, जनवाद, अनृत भाषण, सानुराग स्त्रीप्रेक्षण, रेतस्कन्दन, आणि गुरुकुलभिक्षा, व बंधुकुलयाञ्चा, हीं सर्वथैव सोडलीं पाहिजेत. नित्यशः दूरच्या समिधा आणून त्यांचा सकाळीं व संध्याकाळीं होम केला पाहिजे. भिक्षा मागून आपली उपजीविका केली पाहिजे, व ही भिक्षाही एका ठिकाणची नसली पाहिजे. याप्रमाणें व्रतनियमादिकरून, छत्तीस वर्षांची उमर होई तोंपर्यंत गुरूच्या घरीं **वेदाध्ययन** केलें पाहिजे, आणि कायावाचामानसेंकरून गुरुप्रीति संपादन केली पाहिजे.

**वेदमेव सदाभ्यस्येत्तपस्तप्स्यन्द्विजोत्तमः ।**
**वेदाभ्यासोहि विप्रस्य तपः परमिहोच्यते ॥ १६६ ॥**
**शरीरंचैव वाचंच बुद्धीन्द्रियमनांसिच ।**
**नियम्य प्राञ्जलिस्तिष्ठे द्वीक्षमाणो गुरोर्मुखम् ॥१९२॥**

( मनुस्मृति अध्याय २. )

गृहस्थाश्रम.

तदनंतर **गुरूची** आज्ञा घेऊन **गृहस्थाश्रम** स्वीकारावा, आणि सुलक्षणान्वित अशी कन्या पाहून तिचें पाणिग्रहण करावें. ही कन्या असपिण्डा असली पाहिजे, व ती सवर्ण कुलांतील पाहून केली पाहिजे. म्हणजे **ब्राह्मणांनीं ब्राम्हणवर्णांतील**, **क्षत्रियांनीं क्षत्रियवर्णांतील**, **वैश्यांनीं वैश्यवर्णांतील**, आणि **शूद्रांनीं शूद्रवर्णांतील** कन्या करण्याविषयीं **मन्वाज्ञा** आहे. एकंदर लग्नाचे आठ प्रकार सांगितले आहेत; १ **ब्राम्ह**, २ **दैव**, ३ **आर्ष**, ४ **प्राजापत्य**, ५ **आसुर**, ६ **गांधर्व**, ७ **राक्षस**, आणि ८ **पैशाच**. यांपैकीं **ब्राम्हणांस** पहिले सहा प्रशस्त आहेत. **क्षत्रियांस** शेवटले चार, आणि **वैश्य** व **शूद्र** यांस **राक्षस**, शिवायकरून, बाकीचे सरते शेवटले तीन विवाह-प्रकार योग्य असल्याविषयीं **मनुस्मुर्तींत** सांगितले आहे.

**ब्राम्हो दैवस्तथैवार्षः प्राजापत्यस्तथासुरः ।**
**गान्धर्वो राक्षसश्चैव पैशाचश्चाष्टमोऽधमः ॥२१॥**

षडानुपूर्व्या विप्रस्य क्षत्रस्यचतुरोऽवरान् ।
विट्शूद्रयोस्तु तानेव विद्याद्धर्म्यानराक्षसान् ॥२३॥
( मनुस्मृति अध्याय ३. )

लग्नाचे प्रकार व त्यांतील भेदाभेद.

पहिल्या प्रकारच्या विवाहांत सालंकृत कन्यादान करतात. दुसऱ्यांत ज्योतिष्टोमादि यज्ञ करून अलंकारासहित कन्या देतात. तिसऱ्यांत यागादि सिद्धीसाठीं वराला गाय किंवा वृषभ देऊन कन्या अर्पण करतात. चवथ्यांत " सहयुवां धर्मं कुरुतम् " असें म्हणून कन्या देतात. पांचव्यांत ज्ञातीला व कन्येला यथाशक्ति द्रव्य देऊन तिला वराप्रत देतात. सहाव्यांत कन्या आणि वर यांच्या परस्पर अनुरागानें आलिंगनमैथुनादिव्यवहार होतात. सातव्यांत बलात्कारानें कन्येचें हरण करून तिच्याशीं लग्न लावतात. आणि आठव्यांत कन्या प्रसुप्त, मदविव्हल, मद्यप्रमत्त, संरक्षणरहित, व विजनदेशांत असतां, तिला बलात्कारानें नेऊन तिच्याशीं पाप हेतूनें विवाह होतो. आणि ह्मणूनच ह्या शेवटल्या प्रकारचा विवाह **स्मृतिकारांनीं** अति निंद्य मानला आहे.

गृहस्थाचें प्रत्यहीं आचरण.

विवाह झाल्यानंतर, व गृहस्थाश्रमी बनल्यावर, **ब्राम्हणानें** प्रत्यहीं अध्यापन, **वेदाध्ययन**, ब्रह्मयज्ञ, पितृयज्ञ, तर्पण, देवयज्ञ, भूतयज्ञ, मनुष्ययज्ञ, होम आणि

अतिथिपूजन, असें केलें पाहिजे. तसेंच अहुत, हुत, प्रहुत, ब्राह्मच, व प्राशित, असें पंचमहायज्ञही केले पाहिजेत. ब्रह्मचर्य, वानप्रस्थ, आणि संन्यास, या तिन्ही आश्रमाचें क्षेम गृहस्थाश्रमावरच मुख्यत्वेंकरून अवलंबून असल्यामुळें, ह्या द्वितीय आश्रमाची फारच महत्वी सांगितली आहे. कारण, शक्त्यनुसार संसारांतील सर्व गोष्टींची अनुकूलता ह्याच अश्रमांत असल्यामुळें, कोणीही अतिथी, अभ्यागत, ब्रम्हचारी, वानप्रस्थ, अथवा संन्याशी घरीं आल्यास, त्याचा योग्य सत्कार करून सामर्थ्यानुरूप त्याची संभावना करण्यास, गृहस्थाला उत्तम संधी असते. स्वाध्यायादि करून ऋषींची पूजा, होमादि क्रियांनीं देवतांचें अर्चन, श्राद्धादि क्रियांनीं पितृंचें तर्पण, अन्नदानानें मनुष्यांची तृप्ती, आणि बलि वगैरे देऊन भूतगणांची शांति, इत्यादि सर्व केलें पाहिजे; आणि दुसरीं नानाविध, कर्मे आचरून नेहमींच शूचिर्भूत राहिलें पाहिजे.

गृहस्थाश्रमांची थोरवी.

याप्रमाणें गृहस्थाश्रमांत राहून यथाविधिकर्मे आचरिल्यावर, कालवशात् जेव्हां गृहस्थाश्रम्याला असें वाटेल कीं, आपली वृद्धावस्था झाल्या कारणानें सर्व गात्रें शिथील होऊन केंसही पांढरे झाले, तेव्हां त्यानें संतती असल्यास, अरण्यांत जाऊन **वानप्रस्थाश्रम** स्वी-

वानप्रस्थाश्रम व त्यांतील विधि.

करावा. ह्या आश्रमांत व्रीहियवादि ग्राम्य आहार, गवाश्व वाहन, आणि शय्यादि परिच्छद, हीं सर्व वर्ज केलीं पाहिजेत; व आपल्या भार्येच्या मनांत वनांत यावयाचें नसल्यास तिला पुत्रांच्या स्वाधीन करून मग वनांत गेलें पाहिजे. तदनंतर इंद्रियांचें दमन करून, नानाप्रकारच्या शाकमूलफलांनीं शास्त्रोक्तविधीनें पञ्चमहायज्ञ केले पाहिजेत. प्रत्यही प्रातःकाळीं व सायंकाळीं स्नान करून मृगादिचर्म, किंवा वृक्षवल्कलें धारण केलीं पाहिजेत. जटा, श्मश्रु, लोम, व नखें, हीं जशींच्या तशींच ठेविलीं पाहिजेत, जो विहित भक्ष्यपदार्थ खाण्यासाठीं मिळेल त्यांतून बलि व भिक्षा यथाशक्ति द्यावी, आणि आश्रमाच्या ठिकाणीं जो कोणी येईल त्याचें फलमूलभिक्षादानादि करून पूजन करावें. **वेदाभ्यास** नित्य करावा. सर्व भूतांवर दया करावी. यथाविधि जसें अन्न मिळेल तसें खावें. मग तें पक्व असो, किंवा अपक्व असो. आपलें शरीर झिजवून उग्र तप करावें. ग्रीष्म ऋतूंत उन्हांत आसन टाकून बसावें. वर्षा ऋतूंत मेघाखालीं राहावें. आणि हेमन्त ऋतूंत ओलीं वस्त्रें नेसून तप आचरावें. सारांश, सुखासाठीं कोणताही प्रयत्न न करितां, पृथ्वीचें आंथरुण व आकाशाचें पांघरूण करून वृक्षमूल आणि कंदफळें खाऊन, **वानप्रस्थांत** दिवस काढावें.

याप्रमाणें आयुष्याचा तिसरा भाग वानप्रस्थाश्रमांत घालविल्यावर **ब्राम्हणानें** सर्वसंगपरित्याग करून चतुर्थाश्रम जो **सन्यास** तो स्वीकारावा. परंतु सन्यास धारण करण्यापूर्वी शास्त्रोक्त **वेदाध्ययन**, धर्माप्रमाणें पुत्रोत्पादन आणि सामर्थ्यानुसार ज्योतिष्टोमादि यज्ञाचें अनुष्ठान, अशीं करावीं. तदनंतर प्रजापतिदेवताकामिष्टी करून सन्यास धारण करावा, आणि घराबाहेर पडावें. बाहेर पडल्यावर निरंतर एकटेंच असलें पाहिजे. आणि मरण किंवा जीवित, यांचें कोणत्याही प्रकारें अभिनंदन किंवा निन्दा न करतां, स्वकर्माधीन असून मरणकालाची मार्गप्रतीक्षाच करीत राहिलें पाहिजे. आपल्या पादन्यासानें कीडमुंगी, किंवा जीवजंतु मेला जाऊं नये एतदर्थ, जागा पाहून पाऊल टाकिलें पाहिजे. गाळूनच पाणी प्यालें पाहिजे. नेहेमीं सत्य बोललें पाहिजे. आणि पवित्र अन्तरात्मा ज्याप्रमाणें मनाची प्रेरणा करील तसें वर्तलें पाहिजे. अतिवाद सोडून द्यावा, व कोणाशीं वैर करूं नये. जो क्रुद्ध झाला असल त्याचें सान्त्वन करावें. अध्यात्मविषयाचा निरंतर व्यासंग करावा, व हम्मेश निरपेक्ष, आणि निरामिष राहवें. भूकंपादि उत्पाद, चक्षुःस्पन्दादिनिमित्तफल, ज्योतिर्विद्या, आणि नीतिमार्ग, हीं सांगून परिव्राजकानें कधींही भिक्षार्जन करूं नये. केश, नखें,

सन्यासाश्रम, व त्यांतील इतिकर्तव्यता.

स्मश्रु, हीं नेहेमीं काढलीं पाहिजेत. धातुपात्र न घेतां, भोपळा, काष्टपात्र, मृत्पात्र, किंवा तरुत्वक्निर्मितपात्र, हींच सदैव ग्रहण करून त्यांत भिक्षा मागितली पाहिजे. कारण, धातुपात्रांत भिक्षा घेतली असतां नरकपतनाची भीति सांगितली आहे. तसेंच हातांत दण्डधारण करून, कोणाही भूतास पीडा न करतां परिभ्रमण केलें पाहिजे. अल्प आहार करून एकभुक्त असलें पाहिजे. आणि इन्द्रियांचें दमन करून नेहेमीं प्राणायाम केला पाहिजे.

आश्रम चतुष्टयांचें पालन, व तत्संबंधीं वेदकालापासून आजपर्यंत एकसारखी चालत आलेली स्थिति.

याप्रमाणें सदरीं लिहिलेल्या आश्रमचतुष्टयांतील कर्मविधि जरी अति कठिण आहे, तरी तो शास्त्रोक्त असल्यामुळें, व आमच्या लोकांची आमच्या धर्मावर अति श्रद्धा असल्या कारणानें, पूर्वींच्या काळीं तो मनःपूर्वक सर्व आचरीत. इतकेंच नाहीं तर, हल्लींच्या सुधारलेल्या एकोणिसाव्या शतकांतही, त्यांचें अवलंबन करणारे कांहीं गृहस्थ सांपडतील, असें प्रत्यक्षानुभवावरून कोणाही जिज्ञासूला आपल्या मनाची खात्री करून घेतां येईल. ब्राम्हणांचें हें आश्रमचतुष्टय, त्यांचें तें जितेन्द्रियत्व, त्यांची ती विद्यापरायणता, त्यांचें सोज्वळ आत्मज्ञान, आणि त्यांची अत्युत्कट संसारविरक्ति, हीं नेहेमी त्यांच्या डोळ्यापुढेंच असतात, असें आतां जास्त सांगण्याची अव-

श्यकता नाहीं. कारण, सर्व **संस्कृत भाण्डारांत** त्याविषयींचें बळवत्तर प्रमाण सांपडतें. इतिहासदृष्ट्या पाहिलें तर हा **ब्राह्मणां**चा चरितक्रम आज सुमारें नऊ दहा हजार वर्षें, किंबहुना त्यापेक्षांही जास्त काळपर्यंत, सतत व अप्रतिहत चालल्यासारखें दिसतें. **वेद**कालानंतर व इसवी सनापूर्वी सहाव्या शतकांत, म्हणजे आज सुमारें अडीच हजार वर्षांपूर्वी, **बुद्धचरित्रां**त देखील, ह्या आश्रमचतुष्टया प्रमाणेंच **ब्राह्मण** आपली आयुष्यक्रमणा करीत असल्याविषयीं अनेक उल्लेख आढळतात. **बुद्ध**कालानंतर सुमारें तीनशें वर्षांनीं **मिगॉस्थिनीज**लाही, हाच प्रकार दृष्टीस पडला. हा **ग्रीस** येथील **सेल्यूकस्** नामक राजाचा वकील असून तो **चन्द्रगुप्त** राजाच्या दरबारीं असे. **भरत**खंडांत पर्यटन करीत असतां, एकांत स्थळीं, व ठिकठिकाणीं पर्णकुटिकांत, जन्ममरण व जीवित मीमांसा, या विषयावर **ब्राह्मणां**चे थवेच्याथवे ऊहापोह करीत असल्याचें त्यानें प्रत्यक्ष पाहिलें असून, त्याबद्दल त्यानें आपल्या लेखांतही उल्लेख केलेला आहे. तदनंतर **चिनी** प्रवाशी मधून मधून विद्यार्जनार्थ इकडे आले तेही इसवी शकाच्या दहाव्या शतकांपर्यंत **ब्राह्मणां**च्या धार्मिकवृत्तीविषयीं फार गौरवानें लिहितात, आणि त्यांच्या आश्रम चतुष्टयाचें वर्णन करतात. तदनंतरच्या काळांत, मठादिनिवासस्थानांतूनही, **ब्राम्हणां**चें तेंच चरित व तोच

आयुष्यक्रम दृष्टिगोचर होतो. आणि आजमित्तीसही **वारणाशी** सारख्या मोठमोठ्या क्षेत्रांत, आणि **बंगाल** इलाख्यांतील **नडिया** येथील **तोल** नामक पाठशालांत, केवळ ज्ञानासाठीं विद्यार्जन, व आत्मोन्नतीसाठीं अत्मसंयमन, हीं **ब्राह्मण** आपल्या वयाच्या वृद्धावस्थेंतही करीत असल्याचें दृष्टीस पडतें.

**ब्राम्हणां**विषयीं उल्लेख करीत असतां, प्रसिद्ध इतिहासकार **डाक्टर हन्टर** हे असें लिहितात कीं:—

" At this day, Brahaman Colleges, called 'tols', are carried on without fees on the old model, at Nadiya in Bengal, and eleswhere. The modern visitor to these retreats can testify to the stringent self discipline, and to the devotion to learning for its own sake, often protracted till past middle-life, and sometimes by greyhaired students. "

" The Brâhamans therefore were a body of men, who in an early stage of this world's history, bound themselves by a rule of life the essential precepts of which were self-culture and self-restraint. As they married within their own caste, begot children only during their prime, and were not liable to lose the finest of their youth in war, they transmitted their best qualities in an ever increasing

measure to their descendants. The Brahmans of the present day are the result of nearly 3000 years of hereditary education and self restraint: and they have evolved a type of mankind quite distinct from the surrounding population. Even the passing traveller in India marks them out, alike from the bronze-checked, large-limbed, leisure-loving Rajput or warrior caste of Aryan descent: and from the dark skinned, flat-nosed, thick-lipped low castes of Non-Aryan origin, with their short bodies and bullet heads. The Brahman stands apart from both; tall and slim, with finely modelled lips and nose, fair complexion, high forehead, and somewhat cocoa-nut shaped skull—the man of self centered refinement. He is an example of a class becoming the ruling power in a country, not by force of arms, but by the vigour of hereditary culture and temperance. One race has swept across India after another, dynasties have risen and fallen, religions have spread themselves over the land and disappeared. But since the dawn of history, the Brahaman has calmly ruled, swaying the minds and receiving the homage of the people, and accepted by foreign nations as the highest type of Indian mankind."

"The paramount position which the Brah-

mans won, resulted, in no small measure, from the benifits which they bestowed. For their own Aryan countrymen, they developed, a noble language and literature. The Brahmans were not only the priests and philosophers. They were also the law givers, the administrators, the men of science, and the poets of their race. Their influence on the aboriginal peoples, the hill and forest races of India, was not less important. To these rude remnants of the flint and bronze ages they brought in ancient times a knowledge of the metals and of the gods. Within the historical period, the Brahmans have incorporated the mass of the backward races into the social and religious organization of Hinduism.

( Indian Empire by W. W. Hunter, P. P. 96-97. )

एलफिन्स्टन् साहेब हे आपल्या हिंदुस्थानच्या इतिहासांत ब्राम्हणांविषयीं असें लिहितात कीं:—

" * * * * And, from the early excellence of the Brahmans in all these branches of learning, it is probable that they had made considerable progress even when this code ( Manu Smriti ) was formed. "

* * * * * * *

" Their internal institutions were less rude ; their conduct to their enemies more humane ;

their general learning was much more considerable; and in the knowledge of the being and nature of God, they were already in possession of a light which was but faintly perceived even by the loftiest intellects in the best days of Athens."

( Elphinstone's India. P. P. 92–94–95. )

चिनी यात्रिक इत्सिंग याचें हिंदुस्थानांत आगमन, व त्याचा ब्राह्मणांविषयींचा अभिप्राय.

इ० स० ६७३ साली **इत्सिंग** नामक **चिनी** यात्रिक **हिंदुस्थानां**त आला. आणि **नालंद** येथील प्रसिद्ध विहार व पाठशालांत जाऊन, त्यानें **संस्कृता**चा अभ्यास केला. हा देखील, इतर सर्व वर्ग **ब्राह्मणांस** अति पूज्य मानित असल्याचें प्रत्यक्ष अनुभवास आल्याविषयीं लिहितो. व तें **भट्ट मोक्षमूलर** यांच्या लेखावरून चांगलें व्यक्त होतें.

"The Brahmans are regarded throughout the five divisions of India as the most respectable....They revere their Scriptures, the four Vedas, containing about 1,00,000 verses....The Vedas are handed down from mouth to mouth not written on paper. There are in every generation some intelligent Brahmans who can recite those 1,00,000 verses....I myself saw such men."

( What can India teach us ? By MaxMuller. P. 212. )

शेरिंग ह्मणतो कीं, ब्राम्हणाचें तें स्वयमेव श्रेष्ठत्व, त्याच्या रक्तांत अगदीं खिळून गेलेलें असें त्याचें वर्चस्व, त्याचे ते सतेज नेत्र, त्याचें विशाल भाल, त्याचा निमगोरावर्ण, मनांत भरणारा असा त्याचा चेहेरा, त्याची ती व्यंजक मुद्रा, त्याचें तें भारदस्त गमन, त्याच्या शरीरांत मुसमुसलेला त्याचा मानीपणा व प्रागल्भ्य, इत्यादि पाहून, हा ह्या पृथिवीवरील एक अलौकिक प्राणी आहे असें वाटतें.

चाऱ्ही आश्रमांत वेदाध्ययन करण्याविषयीं आज्ञा.

**ब्राह्मणांनीं वेदाध्ययन** चाऱ्ही आश्रमांत सतत केलेंच पाहिजे, अशी **मन्वाज्ञा** आहे.

**वेदमेवसदाभ्यसेत्तपस्तप्स्यन्द्विजोत्तमः ।**
**वेदाभ्यासोहिविप्रस्यतपःपरमिहोच्यते ॥ १६६ ॥**

( मनुस्मृति. अध्याय २. ब्रह्मचर्य. )

1. " Light of complexion, his forehead ample, his countenance of striking significance, his lips thin and mouth expressive, his eyes quick and sharp, his fingers long, his carriage noble and almost sublime, the true Brahmin, uncontaminated by any European influence and manners, with his intense self consciousness, with the proud conviction of superiority, depicted in every muscle of his face, and manifest in every movement of his body, is a wonderful specimen of humanity walking on God's Earth."

( Sherring's Hindu Tribes and castes. )

**अध्यापनं**ब्रम्हयज्ञःपितृयज्ञस्तुतर्पणम् ।
होमोदैवोबलिर्भौतोनृयज्ञोऽतिथिपूजनम् ॥ ७० ॥

( मनुस्मृति. अध्याय ३. गृहस्थाश्रम. )

**स्वाध्यायेनित्ययुक्तः**स्याद्दान्तोमैत्रःसमाहितः ।
दातानित्यमनादातासर्वभूतानुकम्पकः ॥ ८ ॥

( मनुस्मृति. अध्याय ६. वानप्रस्थ. )

**अधीत्याविधिवद्वेदान्**पुत्रांश्चोत्पाद्यधर्मतः ।
इष्ट्वाचशक्तितोयज्ञैर्मनोमोक्षेनिवेशयेत् ॥ ३६ ॥

( मनुस्मृति. अध्याय ६. सन्यास. )

सदरीं अवतरण केलेल्या श्लोकांत, ज्या ठिकाणीं "अध्यापनम" हा शब्द आलेला आहे, त्या ठिकाणीं तदन्तर्गतच "अध्ययन" आहे, असें समजावयाचें. आणि, **मनुस्मृतीवर कुल्लुक भटाचार्यांनीं** जी टीका केली आहे, त्यावरूनही तें अगदीं स्पष्ट होतें. सदरहु टीकेंत **आचार्य** मजकूर असें स्पष्ट लिहितात कीं, "अध्यापन शब्देनाध्ययनमपि गृह्यते. जपोऽहुत मिति वक्ष्यमाणत्वादतोऽध्यापनमध्ययनंच ब्रह्मयज्ञः"

वेदाध्ययनाचा मुख्य हेतु.

इतकी जी **वेदाध्ययना**विषयीं सक्ती आमच्या दूरदृष्टी **ऋषींनीं** केली, त्याचा मुख्य हेतु **वेदसंरक्षण** आणि **विद्यार्जन**, हाच होय. व त्याचा इष्ट परिणाम-

ही उदयास आल्याचें उघड दिसत आहे. **वेद** घोकून त्यांचें पठण जर आम्ही **ब्राम्हणांनीं** केलें नसतें तर, आज आठ दहा हजार वर्षांच्या घडामोडींत, ते केव्हांच लयास गेले असते. इतकेंच नाहीं तर, त्यांचा आज मितीस बिलकुल मागमुसही राहिला नसता. आणि **वेदासारखा** अमूल्य रत्नसंग्रह आपल्या **भरतखंडातून**, किंबहुना पृथिवीच्या पाठीवरून, जर अजींच नाहींसा झाला असता तर ह्या देशालाचसें काय, पण अखिल जगाला, व मनुष्यमात्रलाही, अगदीं अपरिहार्य नुकसान पोहोंचलें असतें. व तें झालें नाहीं याबद्दल आपण आपल्या पूर्वजांचे, अखिल श्रोत्रिय वर्गांचे, आणि सर्व भिक्षुक मंडळींचे अति उपकार मानले पाहिजेत आमच्या श्रोत्रियवर्गांवर आणि भिक्षुकांवर कांहीं कांहीं सुधारलेल्या व इंग्रजी शिकलेल्या मंडळींची मोठी करडी नजर आहे. ते या बिचाऱ्या गरीबांची "**भटभाई,**" "**परान्न पुष्ट,**" "**भारवाहक,**" वगैरे विशेषणांनीं बरीच पूजा करतात. परंतु ती सर्वथैव अयोग्य आहे. त्यांनीं **वेद** पठण करून, त्यांचें ओझें बाळगीत बाळगीत आजमितीपर्यंत तें सलामत पोहोंचविलें, याबद्दल त्यांचें अत्युपकार न मानितां उलट त्यांची आपण निंदा केली तर, आपण खरोखरी कृतघ्नतेच्या दोषास मात्र

भिक्षुकांविषयीं अश्लाघ्य निंदा.

पात्र होऊं. कल्पना करा कीं, सदरीं निर्दिष्ट केलेल्या **'भारवाहकांनीं'** जर **षडंगवेदांचें** ओझें आपल्या जिव्हाग्रीं आज हजारों वर्षें वागविलें नसतें, तर हा आमचा अमूल्य **षडंगवेद** या पूर्वींच कोणीकडे कसा लयास गेला असता, याविषयीं कांहीं तरी पत्ता लागला असता काय? जो **वेदवृक्ष** उत्तरोत्तर अति विस्तीर्ण होत गेल्यामुळें, त्याचीं मुळें थेट पातालास जाऊन पोहोंहलीं, व ज्याच्या अग्रशाखा आकाशांत अंतर्धान पावल्या, तोच वृक्ष मध्यंतरींच रसातलास गेला असता तर आमची काय दशा झाली असती बरें? आमची मुळची स्थिति, आमचा धर्म, आमचे आचारविचार, आणि आमचें बुद्धिवैभव, ( जीं केवळ पाहूनच या भूतलांवरील सर्व राष्ट्रें तोंडांत बोटें घालतात, ) तीं ह्या जगाला कळविण्याला यत्किंचित् तरी मार्ग राहिला असता काय? खरोखर, वेद ठार बुडते तर, **हिंदूंचें हिंदुत्व** राहिलें नसतें. व आम्ही फारच शोचनीय दशेप्रत पोहोंचलों असतों. परधर्माची अनेक वावदळें आह्मांवरून जाऊन त्यांनीं आम्हांस संत्रस्त केलें, तरी देखील परधर्मापासून आह्माला यत्किंचित्‌ही धक्का न पोहोंचतां, आम्ही कायमच्या कायमच राहिलों आहों. हा प्रभाव केवळ **वेदाच्या** जबरदस्त कोटाचाच होय. व हा कोट आज हजारों वर्षें आमच्या नैष्टिक **भटसंऱ्यांनीं** जोंबाळून ठेवून,

त्यांचे आम्हांवर उपकार.

त्याचा एक दगडही ढांसळूं दिला नाहीं, याबद्दल त्यांचे खरोखर आह्मी मोठेच उपकार मानले पाहिजेत.

चार वेदांचें हल्लींच्या काळीं अध्ययन.

चाऱ्ही **वेद** ज्यांस मुखोद्गत आहेत, असे कांहीं **ब्राम्हण** आज मितीसही **भरतखंडांत** आहेत. व त्यांचें **वेदाध्ययन** इतकें शुद्ध व अस्खलित आहे कीं, एखाद्या छापील पोथींतील अथवा पुस्तकांतील पाठ किंवा स्वर चुकीचा असल्यास, तो चुकीचा असल्याविषयीं ते बेधडक व निःशकपणें सांगतात. ह्याचें कारण पाहूं गेलें तर, मुख्यत्वेंकरून वेदपठण करण्याची उत्तम शिक्षणपद्धति होय. आणि ही **शिक्षणपद्धति** तितक्याही पुरातन काळीं, इतक्या पूर्णत्वास पोहोंचली होती कीं, तिचें आजकाल **पाश्चिमात्य** लोकही सकौतुकाश्चर्य वर्णन करतात. **भट्ट मोक्षमुलर** ह्मणतात कीं:—

"Now the Rig-veda alone, which contains a collection of ten books of hymns addressed to various deities, consists of 1,017 ( 1,028 ) poems, 10,580 verses, and about 1,53,826 words. How were these poems composed—for they are composed in very perfect metre—and how, after having been composed, were they handed down from 1500 before christ to 1500 after christ, the time to which most of our best sanskrit Mss. belong ?"

" Entirely by memory. This may sound starting, but—what will sound still more startting, and yet is a fact that can easily be ascertained by any body who doubts it at the present moment, if every Ms. of the Rig-veda were lost, we should be able to recover the whole of it—from the memory of the Shrotriyas in India. These native students learn the Veda by heart, and they learn it from the mouth of their Guru, never from a Ms., still less from my printed edition,—and after a time they teach it again to their pupils. "

" I have had such students in my room at Oxford, who not only could repeat these hymns, but who repeated them with the proper accents ( for the Vedic Sanskrit has accents like Greek ), nay who when looking through my printed edition of the Rig-veda, could point out a misprint without the slightest hesitation. "

" I can tell you more. There are hardly any various readings in our Mss. of the Rig-veda, but various schools in India have their own readings of certain passages, and they hand down those readings with great care. So, instead of collating Mss. as we do in Greek and Latin, I have asked some friends of mine to

collate those Vedic students, who carry their own Rig-veda in their memory, and to let me have the various readings from these living authorities."

"Here then we are not dealing with theories, but with facts, which any body may verify. The whole of the Rig-veda, and a great deal more, still exists at the present moment in the oral tradition of a number of scholars who, if they liked, could write down every letter, and every accent, exactly as we find them in our old Mss."

"Of course this learning by heart is carried on under a strict discipline; it is, in fact, considered as sacred duty."

What can India teach us ? P. P. 208 209.

वेद पठण व शिक्षणनैपुण्य.

ज्याला **वैदिक** किंवा **श्रोत्रिय** होण्याची इच्छा असेल, त्यानें समग्र **ऋग्वेद** संहिता प्रथम ह्मटली पाहिजे. तदनंतर **ब्राम्हणें, अरण्यकें,** आणि **सूत्रें,** यांचें पठण केलें पाहिजे. व त्यानंतर **शिक्षा, छंदस, व्याकरण, निरुक्त, ज्योतिष,** आणि **कल्प,** यांचें चांगलें अध्ययन केलें पाहिजे. हें अध्ययन **गुरुच्या** घरीं सुमारें आठ वर्षें करावें लागतें, आणि तें फारच श्रमाचें व मोठ्या मेहेन-

तीचें काम आहे. तथापि, गुरुदाक्षिण्य आणि शिक्षण-नैपुण्य, यांचाही अशा वेळीं पुष्कळ उपयोग होतो.

आर्यशिक्षण कला.

आमच्या शिक्षणपद्धतीविषयीं **मोक्ष-मूलरभट्ट** असें लिहितात कीः-

"The art of teaching had even at that early time been reduced to a perfect system and at that time certainly there is not the slightest trace of any thing, such as a book, or skin, or parchment, a sheet of paper, pen, or ink, being known even by name to the people of India ; while every expression connected with what we should call literature, points to a literature ( we cannot help using that word ) existing in memory only, and being handed down with the most scrupulous care by means of oral tradition."

( What can India teach us ? P. 214. )

वेदांची सर्वज्ञता.

आमचे चाऱ्ही **वेद, वेदांगें,** व **उपांगें,** यांचें समग्र आणि सावधान जो अवलोकन करील, त्यास असें सहज दिसून येईल कीं, आमच्या **आर्य लोकांच्या** तडाक्यांतून व तीक्ष्णान्वेषणांतून कोणताच विषय निसटून गेला नाहीं. त्यांनीं **धर्मान्वेषण** करून वर्णाश्रमधर्म, धर्ममीमांसा, योगमीमांसा, आणि अंध्यात्मज्ञान, या विषयांवर मोठे मोठे ग्रंथ लिहिले. **शास्त्रान्वेषण** करून व्याकरण, न्याय, ज्योतिःशास्त्र, गणित, बीजगणित, भूमिति-

शास्त्र, अलंकारशास्त्र, छंदशास्त्र, अर्थशास्त्र, औषधिविद्या, शल्यशास्त्र, पशुचिकित्सा, इत्यादि विषयांवर हजारो ग्रंथसमूह रचला. व **कलान्वेषण**करून युद्धकला, गायनकला, वाद्यकला, नाट्यकला, निर्माणशिल्प, वास्तुकला, यंत्रकला, आणि चित्रकला, या विषयांवर अनेक ग्रंथ लिहिले. याशिवाय गद्यपद्यात्मक काव्यकलाप, म्हणजे महाकाव्यें, नाटकें, कादंबऱ्या, चंपु, शब्दकोश, कल्पितकथा, आणि इतर लहान लहान गद्यें, यांचीही खाण खणून ठेविली. एकंदरींत चौदा विद्या, व चौसष्ट कला, यांत हिंदूंचें विशारदत्व असल्याविषयीं आजमितीसही सर्वांस महशूर आहे.

उपनिषदांचें सामर्थ्य.

या सर्वांच्या शिरोभागी **वेदान्त** व **उपनिषदादि** भाग असून, त्यांतच आमच्या **ब्राह्मणांनीं** आपलें सर्व बुद्धिवैभव खर्च केल्यासारखें दिसतें. त्याविषयीं प्रसिद्ध **जर्मन् पंडित भट्टमोक्षमुलर** आणि **शोपेन् हॉयर** हे असें लिहितात कीः-

" * * * * * It found its true self in the Highest Self, and the oneness of the subjective with the objective Self was recognised as underlying all reality, as the dim dream of religion—as the pure light of philosophy. "

" This fundamental idea is worked out with

systematic completeness in the Vedánta philosophy and no one who can appreciate the lessons contained in Berkeley's philosophy, will read the Upanishads and the Brahma-sutras and their commentaries without feeling a richer and a wiser man."

* * *

"If you think that I exaggerate, let me read you in conclusion what one of the greatest philosophical critics—and certainly not a man given to admiring the thoughts of others—says of the Vedànta and more particularly of the Upanishads. Schopen hauer writes :

'In the whole world there is no study so beneficial and so elevating as that of the Upanishads. It has been the solace of my life—it will be the solace of my death.'

( What can India teach us ? P. P. 253-254. )

( Sacred Books of the East vol I. The Upanishads, translated by Max-muller. Introduction. P. LXI. )

उपनिषदांची अनुपमेयता.

याप्रमाणें नामांकित तत्वान्वेषी व गुणागुणज्ञ शोपेन हॉयर यास उपनिषदें हीं त्याच्या आयुष्याचें जीवन, आणि त्याच्या अन्तकाळचें विश्रांतिस्थानच होऊन राहिलीं होतीं. व खरोखर पाहतां मनुष्याचें अज्ञान, त्याचा उद्वेग, आणि त्याची तृष्णा, हीं सर्व मोडून त्यास शांति

व प्रफुल्लता देणारा, उपनिषदांसारखा दुसरा कोणताही ग्रंथ ह्या पृथिवीच्या पाठीवर नाहीं, असें ह्मटलें तर अयथार्थ होईल असें वाटत नाहीं.

ज्याप्रमाणें पारमार्थिक विषयांत आह्मी अगदीं उच्च शिखराप्रत जाऊन पोहोंचलों होतों, त्याप्रमाणेंच ऐहिक सुखांतही आमचें पाऊल पुढेंच होतें. त्याकाळीं विद्यार्जनांत व दुसऱ्या हरएक सदुद्योगांत, युवतीजनांची भरपूर व निष्प्रांजळ मदत, आणि पवित्र व उत्तम साहचर्य असल्यामुळें, आमच्या सुखास पारावार नव्हता. आमची उत्तम गृहस्थिति, अनुपम प्रेम, निष्कलंक पातिव्रत्य, आणि निःसीम पवित्रता, हीं पाहून सर्व जगास विस्मय वाटे. व हल्लींही कांहीं निःपक्षपाती लोकांस तो वाटत आहे. सर ज्यॉर्ज बर्डवूड हे एके ठिकाणीं हिंदुगृहस्थितीविषयीं असें लिहितात कीः—

'The marriage laws of the Hindoos have served to Create the highest type of Family life known. For its Simplicity, affection, reverence, and purity, it is absolutely inapproachable by any other nation."

या प्रकारची स्थिति असल्यामुळें, हिंदूंचा व त्यांतही विशेषतः ब्राह्मणांचा, अर्थात्च सर्वांवर पगडा बसला. आणि ह्याचें मुख्य कारण म्हटलें ह्मणजे त्यांचें कडकडीत आचरण, मनःसंयमन, व बुद्धितेजच होय. याविषयीं जर्मनींतले प्रोफेसर वेबर असें लिहितात कीः——

" We must, at any rate, assume among the Bràhmans of this period a very stirring intellectual life, in which even the women took an active part, and which accounts still further for the . superiority maintained and exercised by the Brahmans over the rest of the people. "

* * * women who with enthusiastic ardour plunge into the mysteries of speculation, impressing and astonishing men by the depth and loftiness of their opinions, and who—while in a state which, judging from description, seems to have been a kind of somnambulism,—solve the questions proposed to them on sacred subjects. "

( History of Indian Literature. )

P. P. 21-22

---

# भाग २१ वा.

## वेदान्तशास्त्र.

वेदान्तविषय.

**धर्मशास्त्रा**नंतर दुसरा महत्वाचा शास्त्रीय विषय ह्मटला ह्मणचे **वेदान्तविषय** होय. ह्या विषयासारखें समाधान दुसरीकडे कोठेंही नाहीं. सृष्टीचा मूळ हेतु; उत्पत्ति, स्थिति, आणि लय, यांचें **आदिकारण**; व आपण कोठून आलों, कशा करितां आलों, आणि कोठें जावयाचें, याविषयीं साधकबाधक कारणांची उत्तम व पूर्ण मीमांसा त्यांत असते. हा सर्व **वेदान्त**विषय, आणि **उपनिषदें**, जो अवलोकन करून त्यांचें पूर्ण मनन करील, त्याला **शान्तीचें माहेरघर** प्राप्त झाल्याशिवाय कधींही राहणार नाहीं. ह्या **वेदान्त**विषयाचीं अनेक दर्शनें असून, त्यांत भिन्न भिन्न मतें प्रदर्शित केलेलीं आहेत.

षड्दर्शनें.

हीं दर्शनें मुख्य सहा आहेत. १ **सांख्यदर्शन**, २ **योगदर्शन**, ३ **जैमिनिदर्शन** ( ज्याला **कर्ममीमांसा** अथवा **पूर्वमीमांसा** ह्मणतात ), ४ **वेदान्तदर्शन** (ज्याला **ब्रह्ममी**-

**मांसा** अथवा **उत्तरमीमांसा** ह्मणतात ), ५ **वैशेषिक-दर्शन**, आणि ६ **न्यायदर्शन.**

सांख्यदर्शन.

**सांख्यदर्शनाला, निरीश्वरवाद** असेंही नांव आहे. तथापि त्यांतही निरीश्वर आणि सेश्वर अशीं दोन मतें आहेत. **कपिल, आसुरी,** आणि **पंचशिख,** इत्यादि निरीश्वर मतांतले होते. व **पतञ्जलि, व्यास,** आणि **याज्ञवल्क्य,** इत्यादि सेश्वर मतांतले होते; त्यामुळें त्यांच्या मताचा **योगदर्शन** हा स्वतंत्र भाग झाला आहे.

परिणामवाद.

ह्या सर्वांत अतिपुराण तत्वदर्शन ह्मटलें ह्मणजे **सांख्यदर्शन** होय. यांत सत्कार्यवाद अथवा परिणामवाद मानिला आहे. ह्मणजे कार्य हें कारणामध्यें सूक्ष्म रूपानें असून, तें कारण-सामुग्रीचें सन्निधान झालें असतां व्यक्त होतें. किंवा कारणच कार्यस्वरूपानें परिणाम पावतें. परंतु तें कार्य नवीन उत्पन्न होत नाहीं. जसें दहीं दुधामध्यें, पट तंतूमध्यें, आणि घट मृत्तिकेमध्यें, सूक्ष्म रूपांनीं मूळचींच रहात असून, तीं कारण-सामुग्रीच्या संनिधानानें आविर्भूत होतात, किंवा परिणाम पावतात. ह्मणजे दुग्ध, तंतु, व मृत्तिका, हीं यथानुक्रमें अम्ल व काल, तुरी व वेम, आणि दण्ड व कुलाल, इत्यादि कारण-सामुग्रीच्या संनिधानानें परिणाम पावून, दधि, पट, व घट, या अवस्थेप्रत पोहोंचतात.

त्याचा आदि प्रवर्तक कपिल महामुनि.

**सांख्यदर्शनाचा** आदिप्रवर्त्तक **कपिल** महामुनि होय. ह्यानें "अथ त्रिविध दुःखात्यंत निवृत्तिरत्यन्तपुरुषार्थः" या सूत्रापासून "यद्वा तद्वातदुच्छित्तिः पुरुषार्थ स्तदुच्छित्तिः पुरुपार्थः" या सूत्रापर्यंत, षड्ध्यायी **सांख्यप्रवचन** ग्रंथ केला, आणि तो आपल्या **आसुरि** नामक शिष्यास सांगितला. ह्यानें **पराशर** गोत्रांतील **पंचशिख** नांवाच्या शिष्यास उपदेश केला. तदनंतर ह्या शिष्यपरंपरेपासून जें सांख्यदर्शन प्राप्त झालें, त्याचें सार व सिद्धान्त हीं समग्र अवलोकन करून, **ईश्वरकृष्ण** या पण्डितानें **सांख्यकारिका** नांवाचा सुबोध ग्रंथ रचला. ह्या सांख्यकारिकेवर **गौडपादाचार्यानें** ( **शंकराचार्यांच्या** परम गुरूनें ) भाष्य केलें आहे. पूर्वोक्त **सांख्यप्रवचनाचे** सहा अध्याय आहेत. १ विषयाध्याय. २ प्रधानकार्य. ३ वैराग्य. ४ आख्यायिका. ५ परपक्षनिर्जय. आणि ६ तंत्राध्याय. तशींच ह्याचीं साठ तंत्रें आहेत, म्हणजे तितके पदार्थ मानिले आहेत. ते खालीं लिहिल्याप्रमाणें:—

त्याचा सांख्यप्रवचन नामक ग्रंथ.

**" पुरुषः प्रकृतिर्बुद्धि हंकारो गुणास्त्रयः ।**
**तन्मात्र मिन्द्रियंभूतं मौलिकार्थाः स्मृतादश ॥**
**विपर्यतः पंचविधस्तथोक्ता नव तुष्टयः ।**

**करणानामसामर्थ्यमष्टा विंशतिधामतम् ॥**

**इति षाष्टिः पदार्थानामष्टाभिः सहसिद्धिभिः।**"इति।

ह्या साठ पदार्थांचें यथार्थ ज्ञान झालें असतां **जीव** त्रिविधतापांतून मुक्त होतो. आतां **आध्यात्मिक, आधिदैविक,** आणि **आधिभौतिक,** असे त्रिविधताप असून, शारीरिक व मानसिक दुःख पहिल्या वर्गांतलें; ग्रहभूतादिजनित दुःख दुसऱ्या वर्गांतलें; आणि कीटक पशुपक्ष्यादिजनित दुःख तिसऱ्या वर्गांतलें होय. पूर्वोक्त साठ पदार्थांपैकीं मुख्य तत्वें पंचवीस आहेत, तीं येणेंप्रमाणेंः—मूलप्रकृति, महत्तत्व किंवा बुद्धि, अहंकार, पंचज्ञानेन्द्रियें ( चक्षु, रसना, घ्राण, त्वक्, आणि श्रोत्र ), पंचकर्मेन्द्रियें ( वायु अथवा शौचस्थान, उपस्थ अथवा मूत्रस्थान, हस्त, पाद, आणि वाक् ), मन, पंचतन्मात्रें ( शब्द, स्पर्श, रस, रूप, आणि गंध ), पंचमहाभूतें ( पृथिवी, अप, तेज, वायु, आणि आकाश ), व पुरुष ( किंवा जीव ). हे सर्व पदार्थ **प्रकृती**ला ह्मणजे **मूलकारणाला** सत्त्वरजस्तमोगुणांच्या योगानें व्यक्त करता येतात, किंवा लयाप्रत नेतां येतात.

सिंहावलोकन.

सांख्यशब्द प्रथमत **तैत्तिरीय** व **अथर्वोपनिषदांत** आढळतो. तसेंच तो **निरुक्तांत** आणि **भगवत्गीतेंत**ही दृष्टीस पडतो. आतां सांख्यदर्शनाचे प्रवर्तक **कपिल**, व त्याचे परंपरेनें

झालेले शिष्य **आसुरि** आणि **पंचशिख** असे असून, त्यांचीं नांवें **कपिल** सूत्रांत **बृहदारण्यकांत**, व **शतपथ ब्राह्मणांत** आढळतात. तसेंच **बुद्धचरित्रा**संबंधीं **जैन लोकांचीं** जीं धर्मपुस्तकें आहेत, त्यांत **कपिल** आणि **पंचशिख** यांचा विपुल उल्लेख केल्याचें आढळतें. त्यावरून **बुद्धाच्या** अगोदर **कपिल** महामुनि हा बरींच शतकें होऊन गेला असावा, यांत बिलकुल शंका नाहीं.

कपिलाचा काल.

आतां, **कपिलाचा** काल स्वतंत्र रीतीनें खात्रीपूर्वक समजण्यास हल्लीं जरी कांहीं सुद्धां साधन उपलब्ध नाहीं, तरी **बुद्धा**च्या काळावरून त्याच्या कालाचें अनुमान होऊं शकेल. सबब **बुद्धाच्या** कालाविषयीं संक्षेपतः विचार करूं. **बुद्धा**विषयीं जे जे वृत्तान्त **बौद्धांनीं** लिहिलेले आहेत, ते असंबद्ध व भिन्न भिन्न आहेत. ह्मणजे इसवी सनाच्या पूर्वीं २४२२ वर्षांपासून तों इ० स० च्या पूर्वीं ५४३ पर्यंतच्या कालांत **बुद्ध** होऊन गेला असल्याविषयीं निरनिराळ्या ग्रंथकारांचें पृथक् पृथक् वर्णन आहे. तथापि, इ० स० पूर्वीं ५४३ व्या वर्षीं, **बुद्धाचा** निर्वाणकाल असल्याविषयीं, इतिहास प्रमाणांवरून हल्लीं सिद्धवत् मानिलें आहे. आणि ज्या अर्थीं **सांख्यमतास** अनुसरूनच **बौद्ध** धर्माचीं निरीश्वरमतें होतीं, त्या अर्थीं **बुद्धाचा** जन्म होण्यापूर्वीं हें **सांख्यमत** पुष्कळ शतकें

उदयास आलें असून, तें अनेक शतकें प्रचारांतही असावें, असें ठरतें. व त्यावरूनच **कपिलाचा** काल इसवी शकापूर्वी एक हजार वर्षांवर असावा असें अनुमान होतें.

योगदर्शन, व त्याचा प्रवर्त्तक पतंजलि.

**योगदर्शन** हें सदरीं निर्दिष्ट केल्याप्रमाणें **सांख्यदर्शनाचाच** भाग असून, कोठें कोठें त्या ऐवजीं **सांख्ययोग** असाही उपयोग केल्याचें आढळतें. मात्र इतकेंच कीं, **सांख्यदर्शनाप्रमाणें योगदर्शनांत** निरीश्वर मतवाद नाहीं. **योगदर्शनाचे** मुख्य प्रवर्त्तक **पतञ्जलि** आणि **याज्ञवल्क्य** असून ते ईश्वरवादी होते. सुप्रसिद्ध **महाभाष्य** ह्याच **पतञ्जलीनें** केलें असल्याविषयीं कल्पना आहे.

सिंहावलोकन.

योग या शब्दाचा अर्थ **ईश्वरसायुज्य**, अथवा निर्वाण, किंवा **परेब्रह्मणिलय**, असा असून तो **तैत्तिरीयारण्यक**, आणि **काथकोपनिषद्**, यांत, त्याच अर्थानें आढळतो.

**पतंजलीनें ईश्वराचें** लक्षण खालीं लिहिल्याप्रमाणें दिलें आहेः—

**“ क्लेशकर्मविपाकाशयै**
**रपरामृष्टः पुरुषविशेषईश्वरः । ”**

पंच क्लेश म्हणजे अविद्या, अस्मिता, राग, द्वेष, आणि अभिनिवेश; कर्मचतुष्टय ह्मणजे शुक्ल, कृष्ण, शुक्लकृष्ण, आणि अशुक्लाकृष्ण; विपाक ह्मणजे कर्मफलें; व आशय

ह्मणजे संस्कार; हीं ज्या पुरुष विशेषाला कालत्रयीं देखील स्पर्श करीत नाहींत, तो **ईश्वर** होय.

**पतंजलि** हा इसवी सनापूर्वी १४३ वर्षांवर, **कनिष्कराजा**च्या कारकीर्दीत उदयास आला होता.

जैमिनीदर्शन.

**जैमिनिदर्शनाला पूर्वमीमांसा** असें नांव आहे. तसेंच, ज्ञान प्राप्त होण्यासाठीं अगोदर कर्मच केलें पाहिजे अशाविषयीं या दर्शनांचा फारच कटाक्ष असल्यामुळें, त्यास **कर्मकांड**, किंवा **कर्ममीमांसा**ही म्हणतात. यांत कर्माचे नित्य, नैमित्तिक, व काम्य, असे तीन भेद केले आहेत. उदाहरणार्थ, संध्यावंदनादि नित्य कर्म होय; ग्रहण स्नानादि नैमित्तिक; आणि ज्योतिष्टोमादि काम्य कर्म होय. त्याप्रमाणेंच विधीचेही अपूर्व, नियम, व परिसंख्या, असे तीन प्रकार सांगितले आहेत. **जैमिनीनें** " अथातो धर्म जिज्ञासा " येथून " अन्वाहार्येच दर्शनात " येथपर्यंत **पूर्वमीमांसादर्शना**चे बारा अध्याय केले आहेत. ते सूत्रबद्ध असून त्यांजवर **शबरस्वामींचें** भाष्य आहे. शिवाय **कुमारिलभट्ट, विद्यारण्यस्वामी, मुरारिमिश्र,** इत्यादींनींही त्यांजवर टीकारूप ग्रंथ केले आहेत.

त्याचा काळ.

**जैमिनी** हा कर्ममीमांसा सूत्रांचा प्रवर्त्तक असून, शिवाय **सामवेदा**चाही प्रकाशक असल्याविषयीं **पुराणान्तरीं** माहिती

मिळते. व त्याचें नांव **ऋग्वेदाच्या गृह्यसूत्रांत** आढळतें. आतां, **जैमिनीची पूर्वमीमांसा** ही **वेदान्तदर्शन** किंवा **उत्तरमीमांसा** हिच्या अगोदरच प्रकट झाली होती, असें त्यांच्या नामधेयावरूनच प्रत्यक्ष सिद्ध होतें. आणि जर **उत्तरमीमांसा** ही इसवी शकापूर्वीं १४०० वर्षांच्या सुमारास प्रणीत झाली होती असें मानलें, तर ह्या वर्षांपूर्वींही जैमिनिदर्शनाचा काळ होता, असें मानण्यास बिलकुल हरकत नाहीं.

त्याचें मूलतत्व.

ह्या दर्शनाचें मूलतत्व असें आहे कीं, आत्मा हा सच्चिदानंद स्वरूप असून, त्याची सत्वरजस्तमोगुणात्मकीं प्रकृति आहे. ह्या प्रकृतीचे दोन भेद आहेत. एक माया, आणि दुसरी अविद्या. माया सत्वशुद्ध असून, अविद्या विशुद्ध आहे. मायेला आपल्या स्वाधीन करून घेऊन तिजवर आपला पगडा बसविल्यावर सर्वज्ञता, ईशशक्ति, आणि सर्व नियंतृत्व प्राप्त होतें. नाहींपेक्षां या कलेवराची परतंत्रता, व तत्संबंधीं आधिव्याधिजनित् दुःख, आणि त्रिविधताप, हे निरंतर अविद्येच्या कारणानें भोगावे लागतात. यासाठीं, तन्निवारणार्थ, प्रत्येक मनुष्यानें जीवेश्वराचें ऐक्य व्हावें या हेतूनें, कर्माचरण करून अंतःकरणशुद्धी मिळविली पाहिजे.

**वेदान्तदर्शनाला उत्तरमीमांसा, ब्रह्ममीमांसा, शारीरकमीमांसा**, किंवा **वेदान्त** अशींही नांवें आहेत.

वेदान्तदर्शन.

" मीमांसा " शब्दाचा अर्थ निरूपण असा असून, हा शब्द **ब्राम्हणांत**, याच अर्थानें आढळतो. **वेदान्त** शब्द **तैत्तिरीय-आरण्यकांत**, तसेंच **कायकोपनिषद्**, **मंडुकोपनिषद्**, इत्यादि ठिकाणीं आढळतो. **वेदान्त** ह्मणजे सर्व **उपनिषदांच्या** इत्यर्थाचें एकीकरण होय. यांत **परमेश्वर** हा सर्वव्यापी असून, तो शुद्ध, बुद्ध, मुक्त, व सर्वज्ञ आहे, असें मानिलें आहे. तसेंच तो ह्या अखिल जगाचें **आदिकारण** असून, त्या जगाची उत्पत्ति, स्थिति, व लय, हीं केवळ इच्छा मात्रेंकरून करण्याचें त्याचें सामर्थ्य आहे.

त्यांतील तत्वें.

हा **परमेश्वर परब्रह्म** स्वरूप असून, भूत, वर्तमान, आणि भविष्य, ह्या तिन्ही काळीं अबाधित आहे. तो अनंत असून देश, काल, व वस्तुपरिच्छेद रहित आहे. तो केवळ **आत्माच** आहे, आणि **सत्** ह्या उपलक्षणानें अलंकृत असा **आत्मा**, सृष्टीच्या पूर्वीपासून आहे. **आत्मा** व **ब्रह्म** हें एकच आहे. त्याच्या ठिकाणीं नाना ह्मणजे अनेक, किंवा द्वैत, असें बिलकुल नाहीं. आतां जें जें म्हणून भिन्न भिन्न भासमान होतें, अथवा जो जो द्वैतभाव दृग्गोचर होतो, किंवा जी जी असमता दृष्टीस पडते, त्यापैकीं एकही खरें नसून, तें सर्व अज्ञान व भ्रांतिमूलक आहे. हें अज्ञान ह्मणजेच बंधन आणि ज्ञान ह्मणजेच

मोक्ष होय. ब्रह्मवेत्ताच परब्रह्म पावतो आणि ब्रह्मस्वरूपीं मिळतो. जो कोणी ब्रह्म व आत्मा हीं भिन्न समजतो, तो खचित भय पावतो. जो ब्रह्मास असत् ह्मणजे नाशवंत समजतो, तो स्वतःच असत् होतो. ब्रह्म निर्विकार असल्यामुळें तें तिन्ही अवस्थेंत आहे तसेंच राहतें. व पंचकोशरूपी गुहेंत साम्राज्य करीत असलेल्या ब्रह्माप्रत जो जाणतो, त्याचेच इच्छित मनोरथ सिद्धीस जातात. ह्या प्रकारचें अद्वैत मत हेंच वेदान्तदर्शन असून, त्याविषयीं श्रुतीचीं वचनेंही आहेत; सबब त्यांतील मुद्याचे वेंचे याखालीं देतों:—

तत्संबंधीं श्रुतीचीं वचनें.

'सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म'। 'सदेव सौम्येदमग्र आसीत्'। 'आत्मा वा इदमेक एवाग्र आसीत्'।एकमेवाद्वितीयं ब्रह्म। 'नेह नानास्ति किंचन'। 'ज्ञानादेव तु कैवल्यम्'। 'ब्रह्मविदाप्नोति परम्'। 'यदा ह्येवैष एतस्मिन्नुदरमन्तरं कुरुते अथ तस्य भयं भवति'। 'असन्नेव स भवति' 'असद्ब्रह्मेति वेद चेत्'। 'अस्ति ब्रह्मेति चेद्वेद संतमेनं ततो विदुरिति'। 'यो वेद निहितं गुहायां परमेव्योमन्सो।श्नुतेसर्वान्कामान्सह'। 'तत्त्वमसि'। 'अहं ब्रह्मास्मि'। 'प्रज्ञानं ब्रह्म'। 'अयमात्मा ब्रह्म'।

या दर्शनांत इच्छाशक्ति, ईशप्रसाद, कर्मविपाक, पुनर्जन्म, आणि श्रद्धामाहात्म्य, यांविषयींही विवेचन केलें आहे.

वेदान्तदर्शनाचा प्रवर्तक व्यास.

**वेदान्तदर्शनाचा** प्रवर्तक **व्यास बादरायण** हा असून, तो इसवी शकाच्या पूर्वी १४०० १५०० वर्षांच्या सुमारास झाला असल्याविषयीं कल्पना आहे. **जैमिनीच्या कर्ममीमांसासूत्रांत, आत्रेय, बादरि, बादरायण,** वगैरे आचार्यांचीं नांवें दृष्टीस पडतात.

वैशेषिकदर्शन.

**वैशेषिकदर्शनास औलूक्यदर्शन, तर्कशास्त्र,** किंवा **पदार्थविज्ञानशास्त्र,** असें म्हणतात. वैशेषिक म्हणजे ज्यानें एक प्रकारचा विशेष पदार्थ मानिला आहे तो होय. आणि त्याची व्याख्या खालीं लिहिल्याप्रमाणें आहे.

**द्वित्वे च पाकजोत्पत्तौ विभागे च विभागजे ।**
**यस्य न स्खलिता बुद्धिस्तं वै वैशेषिकं विदुः ॥**

त्याचा प्रवर्तक कणाद ऋषि.

हें शास्त्र **काश्यपगोत्रांतील कणाद** नांवाच्या ऋषीनें केलें असून, त्याचें " अथातो धर्मं व्याख्यास्यामः " येथपासून " तद्वचनादाम्नायस्य प्रामाण्यम् " येथपर्यंत सूत्रबद्ध दहा अध्याय आहेत; व प्रत्येक अध्यायांत दोन दोन आन्हिकें आहेत. त्यांतील विषय संक्षेपतः खालीं लिहिल्याप्रमाणें आहेतः—१ समवेतपदार्थनिरूपण; २ द्रव्यनिरूपण; ३ आत्ममनोनिरूपण; ४ शरीरपरमाणुनिरूपण; ५ शारीर व मानसिक कर्म निरूपण; ६ श्रौत-

धर्म निरूपण; ७ गुणसमवाय निरूपण; ८ निर्विकल्पसविकल्पप्रामाण्यव्यवस्थानिरूपण; ९ बुद्धि निरूपण; आणि १० अनुमान भेद निरूपण.

वैशेषिकदर्शनाचीं मूलतत्त्वें.

ह्या दर्शनांत एकंदर सहा पदार्थ मानिले आहेत. १ द्रव्य, २ गुण, ३ कर्म, ४ सामान्य, ५ विशेष, आणि ६ समवाय. हे सर्व भावपदार्थ असून, ७ सातवा पदार्थ जो अभाव तोही कणादाला संमत असल्याविषयीं पंडितांची कल्पना आहे. द्रव्याचे नऊ प्रकार आहेत. १ पृथ्वी, २ जल, ३ तेज, ४ वायु, ५ आकाश, ६ काल, ७ दिशा, ८ आत्मा, आणि ९ मन किंवा अंतःकरण. गुणाचे चोवीस भेद सांगितले आहेत. १ रूप. २ रस. ३ गंध. ४ स्पर्श. ५ संख्या. ६ परिणाम. ७ पृथक्त्व. ८ संयोग. ९ विभाग. १० परत्व. ११ अपरत्व. १२ गुरुत्व. १३ द्रवत्व. १४ स्नेह. १५ शब्द. १६ बुद्धि. १७ सुख. १८ दुःख. १९ इच्छा. २० द्वेष. २१ प्रयत्न. २२ धर्म. २३ अधर्म. आणि २४ संस्कार. कर्माचे पांच भेद आहेत. १ उत्क्षेपण. २ अपक्षेण. ३ आकुंचन. ४ प्रसरण. आणि ५ गमन. सामान्य किंवा जाति याचे दोन भेद आहेत. १ परसामान्य, ह्मणजे द्रव्यत्व; आणि २ अपरसामान्य, ह्मणजे पृथ्वी. आतां, "विशेष" या पदार्थाचें संक्षेपतः निरूपण असें आहे कीं, आकाश आणि परमाणु इत्यादि द्रव्यें नित्य, ह्मणजे

उत्पत्ति व नाशरहित, असल्याकारणानें तीं निरवयव आहेत. तेव्हां, त्या नित्यद्रव्यांचे परस्परांमध्यें भेदक असे अवयव नसल्यामुळें, त्यांचा भेदक असा " विशेष " या नांवाचा पदार्थ मानिला आहे. अभाव या पदार्थांचे १ प्रागभाव, २ प्रध्वंस किंवा नाश, ३ अत्यंताभाव, आणि ४ अन्योन्याभाव, असे चार भेद आहेत.

याप्रमाणें प्रत्येक पदार्थान्तर्गत असलेल्या गुणधर्मांचें सम्यग् ज्ञान झालें ह्मणजे शोक व मोह लयास जाऊन, शान्तीचा झरा अक्षय्य वाहूं लागतो. आणि यच्चयावत् मिथ्याज्ञानाची निवृत्ती होऊन, समाधानसुखैश्वर्यांचें अखंड साम्राज्य प्राप्त होतें.

वैशेषिकसूत्रावर पादाचार्यांचें भाष्य.

वैशेषिक सूत्रांवर **पादाचार्यांनें** भाष्य केलें असून त्या भाष्यावर **उदयनाचार्यांची** टीका आहे. ह्या **उदयनाचार्यांनें** प्रसिद्ध **न्यायकुसुमांजलि** वगैरे ग्रंथ रचून सर्व नास्तिकमतांचें यथार्थ खंडन केलें आहे. ह्या वैशेषिक दर्शनांत सर्वसृष्टि परमाणूपासून ईशेच्छेनें निर्माण झाली असल्याविषयीं प्रतिपादन केलें आहे.

न्यायदर्शन व त्यांतील विषय.

**न्यायदर्शनास आन्वीक्षिकी** विद्याही ह्मणतात. न्यायदर्शन सूत्रबद्ध असून त्यांत एकंदर पांच अध्याय, व प्रत्येक अध्यायांत दोन दोन आन्हिकें आहेत.

यांत (१) पदार्थलक्षण; (२) अर्थापत्ति व संशयानिरूपण; (३) आत्मा, शरीर, इंद्रिय, बुद्धि, व मन, यांचे निरूपण; (४) प्रवृत्ति, दोष, प्रेत्यभाव, फल, दुःख, आणि अपवर्ग (मोक्ष), यांचें निरूपण; व (५) चोवीस जाती, आणि बावीस निग्रहस्थानें यांचें निरूपण; अशी विषययोजना आहे. तसेच ह्यांत प्रमाण, प्रमेय, संशय, प्रयोजन, दृष्टांत, सिद्धांत, अवयव, तर्क, निर्णय, वाद, जल्प, वितंडा, हेत्वाभास, छल, जाति, आणि निग्रहस्थान, असे सोळा पदार्थ सांगितले आहेत. ह्या सर्वांचें यथार्थ ज्ञान झालें ह्मणजे प्रवृत्ति, मिथ्याज्ञान, व अविद्या, यांचा साहजीकच नाश होऊन, चित्तास सदैव समाधान प्राप्त होतें.

न्यायदर्शनाचा प्रवर्तक गौतम.

**न्यायदर्शना**चा प्रवर्तक **गौतम** असून, त्याला **अक्षपाद** अशीही संज्ञा आहे. यांत जगताची उत्पत्ति ईशेच्छेनें परमाणूपासून झाली असल्याविषयींचें प्रतिपादन आहे. ह्या दर्शनांतील "तर्क" शब्द **काठकोपनिषदांत** आढळतो. व "नैयायिक," आणि "केवळ नैयायिक," हीं पदें **पाणिनी**च्या सूत्रांत आढळतात, त्यावरून हें न्यायदर्शन **पाणिनी**च्या पूर्वीं झालेलें असावें असें वाटतें. आतां **वेदान्त सूत्रांत**, **वैशेषिक दर्शना**चें खण्डन केल्याचें, अनेक वेळां दिसून येत असून, त्यांत **गौतम** दर्शनाचा कोठेंही उल्लेख केल्याचें

आढळून येत नाहीं. त्यावरून वैशेषिक दर्शनानंतर न्याय-दर्शन झालें असावें, असें अनुमान होतें. **पाणिनी**चा काल इ० स० पूर्वी सातशें वर्षें असल्याविषयीं, फार प्रसिद्ध आणि विद्वान पंडित डाक्तर **भांडारकर**[1] यांचें ठाम मत आहे.

हिंदूंपासून प्राप्त झालेलें ग्रीक लोकांचें ज्ञान.

हीं सर्व **दर्शनें ग्रीक** लोकांनीं आम्हां **हिंदूं**पासूनच शिकून घेतलीं असून, **आरिस्टॉटल** आणि **पायथ्यागोरास** यांच्या ग्रंथांत त्यांचें हुबेहूब प्रतिबिंब दिसून येतें. याविषयीं विद्वन्मणि **कोलब्रूक** असें लिहितात कीः—

"The Hindoos were, in this instance, the "teachers, and not the learners."

(Transactions of the Royal Asiastic Society, Vol. I. P. 579.)

षड्दर्शनांचें सार.

सदरहू **षड्दर्शनांचा** एकवट आणि सर्व बाजूंनीं विचार केला म्हणजे असें सहज लक्षांत येतें कीं, प्रथमतः **शुद्ध ब्रह्म** हें ओतप्रोत सर्वत्र भरलेलें असून, त्या आनंदमय, निर्वि-

---

1. "Panini, therefore, must have flourished in the beginning of the seventh Century before the Christian Era, if not earlier still; and against this conclusion I believe no argument has been or can be brought except a vague prejudice."

(Dr. Bhándárkar's History of the Dekkan P. 8.)

कल्प, आणि शुद्ध स्वरूपांत, जेव्हां एकाएकी, " **ब्रह्माहमास्मि। अथ एकाकी न रमते। एकोऽहं बहु स्याम्** " या श्रुतिवाक्यांतील कल्पनेचा उठाव झाला, तेव्हां लागलींच, अहंभावनेच्या विकारामुळें, सच्चिदानंदस्वरूप जो **आत्मा**, त्याजवर मायेचें पूर्ण आवरण होऊन, सृष्टिरचनेस प्रारंभ झाला. तो असा कीं:– " **तस्मादात्मन आकाशः संभूतः। आकाशाद्वायुः। वायोरग्निः। अग्नेरापः। अद्भ्यः पृथिवी। पृथिव्या ओषधयः। ओषधीभ्योऽन्नम्। अन्नात्पुरुषः** " या श्रुतींतील वाक्याप्रमाणें क्रमाक्रमानें, आत्म्यापासून आकाश, आकाशापासून वायु, वायूपासून अग्नि, अग्नीपासून पाणी, पाण्यापासून पृथ्वी, पृथिवीपासून ओषधी, ओषधीपासून अन्न, आणि अन्नापासून पंचभूतात्मक देह झाला. याप्रमाणें मी ब्रह्म आहे, अशी भावना धरणारें जें शबलब्रह्म, म्हणजे मिथ्या, ब्रह्म, त्याला, " **एकोऽहं बहु स्याम्** " ही कल्पना होण्याबरोबर, अनंत सृष्टि होऊन, हें भासमान होणारें विलक्षण **विराट्स्वरूप** बनलें.

आतां, " अन्नात्पुरुषः, " ह्मणजे अन्नापासून झालेला देह, हा मात्र, '**एकोऽहं बहु स्याम्**' अशी भावना कल्पिणारें समष्टिरूप ईश्वरतत्त्व जें कारण, त्या कारणाचा कार्यभाग झाला. परंतु तो प्रत्येक प्राण्याचें अहंभावना धारण करणारें " ज्ञान " नव्हे; असें, " **अन्नमय-**

**प्राणमयमनोमयविज्ञानमयानन्दमयान्मे शुध्यतां ज्योतिरहं विरजा विपाप्मा भूयास९ स्वाहा** " या श्रुतिवाक्यावरून सिद्धवत् आहे. तसेंच **शंकराचार्यांच्या** खालीं लिहिलेल्या महा वाक्यावरूनहीं तें उघड दिसत आहे:--

**आत्मा विनिष्कलो ह्येको देहो बुद्धिभिरावृतः ।**
**तयोरैक्यं प्रपश्यन्ति किमज्ञानमतः परम् ॥**

आणि ज्याप्रमाणें **शबलब्रह्म** मिथ्या आहे, त्याप्रमाणेंच प्रत्येक प्राणिमात्राच्या देहांतील अहंभाव धारण करणारें जें ज्ञान, तेंही मिथ्याच आहे. तथापि, तें आत्मज्ञानेंकरून मुक्त होण्यास पात्र आहे. ह्मणजे यावत्कालपर्यंत अज्ञानाच्या आवरणानें **आत्मा**, आणि **देह**, यांचें ऐक्य मानून, आपण बद्ध आहोंत, अशी या जिवाची मिथ्या कल्पना आहे, तावत्कालपर्यंत तो बंधनांतच आहे यांत संशय नाहीं. परंतु जेव्हां ह्या देहांत ज्ञानाचा प्रकाश पडून अशी समज होते कीं, या पंचभूतात्मक देहाचा व आत्म्याचा कांहींच संबंध नाहीं; देह अचेतन असून **आत्मा** चैतन्यरूप आहे; तसेंच तो निरञ्जन असून शुद्ध, बुद्ध, आणि मुक्त आहे; तेव्हांच मनाची स्थिरता होते. आणि तसा अनुभव येऊं लागला, ह्मणजेच तें बंधनापासून मुक्त होऊन **आत्मस्वरूपीं** लीन होतें, यांत तिळमात्रही शंका नाहीं.

खरोखर पाहतां, ' **यस्य भासा सर्वमिदं विभाति** ' या श्रुतिवाक्याप्रमाणें, ह्या सृष्टीचें मूलकारण शबलब्रम्ह

म्हणजे मिथ्या ब्रह्म असून, या जिवाचें आणि देहाचें मीपण धारण करणें, हें वंध्यासुतवत् मिथ्या आहे. म्हणजे मूळचें कांहींच नसून "मी आहे," अशी कल्पना झाल्यानें आत्म्याचें सच्चिदानंदस्वरूपावर अज्ञानाचें पडळ पडून, त्या अहंभावनेच्या योगानेंच हें सर्व जगत् खरें असल्याविषयीं लटका भास झाला आहे. आणि म्हणूनच "**अज्ञानमेवास्य हि मूलकारणम्**" ह्या **रामगीतेंतील** वाक्याप्रमाणें अखिल सृष्टीचें मूलकारण अज्ञान, म्हणजे अहंभाव माया होय. आणि हें बंधनमूलक अज्ञान जाऊन ज्ञान प्राप्त झालें, म्हणजेच मोक्ष प्राप्त होतो. कारण कीं, "**ज्ञानादेव तु कैवल्यम्**" हा **वेदाचा** परम सिद्धान्त असून, तो अनुभव सिद्ध, आणि निर्विवाद आहे.

एकंदरीनें पाहतां, **षड्दर्शनांतील** मतांचें हेंच सार दिसतें कीं, देहभावनेच्या योगानें जो त्रिविधताप होतो तो हरेकप्रकारांनीं नाहींसा करून, मन ज्या ज्या साधनांनीं **निर्विकल्प** राहील त्या सर्वांची योजना करून, त्यास निरंतर शान्तिसागरांत ठेवावयाचें.

निरीश्वर वादी.

असो. याशिवाय निरीश्वर मतवाद्यांचीही नास्तिकदर्शनें आहेत. तीं मुख्यत्वेंकरून सात आहेतः— १ चार्वाकदर्शन; २ **बौद्ध** दर्शन; ३ योगाचारदर्शन; ४ माध्यमिकदर्शन; ५ **सौत्रां**

तिकदर्शन; ६ वैभाषिकदर्शन; आणि ७ दिगंबर किंवा जैनद-र्शन. ह्या नास्तिकमताचा मुख्य प्रवर्तक म्हटला म्हणजे प्रसिद्ध व पुराण कपिलमुनि होय. त्यानें निरीश्वर मताचें प्रथमतः प्रतिपादन करून त्याचें बीजारोपण केलें. त्याचाच कालवशात् वृक्ष बनून तो बुद्धाच्या वेळीं अति विसृत झाला. आतां चार्वाक, व बौद्धादि निरीश्वर मतांत, चार्वाक मत नीतिभ्रष्ट असल्यामुळें, अतिदोषार्ह आहे. त्यामुळें त्याचा परिणाम लोकसमाजावर कोणत्याही रीतीनें चांगला होण्याचा कधीं देखील बिलकुल संभव नाहीं.

चार्वाक, बुद्ध, प्रभृति.

कारण, या मतांत प्रत्यक्ष प्रमाण फक्त एकच मानलें असून, त्याचे विषय म्हटलें म्हणजे १ पृथिवी, २ आप, ३ तेज, आणि ४ वायु, असे चारच भासमान होणारे पदार्थ होत. आनुमानिक व शाब्दिक पदार्थ, ह्मणजे आकाश, काल, दिक्, आत्मा, मन, परमेश्वर, पुण्य, पाप, स्वर्ग, आणि नरक. इत्यादि या मतांत मानिलेले नाहींत. त्या कारणानें परपीडा, दुराचरण, आणि पापकर्म, इत्यादिकांस दंडभीति; तसेंच परोपकार, सदाचरण, आणि पुण्यकर्म, इत्यादिकांस स्वर्गादि फलप्राप्ति, वगैरे कांहींच सांगितलें नसल्यामुळें, सामाजिक नीतीवर, अथवा आचरणावर, कोणत्याही प्रकारचा दाब राहण्यास साधन राहिलें नाहीं. शिवाय पृथिवी, आप,

चार्वाकाचें नीतिभ्रष्ट मत.

तेज, आणि वायु, या चार महाभूतांचे कांहीं भाग नियमित प्रमाणानें एकत्र होऊन हा देह बनतो; व त्या समुदित भागापासून, रसायन क्रियेनें त्या देहांतच **चैतन्य** म्हणजे, अहंभाव व ज्ञान उत्पन्न होतें; असाही ह्या मतांतील आशय आहे. उदाहरणार्थ, मादक पदार्थांचा संयोग झाल्यानें मदशक्ति येते; गंधकादि पदार्थांचा संयोग झाल्यानें अग्निशक्ति उत्पन्न होते; आणि पूर्वोक्त चार महाभूतांपासून हा देह, व चैतन्यशक्ति किंवा जीव, उत्पन्न होतो. आणखी असें कीं, अर्थशास्त्र म्हणजे द्रव्यसंपादन, आणि कामशास्त्र म्हणजे कामशांति, हेच कायते दोन पुरुषार्थ, या **चार्वाक** मताप्रमाणें मानलेले असल्यामुळें, जिवांत जीव आहे तावत्कालपर्यंत मजा मारून, येनकेन प्रकारेण चमन् उडवावी, हेंच काय तें सुख; आणि या देहाहून भिन्न असा दुसरा आत्मा नसल्यामुळें, देहाचा नाशच कायतो मोक्ष; असा या दर्शनांतील अभिप्राय आहे.

आतां, कोणी अशी शंका काढील कीं, जर ह्या सृष्टीचें आदिकारण **ईशशक्ति** नाहीं, अथवा पुण्य किंवा पापही नाहीं तर, हें जग कसें उत्पन्न झालें, आणि सुख दुःखात्मक असमानता प्राप्त होण्याचें काय कारण? ह्या प्रश्नाला **चार्वाक** इतकेंच उत्तर देतो कीं, तें निसर्गतः तसेंच असल्यामुळें, त्याचा कर्ता करविता कोणीच नाहीं.

अग्निरुष्णो जलं शीतं शीतस्पर्शस्तथाऽनिलः ।
केनेदं रचितं ? तस्मात्स्वभावात्तद्व्यवस्थितिः ॥

वेद ईश्वरप्रणीत असल्याविषयीं चार्वाकाची बिलकुल संमति नसून, त्यांतील कर्मकांड, ज्ञानकांड, व यज्ञयागादि क्रिया, वगैरे धूर्त लोकांनीं आपल्या उदरपोषणार्थच करून ठेविल्या आहेत, असें त्याचें ह्मणणें आहे. या चार्वाक मतांतील सिद्धान्त खालीं लिहिलेल्या श्लोकांवरून चांगले व्यक्त होतील.

चार्वाकमतांतील सिद्धान्त.

"न स्वर्गो नापवर्गो वा नैवात्मा पारलौकिकः ।
नैव वर्णाश्रमादीनां क्रियाश्च फलदायिकाः ॥१॥
अग्निहोत्रं त्रयो वेदास्त्रिदण्डं भस्मगुण्ठनम् ।
बुद्धिपौरुषहीनानां जीविका धातृनिर्मिता ॥ २ ॥
पशुश्चेन्निहतः स्वर्गं ज्योतिष्टोमे गमिष्यति ।
स्वपिता यजमानेन तत्र कस्मान्न हिंस्यते ॥ ३ ॥
मृतानामपि जन्तूनां श्राद्धं चेत्तृप्तिकारणम् ।
गच्छतामिह जन्तूनां व्यर्थं पाथेयकल्पनम् ॥ ४॥
स्वर्गस्थिता यदा तृप्तिं गच्छेयुस्तत्र दानतः ।
प्रासादस्योपरिस्थानामत्र कस्मान्न दीयते ॥ ५ ॥
यावज्जीवेत्सुखं जीवेदृणं कृत्वा घृतं पिबेत् ।
भस्मी भूतस्य देहस्य पुनरागमनं कुतः ॥ ६ ॥
यदिगच्छेत्परं लोकं देहादेशविनिर्गतः ।

कस्माद्भूयो न चायाति बंधुस्नेहसमाकुलः ॥ ७ ॥
ततश्च जीवनोपायो ब्राह्मणैर्विहितास्त्विह ।
मृतानां प्रेतकार्याणि न त्वन्यद्विद्यते क्वचित् ॥ ८ ॥
त्रयो वेदस्य कर्तारो भण्डधूर्त निशाचराः ।
जर्फ(र्भ)री तुर्फरीत्यादि पंडितानां वचः स्मृतम् ॥ ९ ॥
अश्वस्यात्र हि शिस्नं तु पत्नीग्राह्यं प्रकीर्तितम् ।
भंडैस्तद्वत् परं चैव ग्राह्यजातं प्रकीर्तितम् ॥ १० ॥
मांसानां खादनं तद्वन्निशाचरसमीरितम्'' इत्यादि ।

चार्वाकाची जन्म-भूमि, व काल.

चार्वाकाचें जन्म अवंती देशांत, क्षिप्रा व चमला ह्या नद्यांच्या संगमावर **शंखोद्धार** नामक क्षेत्रांत झालें. त्याच्या बापाचे नांव **इंदुकांत** व आईचें नांव **स्रग्विणी** असें असून, तो होऊन गेल्याला सुमारें अडीच हजार वर्षांवर वर्षें झालीं असावीं असें अनुमान आहे.

बौद्धमतसिद्धान्त.

**बौद्ध** धर्माचे मूळ चार सिद्धान्त आहेत. ते हे कीः— **१ सर्वं क्षणिकं क्षणिकम्. २ सर्वं दुःखं दुःखम्. ३ सर्वं स्वलक्षणं स्वलक्षणम्.** व **४ सर्वं शून्यं शून्यम्.** ह्या चार सिद्धान्तांस भावना अशी संज्ञा असून, १ सर्वशून्यत्व; २ बाह्य शून्यत्व; ३ बाह्यार्थानुमेयत्व; आणि ४ बाह्यार्थ प्रत्यक्षत्व; असे चार प्रकारचे वाद मानले आहेत. एकंदरींत हें जगत् क्षणिक, दुःखरूप, स्वलक्षण, आणि शून्य,

असें मानावें म्हणजे सर्व संकल्पांचा क्षय होऊन, रागादि ज्ञानाची जी परंपरा तिचाही नाश होतो. आणि ह्याप्रमाणें वासनादिकांचा लय झाला म्हणजेच शून्यस्वरूपी उत्तम निर्वाण किंवा मोक्ष होय, असा या **बौद्ध** मताचा कटाक्ष आहे. ह्या मतांत १ माध्यमिकदर्शन, २ योगाचार दर्शन, ३ सौत्रांतिकदर्शन, आणि ४ वैभाषिकदर्शन, यांचा समावेश होतो. कारण, **माध्यमिक, योगाचार, सौत्रांतिक,** आणि **वैभाषिक,** असे **बुद्धाचे** चार शिष्ये असून, त्या वृद्ध गुरूच्या उपदेशावरूनच त्यांस विद्या प्राप्त झाली होती. परंतु प्रत्येकाच्या बुद्धितीव्रतेप्रमाणें त्यांच्यांत भिन्न भिन्न मतें पसरलीं. आतां **बुद्धाचें** इतिवृत्त, आणि त्याचा काळ, यांविषयीं सविस्तर विवेचन सातव्या पुस्तकांत, चाळीसाव्या भागांत **बौद्धधर्म** या सदराखालीं केलें आहे. सबब तत्संबंधीं जास्त हकीकत या ठिकाणीं लिहिण्याचें कारण नाहीं.

जैनमतांतील तत्त्व.

**दिगंबर** किंवा **जैन** मतांत, आत्मा अथवा जीव मानिला असून, तो शरीरपरिमाण, स्थिर, जगाचा कर्ता, नित्य, आणि सर्वव्यापि, असा आहे. त्यास **अर्हत्, जिन,** किंवा **परमेश्वर** असें ह्मणतात. व तो सर्वज्ञ, रागादि दोषरहित, आणि यथार्थवादी असल्याविषयीं त्याचें वर्णन आहे. या मतांत सम्यग्दर्शन, सम्यग्ज्ञान, व सम्यक्चरित्र, अशीं तिन्ही

समुदायरूपानें मोक्षाचीं साधनें असून, त्यांपैकीं एखादेंही उणें असल्यास मोक्ष होत नाहीं, असें हें मतवादी समजतात.

जैनमताचा प्रवर्तक अर्हत् नामक आचार्य, व त्याचा काळ.

या धर्माचा प्रवर्तक प्रसिद्ध **अर्हत्** नामक होऊन गेला. त्याचें जन्म **बहार प्रांतांत पाटणा** शहरीं झालें असून त्याचा काल **बुद्धानंतरचा** असल्याविषयीं अनुमान आहे.

हिंदूंची तत्वान्वेषण जिज्ञासा व तिचा काल.

**हिंदूंची** ही तत्वान्वेषण जिज्ञासा आजकालची नसून, तिचें बीज फारच पौराणिक कालां-तलें आहे. आणि त्याविषयीं शोध-कबुद्धीनें पाहिलें तर आपणास असें कळून येईल कीं, सृष्टीच्या **आदिकारणाचे** गहन वि-चार, व तत्संबंधीं ऊहापोह, हे अतिपुराण **वैदिक** कालांतही चाललेले असून, त्यांविषयीं त्यावेळीं देखील प्रचंड भवति न भवति होत असे. **ऋग्वेद संहितेंत, अरण्यकांत,** आणि **उपनिषद्** भागांत, तत्संबंधीं पूर्ण-त्वाचे विचार क्षणोक्षणीं आढळतात. इतकेंच नाहीं तर, त्या मूलनिर्झरापासूनच हल्लींचा **तत्वज्ञानोदधि** निर्माण झाल्याचें दिसतें; व तदवलोकनानेंच **हिंदूंच्या** बुद्धिप्र-गल्भतेचें सर्व जगास आश्चर्य वाटतें, आणि त्यांच्या ज्ञानाविषयीं सर्वांस विस्मय होतो.

**प्रोफेसर वेबर** असें लिहितात कीं:—

" The beginnings of philosophical speculation go back, as we have already more than once seen ( see especially P P. 26.-27 ), to a very remote age. Even in the Samhita of the Rik, although only in its later portions, we find hymns that bespeak a high degree of reflection. "

( The History of Indian Literature, )
P. 232.

" Lastly, Philosophical speculation also had its peculiar development contemporaneously with and subsequently to, the Brahmanas. It is in this field and in that of grammar that the Indian mind attainned the highest pitch of its marvellous fertility in subtile distinctions, however abstruse or naive on the other hand, the method may occasionaly be. "

( H. I. L. P. 26 ).



# भाग २२ वा.

## ज्योतिःशास्त्र, भूमितिशास्त्र, अंकगणित, व बीजगणितशास्त्र.

## ज्योतिःशास्त्र.

तत्वविद्येप्रमाणे इतर शास्त्रांत हिंदूंची प्रवीणता.

तत्वविद्येप्रमाणेंच ज्योतिषादि शास्त्रांत, आणि इतर उपयुक्त कलांतही, हिंदूंची प्रवीणता होती. ज्योतिःशास्त्रांत हिंदूंचा शोध फार प्राचीनकालापासून होता, व तो करण्याची त्यांस अवश्यकताही पडली. कारण, वेदविहितमार्गाप्रमाणें आचरण करण्याचें खरें अगत्य त्यांस असल्यामुळें, भिन्न भिन्न काळीं भिन्न भिन्न कर्में करण्यासाठीं, आणि वेदाज्ञेस अनुसरून तीं पाळण्यासाठीं, ग्रहनक्षत्रावलोकनांनीं आकाशांतील गोलांचें यथामति अन्वेषण करणें, व त्यांचे यथावकाश वेध घेणें, हें तत्कालीन हिंदूंस केवळ जरूरीचें होतें. त्यामुळें त्या कामांत त्यांचा फार पुराणकालापासून सहजींच प्रवेश होऊन, उद्यमसातत्यानें 'कालवशात् त्यांस आपोआपच प्रवीणता प्राप्त झाली.

हिंदू ज्योतिर्विद्येचा हा पुरातन शोध, कमींत कमी तीन हजार वर्षांपूर्वी झाला असल्याविषयीं, पाश्चिमात्य पंडित, आणि त्यांतही विशेषतः **हिंदुशास्त्रांचें** व कलांचें यथार्थ पौराणत्व स्वीकारण्यांत अति पराङ्मुख, असे प्रोफेसर **वेबर** प्रभृति विद्वान् व गुणागुणज्ञ, देखील कबूल करतात. ज्योतिःशास्त्रांत **हिंदूंचें** प्रथमचे शोध सुमारें सहा सात हजार वर्षांपूर्वींचे अगदीं

हिंदू ज्योतिर्विद्या व तिचा पुरातन शोध.

---

१ ज्योतिर्विद्येंत **हिंदुंचा** फार पुरातन शोध असल्याविषयीं लिहितांना, प्रसिद्ध इतिहासकार **एलफिन्स्टन्** असें म्हणतात कीं:—

हिंदुज्योतिर्विद्येचा पुरातन शोध असल्याविषयीं, नामांकित ग्रंथकारांचे अभिप्राय.

“ Cassini, Bailly, and Playfair maintain that observations taken upwards of 3000 years before Christ, are still extant, and prove a coniderable degree of progress already made at that period. ”

* * * * *

“ All astronomers, however, admit the great antiquity of the Hidu observations; and it seems indisputable that the exactness of the mean motions that they have assigned to the Sun and Moon could only have been attained by a comparison of modern observations with others made in remote antiquity. Even Mr. Bentley, the most strenuous opponent of the claims of the Hindus,

( पुढें चाल )

स्वतंत्र रीतीनें झाले असून, त्यांत त्यांचें पाऊल बरेंच पुढें सरसावल्यासारखें दिसतें. हा स्वतंत्र शोध इ० श० पूर्वी

( मागील पृष्ठावरून पुढें चालू )

pronounces, in his latest work, that their division of the ecliptic into twenty seven lunor mansions ( which supposes much previous observaton ) was made 1442 years before our Æra: without relying upon his authority in this instance, we should be inclined to believe that the Indian observations could not have commenced at a later period than the fifteenth century before Christ. This would be from one to two centuries before the Argonautic expedition and the first mention of astronomy in Greece. "

" The astronomical rule relating to the calender, which has been quoted from the Vedas, is shown to have been drawn up in the fourteenth century before Christ; and Parashar, the first writer on astronomy, of whose writings any portion remains, appears to have flourished about the same time. "

( Elphinstone's History of India. )
P. P. 245-246.

यासंबंधानें प्रोफेसर वेबर असें लिहितात कीं,

" The mention of the Nakshatradarsa " star-gazer " , in *v.* 10 and of the *ganaka*, " calculator " in v. 20, permits us, at all events, to conclude that astronomical, *i. e.*, astrological science was then actively pursued. "

११८१ वर्षांपलीकडेही अनेक शतके अगोदर झाला असावा, असें अनुमान आहे. कारण **लगधाचार्यानें** जो ज्योतिष ग्रंथ केला, त्यावरून त्याच्या वेळीं सूर्य कोणत्या अयनांशावर होता हें कळतें. तसेंच त्यानें आपल्या वेळचीं अयनवृत्तांचीं जीं संपातस्थलें सांगितलीं आहेत त्यावरून, त्या वेळच्या व हल्लींच्या संपातबिंदूत २३ तेवीस अंशाचें अंतर पडल्याचें दिसतें. आतां, **संपातबिंदु** ह्मणजे **विषुववृत्त** व **क्रांतिवृत्त** यांचा ज्यांत परस्पर छेद होतो ते दोन बिंदु असून, त्यांस ३° अंश क्रमण्यास सुमारें दोन हजार वर्षें लागतात. सबब, या मानानें पाहिलें तर, **लगधाचा** ज्योतिषग्रंथ इ० श० पूर्वीं ११८१ वर्षांच्या सुमारास झाला असावा, यांत बिलकुल शंका नाहीं. आणि खरोखर पाहिलें तर **लगधाच्या** पूर्वीं देखील

आर्य ज्योतिःशास्त्राचा उदयकाळ, किंवा वैदिककाळ.

---

( मागील पृष्टावरून पुढें चालू )

"We have already seen that astronomy was cultivated to a considerable extent even in Vedic times, and we found it expressly specified by Strabo as a favourite pursuit of the Brahmans."

* * * * *

"To the elaboration of a quinquennial cycle with an intercalary month a pretty early date must be assigned, since the latter is mentioned in the Rik-Samhita."

( H. I. L. P. P. 112-113-246-247. )

बरींच शतकें अगोदर, ग्रहांचें अवलोकन होऊन त्यांचे वेधही त्या प्राचीन ऋषींनीं वेळोवेळीं घेतले असावेत, याविषयीं कांहीं संशय नाहीं. त्यांनीं एका वर्षाचे ३६० दिनविभाग कल्पून, प्रत्येक पांच वर्षांस एक अधिक मासाची योजना केली होती. व हें त्यांनीं काढलेलें वर्षकालमान बहुतेक अंशीं खऱ्या प्रमाणाचें होतें. याशिवाय कांहीं स्थिर ग्रह, व चंद्राची गति, आणि सत्तावीस नक्षत्रें, हीं देखील त्यांनीं शोधून काढली होतीं. आतां, सदरहू नक्षत्रें इसवी शकापूर्वी १४७२ वर्षांपासून तों ९३६ वर्षांच्या दरम्यान शोधून काढलीं असावीं, असें प्रोफेसर वेबरचें ह्मणणें आहे. **तैत्तिरीयसंहितेंत** सत्तावीस नक्षत्रांचीं नावें दिलीं असून, **वाजसनेयिसंहितेंत** आणि **छंदोग्योपनिषदांत** " तारा प्रेक्षक " व " ज्योतिःशास्त्र " यांचा नामनिर्देश केल्याचें आढळून येतें.

यावनिक काळ. त्याची वृद्धि, व

**वैदिक** कालानंतर इसवी शकापूर्वी ३२७ व्या वर्षी, **शिकंदर बादशहानें हिंदुस्थानावर** स्वारी केली. त्यानंतर **ग्रीक** लोकांबरोबर हिंदूंचें बरेंच दळणवळण पडल्या कारणानें, **ग्रीक** विद्येचा **भरतखंडावर,** कांहीं अंशानें अंमल पसरला. त्यामुळें प्राचीन निर्भेळ अशा **आर्य**ज्योतिर्विद्येंत संकर होऊन **यवन** ( **ग्रीक** ) ज्योतिर्विद्यांकुर, व तत्संबंधीं पारिभाषिक शब्द, यांचा आपोआपच प्रादुर्भाव झाला. तेव्हां अर्थात्च,

त्या पाश्चिमात्य प्रकाशानें आर्यभट्ट, आणि वराहमिहिर, इत्यादि विद्वन्मुकुटमणींनीं आर्यज्योतिःशास्त्रास चलन देऊन, तदुत्कर्षार्थ अति परिश्रम केले. त्यायोगानें हें आर्यशास्त्र पूर्णतेस येऊन, तें इतकें महत्वास व गौरवास चढलें कीं, त्यांत हिंदूंची दिगंत कीर्ति झाली. आणि कांहीं कांहीं गोष्टींत तर हिंदूंचे ग्रीक लोकांपेक्षांही ज्यास्त शोध असल्यामुळें, ग्रीक लोकांनीं देखील हिंदूंचें गुरुत्व घेतलें, व क्रॉनिकन् पास्चेल नामक ग्रंथांत हिंदुमताप्रमाणें त्यांनीं दुरुस्ती केली. ( इ० श० ६१०–६४१ ). याप्रमाणें हिंदूंचे ग्रीक लोक हे चेले बनल्यावर, इसवी शकाच्या आठव्या आणि नवव्या शतकांत, आरब लोकांनींही हिंदूंपासून ज्योतिर्विद्येचीं मूलतत्वें शिकून घेतलीं. हिंदूंच्या विद्वत्तेमुळें आरबी लोक त्यांस अति पूज्य मानीत, आणि त्यांचें फार गौरवही करीत. आरब लोकांनीं ह्या विद्येचा अभ्यास करण्यासाठीं फारच प्रयत्न केले. आणि ज्योतिर्ज्ञान प्राप्त होण्याच्या हेतूनें इराणांतील कालिफांकडून हिंदूशास्त्रज्ञांस बगदाद येथील राजधानींत बोलावून आणून, त्यांच्या देखरेखीखालीं ज्योतिःसिद्धांताचें आरबी भाषेंत त्यांनीं भाषांतर करविलें, व त्यास सिन्धेन्द असें नांव दिलें. अशा प्रकारचा हिंदुज्योतिःशास्त्राचा उत्कर्ष भास्कराचार्यपर्यंत

त्याचा उत्कर्ष काळ.

त्याचा अस्तकाल.

सतत चालला. हा अति बुद्धिमान् गणिती इसवी शकाच्या बाराव्या शतकांत उदयास आला, आणि तदनंतर **मुसलमान** लोकांच्या स्वाऱ्या **हिंदुस्थानावर** वारंवार होऊं लागल्यामुळें हें शास्त्र तसेंच मागें पडलें. पुढें इ० स० ११५० पासून तों १८०० पर्यंत, **भरतखंडांत** क्वचित् क्वचित् ज्योतिःशास्त्रज्ञ होऊन गेले; पण त्या सर्वांत प्रसिद्ध ह्मटला ह्मणजे दुसरा राजाजयसिंग होय.

आर्य ज्योतिर्विद्येचे चार काळ.

ह्या सर्व गोष्टींचा पूर्ण विचार केला ह्मणजे **आर्यांच्या** ज्योतिषकालाचे चार विभाग करणें फार सुगम होतें. इतकेंच नाहीं तर, तसें करणें मोठें सोयीस्करही पडतें. आतां, या चार विभागांस १ **उदय**काल ( किंवा **वैदिक** काल ), २ **प्रगमन** काल ( किंवा **यावनिक** काल ), ३ **उत्कर्ष** काल, आणि ४ **अस्त** काल, अशीं नावें देऊन, त्या सर्वांचा क्रमशः विचार करूं.

वैदिक किंवा उदय कालांतील शोध.

**वेदकालांत हिंदु** ज्योतिर्विद्येचा उदय असून **वेद**कवींनीं तितक्या पुरातनकालीं, त्या शास्त्रांत चांगलें परिश्रम केले होते, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. चंद्राचें परिवर्त्तन, सूर्याचें आकर्षण, आणि ग्रहणाचें कारण, इत्यादि महत्वाचे शोध त्यांनीं लाविले होते. चंद्रगतीचा वेध घेऊन

त्यांनीं प्रथम सत्तावीस नक्षत्रें शोधून काढलीं. याविषयीं ऋक्संहिता, तैत्तिरीय संहिता, अथर्वसंहिता, आणि तैत्तिरीय ब्राह्मण, यांत उल्लेख आढळतो. ह्याच नक्षत्रांचें पुढें चिनी व आरबी लोकांनीं अनुकरण केलें. तदनंतर सूर्याचें सदैव आकर्षण पृथिवीवर आहे, हा सर्वमान्य सिद्धान्त त्यांनींच शोधून काढला. ह्याचें प्रमाण श्रुतींत, ऋक्संहितेच्या तिसऱ्या अष्टकांत चवथ्या अध्यायाच्या पांचव्या वर्गांत, सांपडतें:—

सत्तावीस नक्षत्रें.

**मित्रोजनान्यातयतिब्रुवाणोमित्रोदाधारपृथिवीमुतद्यां।**
**मित्रःकृष्टीरनिमिपाभिचष्टेमित्रायहव्यंघृत वज्जुहोत ॥**

ह्या ऋचेचा तात्पर्यार्थ असा आहे कीं, सर्व प्रजेला मित्राचा म्हणजे सूर्याचाच आधार असून, तो पृथिवीला आपल्याकडेसच आकर्षण करतो; आणि ह्या त्याच्या आकर्षणांतून ती निमिषमात्रही सुटत नाहीं. सदरहू शोधानंतर कांहीं कालानें, अत्रि नामक ऋषीनें ग्रहण कसें लागतें याविपयीं प्रथम शोध लाविला.

सूर्याचें आकर्षण.

**अत्रिःसूर्यस्यदिविचक्षुराधात्स्वर्भानोरपमायाऽ**
**अघुक्षत् ॥ यं वै सूर्यं स्वर्भानुस्तमसा विध्यसुरः।**
**अत्रयस्तमन्व विंदन्नह्यऽन्येऽअशक्नुवन् ॥**

ऋक्संहिता. अष्टक ४. अध्याय २. वर्ग ८.

ह्याचा तात्पर्यार्थ इतकाच कीं, सूर्यमण्डल म्हणजे सुर अथवा स्वप्रकाशक गोल, याचें दर्शन होण्याला, असुर म्हणजे परप्रकाशक गोल ( ज्यास स्वर्भानु किंवा स्तर्भानु अशी संज्ञा आहे ते ), अटकाव करतात. हा वेध प्रथमतः अत्रींनेंच शोधून काढला असून, तत्संबंधीं ज्ञान पूर्वी दुसऱ्या कोणासही नव्हतें.

ग्रहणाचें कारण.

तसेंच, सूर्याच्या रश्मितेजानें पाण्याची वाफ बनून ती आकाशांत सर्वत्र पसरते, व पुढें तिजपासूनच मेघ निर्माण होऊन त्या योगानेंच पर्जन्यवृष्टि होते, हा शोधही आमच्या वेदकालीन हिंदूंस लागला होता. याविषयीं श्रुतीचा व स्मृतीचा आधार खालीं देतों:—

वारिरूपान्तर.

अग्निर्वाइतोवृष्टि मुदीरयति मरुतः
सृष्टां नयंति यदा खलुवा असावादित्योन्यङ्
रश्मिभिः पर्यावर्ततेथ वर्षति ।

( यजुर्वेद. आपस्तंभ संहिता. दुसरें अष्टक.
चवथा अध्याय. अकरावा अनुवाक. )

अग्नौ प्रास्ताहुतिः सम्यक् आदित्यमुपतिष्ठते ।
आदित्याज्जायते वृष्टिर्वृष्टेरन्नं ततः प्रजा ॥

( स्मृति. )

ज्योतिःशास्त्रावरील नानाविध ग्रंथांचा, भरतखंडांतील

इतर ग्रंथसंपत्तीबरोबरच नाश झाला, यांत संशय नाहीं. कांहीं ग्रंथसमूह शत्रूंच्या हातीं लागल्यामुळें, त्यांनीं त्याचा चुराडा उडविला, आणि कांहीं वाळवीच्या भक्षस्थानीं पडल्याकारणानें, त्यांनीं तो खाऊन फस्त केला. थोड्या दिवसांपूर्वीं "**अद्भुतसागर**" नांवाचा ज्योतिःशास्त्रावरील ग्रंथ वाळवीच्या तडाक्यांत सांपडलेला, एका गृहस्थास मिळाला. तदवलोकनानें आमच्या पूर्वजांचे अगाध शोध, त्यांचे उद्यमसातत्य, आणि अनुपमज्ञान यांचें उत्कृष्ठ दिग्दर्शन होतें.

इंद्र धनुष्य.

सदर्हू ग्रंथाच्या नांवाप्रमाणेंच त्यांतील विषय फारच गहन व अद्भुत आहे. **इंद्र धनुष्य, सूर्यप्रकाशमीमांसा, धूमकेतु,** इत्यादि संबंधीं ऊहापोह, आणि तत्वविवेचन त्यांत दिसून येतें; व इतक्या प्राचीन काळीं अशा परिपक्कतेचे शोध कसे लागले, याविषयीं नवल वाटतें; आणि त्यापुढें **पाश्चात्यांच्या** नवीन कल्पनाचातुर्याचें कांहींच आश्चर्य वाटेनासें होतें.

तें पडण्याचीं कारणं.

**इंद्रधनुष्य** कसें पडतें, याविषयीं "**अद्भुतसागरांत**" खालीं लिहिलेलें विवेचन आढळून येतें:—

**सूर्यस्यविविधावर्णाः पवनोदकमेवच।**
**घटिताः साभ्रे धनुः संस्थानाद्येदृश्यंतेतादिंद्रधनुः॥**

ह्मणजे सूर्याचे नानाप्रकारचे वर्ण ( किरणें ), वायु

आणि जल, ह्यांच्यांशीं संयोग पावून, मेघाच्छादित आकाश असतां, जी चमत्कृति दृष्टीस पडते, तेंच **इंद्रधनुष्य** होय.

" **रविकिरण जलदमरुतां संघातो**
**धनुर्विस्थितो धनुर्मघोनः ।** "

असें **काश्यप** ह्मणतो. ह्याचा भावार्थ इतकाच कीं, सूर्याचीं किरणें हीं, वायु आणि मेघ, यांच्यांशीं मिश्रित झाल्या कारणानें, स्थलांतरावर जी धनुष्याकृति दृष्टीस पडते, तिलाच **इंद्रधनुष्य** ह्मणतात.

हें **इंद्रधनुष्य** जसें दिवसा पडतें, तसेंच रात्रीं देखील पडतें.

**दिनेच रात्राविंद्रधनुर्द्वावद्‌भुतौ ।**

ह्मणजे दिवसा आणि रात्रीं जीं **इंद्रधनुष्यें** पडतात, तीं दोन्हीं फारच अद्‌भुत असतात, असें **अद्‌भुतसागरांत** वर्णन केलें आहे.

रश्मिदंड.

**इंद्र**धनुष्याप्रमाणेंच **रश्मिदंड**ही पडतो, आणि तो पडण्याचें कारण देखील इन्द्रधनुष्यासारिखेंच असतें. मात्र इन्द्रधनुष्य कोणत्याही स्थळीं पडतें, व [१]**रश्मिदंड** हा दिशांच्या मधोमध, आणि आकाशाच्या मध्यभागीं, पूर्वपश्चिम किंवा दक्षिणोत्तर, असा पडतो. तथापि, हा **रश्मिदंड** क्वचित्‌च दृष्टिगोचर[२] होतो.

---

१ रविकिरण जलद मरुतां सन्निपातो नभे
दंडवद्रश्मिदंडः । इन्द्रधनुवद्रश्मिदंडः ।

२ रश्मिदंडाः क्वचिद् दृश्यंते ।

सूर्यप्रकाश, व त्याचीं कारणें.

**सूर्य** स्वयंप्रकाश आहे कीं नाहीं, अशाविषयीं आधुनिक **पाश्चात्य** विद्वानांत बरीच चळवळ सुरू असून, विशेष शोधाअंतीं तो स्वयंप्रकाश नसल्याबद्दल, त्यांचें मत होत चाललें आहे. शिवाय, ते अशीही कल्पना करितात कीं, **सूर्याचें** वातावरण **ज्योतिर्मय** असल्या कारणानें तो दीप्तिमान भासतो.

आतां प्राचीनकाळीं, एतद्विषयीं, **आर्यहिंदूंचे** कशा प्रकारचे शोध होते, याबद्दल विचार करूं. **अद्भुतसागरांत** एके ठिकाणीं असें विवेचन आहे कीं, " **भानोर्वायुवेष्टनं प्रखरतेजोयुक्तम्** । " म्हणजे सूर्याचें वातावरण प्रखर तेजानें युक्त आहे. त्यावरून फार पुरातन काळीं देखील आमच्या पूर्वजांनीं अति परिश्रमानें मोठमोठे व गहन शोध लाविले होते, असें दिसतें.

धूमकेतु, व तत्संबंधीं शोध.

**धूमकेतूंचा** देखील **हिंदूंनीं** फारच बारकाईनें शोध लाविला होता; आणि त्यांत ते **चिनी** व **इंग्रजादि पाश्चात्य,** यांच्याही पुढें सरसावल्यासारिखे दिसतात. **चिनी** लोकांनीं एकंदर तीनशें धूमकेतूंची संख्या दिली असून, **इंग्रज** लोकांच्या अगदीं नूतन शोधावरून ते सुमारें सात शांवर असल्याचें कळून येतें. परंतु **हिंदु** ज्योतिष्यांची

त्यांच्याही पुढें मजल गेली आहे. ते एक हजार[1] धूमकेतु असल्याविषयीं सांगतात. इतकेंच नाहीं तर, शंभरावर[2] दुसरे उपधूमकेतुही आहेत, व ते चंद्राप्रमाणें[3] प्रकाशतात, असें ते वर्णन करितात.

ग्रीस देशाच्या तुलनेनें हिंदु ज्योतिःशास्त्राचें पौराणत्व.

**युरोपां**तील नामांकित ज्योतिषि व विद्वान, **क्यासिनी, बेली, प्लेफेअर,** इत्यादि वर सांगितल्याप्रमाणें असें प्रतिपादन करतात कीं, **खिस्ती शका**पूर्वीं तीन हजार वर्षांवर, ग्रहनक्षत्रादिकांचे **हिंदूं**नीं घेतलेले वेध आज मितीसही उपलब्ध आहेत. त्यावरून तितक्या पुरातन काळींही त्यानीं ज्योतिःशास्त्रांत पुष्कळ सुधारणा केली होती, यांत शंका नाहीं. ह्मणजे आज सुमारें चार हजार आठशें वर्षांपूर्वीं देखील, आमच्या **हिंदूं**ची त्या शास्त्रांत प्रवीणता व शोध होते, असें त्यांचें ह्मणणें आहे. आणि ह्या व दुसऱ्या प्रमाणांवरून एकंदर विचार करतां असें खचित ठरतें कीं, फार प्राचीन सुधारलेलें असें **युरोप** खंडांतील जें **ग्रीक** राष्ट्र, त्याचा या कामांत शोध होण्यापूर्वींही अनेक

---

१ धूमकेतूनामेक सहस्रसंख्येति ।

२ धूमकेतोः सुताघोराः शतमेकाधिकंचतत् ।

३ शशिवद्भासमानास्तीव्राः ।

(म. शा. प. १८९२)

शतकें अगोदर, ज्योतिःशास्त्रांत आमचा बराच प्रवेश झाला होता. आतां, **ग्रीक** ज्योतिःशास्त्राचें आदि-कथन कोठें आढळतें, याविषयीं शोध केला तर असें कळून येतें कीं, **ग्रीक** लोकांनीं **आर्गो** नामक गलबतांत बसून सोनेरी लोंकर पैदा करण्याकरतां, **काळ्या** समुद्राच्या पूर्वेस **कोल्किस** नामक देशावर जेव्हां स्वारी केली, तेव्हां त्याचें दिग्दर्शन झाल्याचें दिसतें. आणि ही गोष्ट इसवी शकापूर्वी सुमारें बाराव्या किंवा तेराव्या शतकांत घडून आली असावी, असा अजमास आहे.

पुराण ज्योतिषी पराशर.

**हिंदूंत** अति पुराण ज्योतिषी ह्मटला म्हणजे **पराशर**-असून, त्याची तशीच ख्यातीही आहे. त्यानंतर दुसऱ्या शेजेचा पुराणज्योतिषी **गार्ग** नामक ऋषि होय. तदनंतर **असुरमय**, **आर्यभट्ट**, **वराहमिहिर**, **ब्रह्मगुप्त**, आणि **भास्कराचार्य**, असे फार नामांकित पैकीं ज्योतिषी होऊन गेले. **पराशर** हा. इ. श. पूर्वी चवदाव्या शतकांत झाला असून, **भास्कर** हा इ.स. ११५० सालीं उदयास आला.

यावनिक कालांतील ज्ञानप्राप्ति.

**वैदिक** कालांतील ज्योतिर्विद्या प्रथमतः हिंदूंपासूनच **पाश्चिमात्य** राष्ट्रांस प्राप्त झाल्यावर, कालान्तरानें **ग्रीक** लोकांचें त्या शास्त्रांत बरेंच पुढें पाऊल पडलें.

पुढें कालवशात् इ० श० पूर्वी ३२७ वर्षांनंतर शिकंदरानें जेव्हां हिंदुस्थानावर स्वारी केली तेव्हां, हिंदु व ग्रीक राष्ट्रांचें संमिलन होऊन, त्यां परस्परांत हरतऱ्हेचें दळणवळण सुरू झालें. त्यामुळें आपापसांत ज्ञानाचा मोबदला होऊन, त्या प्रकाशानें हिंदूंनीं आपल्या ज्योतिःशास्त्रास चलन दिलें. आणि त्याचें त्यांनीं शास्त्रीय पद्धतीनें अन्वेषण आरंभिलें. तेव्हां अर्थातच त्याला पाहिजे होती तितकी सूक्ष्मता आणि यथार्थ व्यापकता प्राप्त होऊन, त्यास आपोआपच सतेजता आली. इतका फायदा ह्या यावनिक कालांत, केवळ ग्रीक ( यवन ) लोकांच्या सहवासानें झाला. तथापि, या पाश्चिमात्य लोकांच्या ज्ञानदीपावर हिंदूंनीं आपल्या अपूर्व कल्पनासामर्थ्यानें, व बुद्धिप्रगल्भतेनें छाप बसवून, आपला यशोदुंदुभि आशिया आणि युरोपखंडांत सर्वत्र गर्जविला. व त्यायोगानें त्यांची दिगन्त कीर्ति झाली. याविषयीं प्रोफेसर वेबर असें लिहितात कीं,

हिंदूज्योतिःशास्त्रांचें चलन.

हिंदूंची ज्ञानोन्नत्ति व उत्कर्ष आणि तत्संबंधीं पाश्चिमात्यांचे अभिप्राय.

" And accordingly we find that they turned these Greek aids to good account; rectifying, in the first place, the order of their lunar asterisms, which was no longer in accordance with reality, so that

the two which come last in the old order occupy the two first places in the new; and even, it would seem, in some points independently advancing astronomical science further than the Greeks themselves did. Their fame spread in turn to the West; and the Anduborius ( or, probably, Arduborius ), whom the Chronicon *Paschale* places in primeval times as the earliest Indian astronomer, is doubtless none other than Aryabhat, the rival of Pulisha, who is likewise extolled by the Arabs under the name Arjabahr. For, during the eighth and ninth centuries, the Arabs were in astronomy the desciples of the Hidus, from whom they borrowed the lunar mansions in their new order, and whose Sidhantas ( Sindhends ) they frequently worked up and translated, in part under the supervision of Indian astronomers themselves, whom the Khalifs of Bagdad, &c, invited to their Courts."

( History of Indian Literature P. 255.)

उत्कर्ष कालांतील हिंदु ग्रंथकार, व त्यांचे शोध.

आर्य ज्योतिर्विद्येच्या उत्कर्षकालांत पहिला चमकणारा तारा आर्यभट होय. हा इ. स. ४७६ सालीं कुसुमपुर ( हल्लींचे पाटलीपुत्र किंवा पाटणा ) येथें जन्मला असून, त्यानें आपल्या वयाच्या तेविसाव्या वर्षी दशगीतिसूत्र व आर्याष्टशत, हे ग्रंथ केले. त्यानंतर बऱ्याच

वर्षांनीं त्यानें आर्यसिद्धान्त नामक ग्रंथ रचला. ह्याचे अठरा अध्याय असून, हा एक नामांकित पैकीं ग्रंथ आहे. आर्यभटाशिवाय लाध, पुलिश, श्रीषेण, विष्णुचंद्र, वगैरे ज्योतिषी होऊन गेले असून, त्यांनीं सौर-सिधान्त, पौलिशसिधान्त, रोमकसिधान्त, वशिष्ट-सिधान्त, व ब्रह्म सिधान्त किंवा पैतामह सिधान्त केले असल्याविषयीं सांगतात. आर्यभटानंतर इ० स० ५०४ सालीं वराहमिहिर जन्मला. याचे बृहत्संहिता, समाससंहिता, आणि होराशास्त्र, असे प्रसिद्ध ग्रंथ आहेत. बृहत्संहितेवर भट्टोत्पलाची उत्तम टीका आहे. वराहमिहिर शके ५०९ ( इ० स० ५८७ ) सालीं मरण पावला. त्यानंतर ब्राम्हणांची ज्योतिःशास्त्र ज्ञानासं-बंधीं चोंहोकडे ख्याति झाल्यामुळें, त्यांची कीर्ति ग्रीस देशांतही पसरली. तेव्हां ग्रीक लोकानीं कॉनिकन्पाश्चल नामक ग्रंथांत ब्राम्हणांच्या ज्ञानप्रदीपानें कमजास्ती दुरुस्ती केली. पुढें सातव्या शतकांत ( इ० स० ६६४ सालीं ) ब्रह्मगुप्त नामक नामांकित ज्योतिषी होऊन गेला. ह्याशिवाय पराशर, शक्तिपूर्व, विष्णुगुप्त ( चाणक्य ), देवस्वामी, सिद्धसेन, वज्र, जीवशर्मा, सत्य, वगैरे मोठमोठे ज्योतिषी होऊन गेले असल्याचें वराहमिहि-राच्या लेखावरून कळतें. ब्रह्मगुप्तानंतर इसवी शकाच्या आठव्या आणि नवव्या शतकांत, आरब लोक हिंदुंचे

चेले बनले, आणि त्यांनीं **हिंदूंपासून** ज्योतिर्विद्या प्राप्त करून घेतली, व ज्योतिःसिधान्ताचें **आरबी** भाषेंत **सिन्धेन्ध** नामक भाषांतरही करविलें. पुढें नवव्या शतकांत ( ह्मणजे इ० स० ८९९ च्या सुमारास ) धाकटा **भास्कर** नामक ज्योतिषी प्रसिद्धीस आला. त्यानें **करणसार** नांवाचा ग्रंथ त्याच सुमारास लिहिला असल्याचें **आल्बीरूणी**च्या लेखावरून समजतें. शिवाय त्यानें **अहर्गण** नामक ग्रंथ केला असल्याचेंही **आल्बीरूणी** लिहितो. त्यानंतर केवळ सूर्योपमच जो प्रसिद्ध **भास्कराचार्य**, हा बाराव्या शतकांत उदयास आला. ह्या भास्कराचें जन्म त्याच्याच स्वलिखिताप्रमाणें शके १०३६ ( इ० स० १११४ ) सालीं झालें असून, त्यानें केलेला **सिद्धांतशिरोमणि** शके १०७२ ( इ० स० ११५० ) सालीं पुरा झाला; आणि **करणकुतूहल** शके ११०९ ( इ० स० ११८३ ) सालीं पुरें झालें.

सिद्धान्तशिरोमणींतील मूलतत्वें.

**सिद्धान्तशिरोमणीं**त पृथिवी गोल असल्याविषयीं खालीं लिहिलेलें प्रमाण सांपडतें.

**भूमेः पिंडः शशांकज्ञकविरविकुजेज्यार्किनक्षत्रकक्षा**
**बृत्तैर्वृत्तोवृतः सन्मृदनिल सलिलव्योम तेजोमयोयम्।**
**नान्याधारः स्वशक्त्यैव वियतिनियतं तिष्ठतीहास्यपृष्ठे**
**निष्ठं विश्वंच शश्वत् सदनुजमनुजादित्य दैत्यं समंतात्॥**

ह्याचा तात्पर्यार्थ इतकाच कीं, पृथिवीचा पिंड वाटोळा असून तो पंचमहाभूतात्मक आहे. तसेंच तो चंद्रापासून जवळ असून, चंद्रापुढें बुध, शुक्र, व रवि, असे लागतात. शिवाय मंगळ, गुरु, शनि, आणि नक्षत्रादि वर्तुल गोल, यांनीं तो परिवेष्टित असून, तो कांहींएक आधाराशिवाय आपल्या आत्मशक्तीनें आकाशाच्या पोकळींत, देव, दैत्य, मनुष्य, व राक्षस, इत्यादिसहित, नियमितपणानें राहिला आहे.

पृथिवीची गोलाकृति.

पृथिवीचें आकर्षण.

पृथिवीच्या आकर्षण शक्तीविषयीं ज्योतिषग्रंथांत एक उत्तम आधार सांपडतो.

**आकृष्टशक्तिश्च महीतयायत्**
**खस्थं गुरुस्वाभिमुखं स्वशक्त्या ।**
**आकृष्यते तत्पततीवभाति**
**समेसमंतात्क पतत्वियंखे ॥**

ह्यावरून इतकें सिद्ध आहे कीं, पृथिवीच्या अंगीं आकर्षणशक्ति असल्यामुळें, ती आकाशांतील पदार्थांस आपणाकडे ओढते; व त्यायोगानें ते पडतात असें दिसत. परंतु वास्तविक पाहतां तसें नसून, ते आकर्षणशक्तीनें पृथिवीकडे आकर्षिले जातात. आणि ही गोष्ट आमच्या हिंदूंस सात आठशे वर्षांपूर्वीं, किंबहुना त्याही पलीकडे

वरीच शतकें अगोदर, चांगल्या रीतीनें कळली होती ! निर्विवाद आहे. न्यायशास्त्रांत " गंधवती पृथ्वी, सानि त्याअनित्याच, नित्या परमाणुरूपा, अनित्या कार्यरूपा, ' अशी पृथिवीची व्याख्या दिली आहे. आणि ती परमाणु रूप असून, सर्व परमाणुमात्राच्या ठायीं आकर्षणशक्ति असल्यामुळें तिच्यांतही आकर्षण आहे असें त्यांनीं यथान्याय ठरविलें.

सूर्य फिरत नसून पृथिवी फिरते, व त्यामुळें सूर्यच फिरतो आहे असें वाटतें; तसेंच जितके गोल तितके सर्व फिरतात; इत्यादि शोध फार पुरातन काळीं लागले होते. इतकेंच नाहीं तर, त्या शोधांत एकामागून एक अशी नवीन भर पडतच चालली होती, आणि ते नवीन शोध शास्त्रज्ञ, तत्वज्ञ, व कवि वगैरे लोक-समाजास, चांगले माहीत होते. साधुवर्य **ज्ञानेश्वर** हा एके ठिकाणीं असें लिहितो कीः—

**आणि उदो अस्ताचेनि प्रमाणें ।**
**जैसें न चलतां सूर्याचें चालणें ॥**
**तैसें नैष्कर्म्य तत्व जाणें ।**
**कर्मीचि असतां ॥**

( ज्ञा. अ. ४ ओं. ९९. )

**अथवा नावेहून रिगे ।**
**तो थडियेचे रुख जातां देखे वेगें ॥**

तोचि साचोकारें पाहों लागे।
रुख म्हणे अचल ॥

( ज्ञा. अ. ४ ओं. ९७. )

घायें गडबडी धोंडे ब्रह्म गोळकांचे ॥

( ज्ञानेश्वरी अ. ७ ओं. ७९. )

प्राचीनकाळांतील हिंदूंच्या शोधाविषयीं, पाश्चिमात्यांचे विचार.

**हिंदु** ज्योतिर्विद्येच्या या **उत्कर्षकालांत** जे जे ह्मणून शोध लागले ते इतक्या महत्वाचे, सूक्ष्म, आणि परिपूर्ण होते कीं, ते हल्लींच्या सुधारलेल्या एकोणीसाव्या शतकांतही **पाश्चात्य** विद्वानांस अगदीं थक्क करून सोडतात; व ते कल्पक आणि अपूर्व असल्यामुळें, विस्मयास पात्र होतात. याविषयीं **व्हिट्ने** नामक गृहस्थ हे, **प्राच्य भाषादीपक** नांवाच्या ग्रंथांत, असें लिहितात कीं:—

The Surya Sidhanta is " one of the most ancient and original of the works which present the modern astronomical science of the Hindus."

( Oriental and linguistic studies.)
H, I. L. P. 258. vide foot note 286,

हिंदुज्योनिर्विद्येचा अस्तकाल.

**हिंदुज्योतिर्विद्येचा अस्तकाल** ह्मटला म्हणजे इ॰ स॰ १२०० पासून १८०० पर्यंत होय. जे या शास्त्रांत पूर्वीं **आरब** लोकांचे गुरू होते, तेच **हिंदु** आता

त्यांचे शिष्ये बनले. ज्या अल्‌किंडीनें हिंदुज्योतिःशास्त्र, व गणितशास्त्र, यांच्या आधारें अनेक ग्रंथ, नवव्या शतकांत, आरवी भाषेंत लिहिले, त्याच अल्‌किंडीचे ग्रंथ आतां प्रमाणभूत होऊन त्यांचीं, व इतर यवनी ग्रंथांचीं संस्कृतांत भाषांतरेंही झालीं. आणि हें नवीन, परकीय, व पारिभाषिक शब्दांवरून, निःसंशय ठरतें. या कालांतही ज्योतिर्विद्येंत, हिंदुरत्नें चांगलीं चांगलीं मधून मधून चमकलीं. परंतु एकंदरीनें पाहतां तीं फारच विरळ होत. ज्योतिःशास्त्राप्रमाणेंच दैवज्ञविद्याही लयास जात चालली. शुभ शकुन, इंद्रजाल, मंत्र, वगैरे वैदिक कालापासूनच चालत आले असून, त्यांचा प्रचुर उल्लेख अथर्व वेद, गृह्यसूत्रें, कौशिकसूत्रें, सामविधान ब्राम्हण, शतपथब्राह्मण, आणि अथर्व परिशिष्टें, यांत आढळतो. याशिवाय वराहामिहिर यानें केलेली संहिता, व नागार्जुन, यांत त्याजविषयीं विशेष वर्णन आहे. हें आमच्या हिंदूंचें दैवज्ञशास्त्र भरतखंडांत पसरल्यावर त्याचा संचार पश्चिमेकडे होत होत, थेट युरोप व आफ्रिका खंडांत झाला. आणि ही गोष्ट पाश्चिमात्य राष्ट्रें देखील कबूल करतात. प्रोफेसर वेबर असें लिहितात कीं:—

दैवज्ञविद्या.

तिचा युरोप व आफ्रिका खंडांत प्रसार.

" Many of their notions have long been naturalised in the West, through the medium of the Indian fables and fairy tales which were so popular in the Middle Ages—those, for instance, for the purse ( of Fortunatus ), the league-boots, the magic mirror, the magic ointment, the invisible caps, &c. "

( H. I. L. P. 264 ).

राजाजयसिंगच्या वेधशाला, व त्याचे शोध.

असो, **भास्कराचार्यानंतर मुसल्मान्** लोकांच्या स्वाऱ्या होऊं लागल्यामुळें **हिंदु**-ज्योतिःशास्त्र अगदींच लयास जात चाललें. पुढें इसवी शकाच्या अठराव्या शतकांत, ह्मणजे इ० स० १७१०–१७३९ च्या दरम्यान, **दुसऱ्या जयसिंग राजानें** ग्रहाचे वेध घेण्याकरितां **जयपूर, दिल्ही, काशी, मथुरा, उज्जनी,** वगैरे ठिकाणीं वेधशाला स्थापन केल्या; त्यायोगानें **न्यूटननें** काढलेलीं ज्योतिःशास्त्राचीं मूलतत्वें सर्वत्र स्थापित होण्यापूर्वीं, **डी. ला. हायरनें** जें ग्रहांचें कोष्टक इ० स० १७०२ सालीं तयार केलें होतें, त्यांत जरूर तितकी दुरुस्ती करण्याचें सामर्थ्य त्यास आलें. पुढें ग्रहमालिका तयार करण्यासाठीं आपण स्वतः परिश्रम घेऊन, **राजा जयसिंगनें " तिज महमदशाई "** नामक आपलें स्मारक करून ठेविलें. त्यानें बांधलेल्या वेधशालांपैकीं क़ाशींतील वेधशाला अजूनही असून, बाकीच्यांचे

राहिलेले अवशिष्ट भाग जे हल्लीं दृष्टिगोचर होतात, त्यावरून त्याच्या बुद्धिविशालत्वाचें चांगलें दिग्दर्शन होतें.

युरोपांतील यावेळच्या स्थितीचें दिग्दर्शन.

याप्रमाणें इसवी शकापूर्वी चार पांच हजार वर्षांपासून तों इसवी शकानंतर एक हजार ( १८०० ) आठशें वर्षेपर्यंत, किंवा सरासरीच्या ठोक प्रमाणानें, सुमारें सहा सात हजार वर्षांच्या घडामोडीत, **हिंदुज्योतिःसूर्य** उदय पावून, व आपल्या प्रखर आणि शुद्ध तेजानें अखिल जगत् दिपवून टाकून, कालगतीनें तो लयासही गेला. आतां, सदरहु मुदतींत ज्योतिर्विद्येसंबंधीं **यूरोपखंडांतील** कशी स्थिति होती याविषयीं थोडेंबहुत तरी दिग्दर्शन होण्यासाठीं, अंमळ विचार करूं.

ग्रीस देशांतील नक्षत्रावलोकनाचा काळ

**आशियाखंडांत हिंदु ज्योतिःसूर्य** उदय पावल्यावर सुमारें सत्तावीसशें किंवा अठ्ठावीसशें वर्षांनीं, **ग्रीस** देशांत कोठेंसें प्रथमतःच नक्षत्रावलोकन सुरू झाल्याचें दिसतें. आतां हें नक्षत्र-कथन **ग्रीक** लोकांच्या **आर्गो** नामक स्वारींत प्रथम आढळून येत असून, ती गोष्ट इसवी शकापूर्वी सुमारें बाराव्या किंवा तेराव्या शतकांत घडून आल्याविषयीं अजमास आहे. त्या कालानंतर **ग्रीस** देशांत **तालेमी** आणि **आरिस्टाटल** असे प्र-

भूगोलाविषयीं आरिस्टाटल व तालेमी यांचें मत

सिद्ध पुरुष होऊन गेले; व त्यांचेंच मत सर्व **युरोपखंडांत** त्यावेळीं, व त्यानंतर इसवी शकाच्या पंधराव्या शतकापर्यंत प्रचारांत होतें. पृथिवी अचल असून तिच्या सभोंवतीं सूर्य व इतर ग्रह फिरतात, हेंच त्यांच्या मताचें मूलबीज होय. **आरिस्टॉटल्**चा शिवाय असाही सिद्धान्त होता कीं, एक जड आणि एक हलका असे एका जातीचें दोन पदार्थ सारख्या उंचीवरून एकदम सोडिले, तर जड पदार्थाचें वजन हलक्या पदार्थापेक्षां जितकें अधिक असेल, तितक्या प्रमाणानें तो जड पदार्थ हलक्या पदार्थापूर्वी भूमीवर पडेल. आतां, आमच्या अतिप्राचीन **हिंदु** ज्योतिःसिद्धान्ताशीं ह्या **यावनिक** सिद्धान्तांची तुलना करून पाहिली तर, हे यावनिक सिद्धान्त किती बालिश आणि खरेपणापासून दूर आहेत, हें जास्त सांगावयास नको. हीं **ग्रीक** लोकांचीं वेडगळ मतें, थेट गेल्या पंधराव्या शतकापर्यंत, **यूरोपखंडांत** सर्वत्र प्रचारांत होतीं.

त्यांच्या मताचें मिथ्यत्व.

ह्या मतांत बदल होण्याला पुष्कळ कारणें झालीं. इ० स० १४७३ सालीं, **प्रशिया देशांत कोपर्निकस्** नामक विद्वान **गृहस्थ, थार्न्** या गांवांत जन्मला. त्याला लहान पणापासून गणितविद्या फारच आवडत असल्यामुळें, तो ती मोठ्या उत्साहानें शिकला, व त्यानें शिवाय ज्योतिः-

त्यांत बदल होण्याचीं कारणें.

शास्त्राचाही अभ्यास केला. तसेंच त्यानें चांगले परिश्रम घेऊन ग्रीक व लाटीन या भाषांचें ही बरेंच ज्ञान संपादिलें. त्यामुळें त्या भाषांतील ज्योतिःशास्त्रावरील ग्रंथ अवलोकन करण्याचें त्यास सामर्थ्य आलें. हिंदुज्योतिर्विद्येचा उत्कर्ष झाल्यामुळें त्यांची कीर्ति आशिया व युरोपखंडांत पसरून त्यांनीं [म्हणजे हिंदूंनीं] केलेल्या नवीन शोधाप्रमाणें, क्रॉनिकन् पाश्चेल नामक ग्रंथांत, सातव्या शतकांत ( इ० स० ६१०–६४१ सालीं ) ग्रीक लोकांनीं दुरुस्तीही केलीच होती. तेव्हां त्याही ग्रंथाचा अभ्यास केल्यामुळें, सूर्यगोल, भूगोल, चंद्रगोल, वगैरे ग्रहांबद्दल, व तत्संबंधीं शोधाविषयीं, हिंदूंनीं जें कांहीं खरे सिद्धान्त प्राचीन काळींच ठरविले होते, ते सर्व ग्रीक ग्रंथद्वारें पाहून, त्यांच्या खरेपणाची प्रतीति घेण्यास त्याला चांगली संधी मिळाली. त्या योगानें कोपर्निकस् याची अशी बालंबाल खातरी झाली कीं, सूर्य हा ग्रहमालिकेचा मध्य-असून बुध, शुक्र, पृथिवी, मंगल, गुरु, आणि शनि, हे त्याच्या सभोंवतीं फिरतात. कोपर्निकस् इ. स. १५४४ सालीं मरण पावला, आणि त्याच्या मागून इ० स० १५६४ त,

कोपर्निकस याचें मत.

ग्यालिलियो नांवाचा पुरुष इताली देशांतील पिसा नामक शहरांत जन्मला. तो मोठा बुद्धिवान् होता या-

ग्यालिलियोचें मत.

मुळें गणितविद्येंत चांगला प्रवीण झाल्यावर, त्यानें अनुभव घेऊन **अरिस्टॉटल्चीं** कांहीं मतें खोटीं ठरविलीं; तेव्हां सर्व लोकांनीं त्याजवर गिल्ला करून त्याचे फार हाल केले. व त्या हालांत तो इ० स० १६४२ सालीं मरण पावला. त्याच सालीं, **न्यूटन्** नामक प्रसिद्ध विद्वान् ज्योतिषी, **इंग्लंडांत कोल्स्तवर्थ** गावीं जन्मला. यानें पृथिवीचें आकर्षण इत्यादि **आर्य** शोधांचें पुनरुज्जीवन केलें, व कांहीं नवीन शोधही लाविले. तदनंतर तो इ० स० १७२६ सालीं मरण पावला.

न्यूटनूचें मत.

याप्रमाणें इसवी शकाच्या पंधराव्या शतकापर्यंत, **युरोपांत** सर्वत्र अज्ञानान्धकारच पसरला असल्यामुळें, लोकांच्या अडाणी समजुती जशाच्या तशाच राहिल्या होत्या. अशावेळीं **कोपर्निकस्, ग्यालिलियो, न्यूटन्,** यांचा उदय झाल्यामळें, लोकांचें अज्ञान नाहींसें झालें, ही गोष्ट अभिनन्दनीय आहे. तथापि, पृथिवीचें सूर्यासभोंवतीं परिवर्तन, सूर्याचें आकर्षण, ग्रहणाचें कारण, पृथिवीचें आकर्षण, इत्यादिसंबंधीं त्यांनीं नवीन शोध काढले म्हणून जें **युरोपस्थांचें** म्हणणें आहे, तें केवळ मिथ्यावाद असून, त्यांनीं फक्त हिंदुंनीं फार प्राचीन काळीं लाविलेल्या शोधांचें पुनरुज्जीवनच केलें, असें म्हणण्यास हर-

आर्यज्योतिर्विद्या, व तिचें पाश्चिमात्य देशांत पुनरुज्जीवन.

कत नाहीं. हिंदूंचें ज्योतिःशास्त्रांतील शोध कोपर्निकसाच्या पूर्वीं सुमारें हजार वर्षें, इतक्या पूर्णतेस आले होते कीं, त्यांच्या शोधाप्रमाणें ग्रीक लोकांनींही आपल्या ग्रंथांत दुरुस्ती केली, व आरब लोकांनीं देखील हिंदुशास्त्राचें झपाट्यानें अध्ययन चालविलें. याविषयीं प्रसिद्ध इतिहासकार डाक्टर हंटर असे लिहितात कीं:—

" In certain points the Brâhmans advanced beyond Greek astronomy. Their fame spread throughout the West, and found entrance into the Chronicon Paschale ( Commenced about 330 A. D. revised, under Heraclius 610—614 A. D. ). In the 8th and 9th centuries, the Arabs became their disciples, borrowed the lunar mansions in the revised order from the Hindus, and translated the Sanskrit astronomical treatises ' *Siddhantas* ' under the name of Sindhends. "

( Indian Empire P. 105 )

ग्रीक हे हिंदूंचे चेले.

परंतु, अशा प्रकारें ग्रीक लोकांनीं हिंदूंपासून संपादन केलेलें ज्ञान कांहीं कालानें लयास गेलें. आणि एकंदर पांच सातशें वर्षांच्या मुदतींत यूरोपांत जो अज्ञानांधकार पसरला होता, त्यांत त्याचा मागमूस लागण्यास मोठी अडचण पडली. तथापि, अति परिश्रम घेऊन सदरहू पाश्चिमात्य विद्वन्मणिरत्नांनीं पूर्वींचे प्राच्य सिधान्त यूरोपांत सर्वत्र स्था-

पित केले. आणि ह्या त्यांच्या कृत्याबद्दल आम्ही त्यांचे खरोखरच आभार मानले पाहिजेत.

ज्योतिःशास्त्रांतील आह्मा हिंदूंचे शोध प्रथमचे आणि मूळचेच असून, त्या संबंधानें ते कोणत्याही राष्ट्राचे बिलकुल ऋणी नाहींत, अशाविषयीं साधकबाधक कारणांचें साद्यंत विवेचन मागें तेराव्या भागांत केलेलें आहे. सबब ह्या बाबतींत आतां येथें पुनरावृत्ति करण्याचें कारण नाहीं.

वेदांतील प्राचीन शोध.

एक पाश्चात्य शोधक विद्वान् असें म्हणतो कीं, न्यूटन्चें सर्व तत्वज्ञान आणि शास्त्रमीमांसा, हीं वेदांत दृग्गोचर होत असून, त्यांतच विश्वाच्या सर्वाकर्षणशक्तीचा प्रभाव ठायीं ठायीं सूचित केला आहे.

एकंदरींत, उपलब्ध असलेली यच्चावत हकीकत पाहून प्रत्येक गोष्टीचा सर्व बाजूनें विचार करता असें दिसून

---

1 " Sir W. Jones ventures to affirm that the whole of Newton's Theology, and part of his Philosophy, may be found in the Vedas, which also abound with allusions to a force of universal attraction. "

( *vol. III,* P. 246 )

( *vol, XXIX* P. 158. )

इतर राष्ट्राच्या तुलनेनें हिंदुंचें प्राचीनत्व.

येतें कीं, इतर सर्व राष्ट्रें अगदीं आज्ञानांत होतीं, त्यावेळीं ज्ञानार्जनांत हिंदूंचें पाऊल पुष्कळच पुढें असे. आणि त्यांची शास्त्रीयपद्धति व रीति, इतर राष्ट्रांहून

---

1 * * * " But on the other hand, in the first part of their progress, all other nations were in still greater ignorance than they "( Hindus ); and in the more advanced stages, where they were more likely to have borrowed, not only is their mode of proceeding peculiar to themselves, but it is often founded on principles with which no other ancient people were acquainted ; and shows a knowledge of discoveries not made, even in Europe, till within the course of the last two centuries. As far as their astronomical conclusions depend on those discoveries, it is self-evident that they cannot have been borrowed; and, even where there is no such dependence, it cannot fairly be presumed that persons who had such resources within themselves must necessarilly have relied on the aid of other nations. " *

" It seems probable that, if the Hindus borrowed at all, it was after their own astronomy had made considerable progress; * * * and * * it would rather seem as if they had taken up hints of im-

( पुढें चालू )

इतकी भिन्न आहे कीं, अन्य राष्ट्रांकडून त्यांजला ज्ञानप्राप्ति झाल्याचें यत्किंचित् देखील संभवत नाहीं. आणि ह्मणूनच मूलज्ञानसंपादनांत ते इतर राष्ट्राचे बिलकुल ऋणी नाहींत. मात्र, इतर राष्ट्रांशीं

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू )

provement than implicitly copied the doctrines of their instructors."

"In addition to the points already mentioned, in which the Hindus have gone beyond the other ancient nations, Mr. Colebrooke mentions two in astronomy: one is in their notions regarding precession of the equinoxes, in which they were more correct than Ptolemy, and as much so as the Arabs, who did not attain to their degree of improvement till a later period; the other relates to the diurnal revolution of the earth on its axis, which the Brahmans discuss in the fifth century, aud which although formerly suggested in [ancient times by the Heraclius, had been long laid aside by the Greeks, and was never revised in Europe until the days of Copernicus."

"From what has been already said, it seems very improbable that the Indian Geometry and Arithmetic have been borrowed from the Greeks

( पुढें चालू )

त्यांचें दळणवळण सुरू झाल्यावर, ज्ञानाचा साहजिक मोबदला होऊन, त्यांच्या ज्ञानांत क्वचित् प्रसंगीं भर पडल्याचें दिसतें.

## भूमितिशास्त्र, अंकगणित, व बीजगणित.

ज्योतिःशास्त्रापेक्षांही गणिताच्या इतर शाखांत, **हिंदूंनीं** सर्व राष्ट्रांच्या अगोदर अतिमहत्वाचे शोध के-

---

( मागील पृष्टावरून पुढें चालू )

and there is no other nation which can contest the priority in those sciences. The peculiarity of their method gives every appearance of originality to their discoveries in Algebra also." * * *

"Whatever the Arabs possessed in common with the Hinuds, there are good grounds for thinking that they received from the latter nation, and however great their subsequent attainments and discoveries, it is to be remembered that they did not begin till the eighth century, when they first gained access to the treasures of the Greeks."

(Elphinstone's History of India, P.P. 250/257.)

पाश्चिमात्यांचा तत्संबंधीं अभिप्राय.

१ आमच्या एकंदर **गणितशास्त्र**-ज्ञानाविषयीं प्रसिद्ध इतिहासकार **एल्फिन्स्टन्** असें लिहितात कीं:—

"The progress made in other branches of Mathematical knowledge was still more remarkable

( पुढें चालू )

ण्याचें दिसतें. सूर्यसिद्धान्तांत भूमितिशास्त्राच्या संबंधानें जे सिधान्त त्यांनीं स्थापित केले आहेत, त्यावरून इसवी शकाच्या पांचव्या आणि सहाव्या शतकांतही हिंदूंचें तत्संबंधीं ज्ञान फारच विकासाप्रत पावलें असून, त्याचा यत्किंचित् गंधही ग्रीक लोकांस त्यावेळीं नव्हता. इतकेंच नाहीं तर, त्यांत प्रतिपादन केलेल्या सिधान्तांचा शोध यूरोपखंडांत कोठेंच सोळाव्या शतकापर्यंतही झाला नव्हता, हें निर्विवाद आहे. त्रिकोणाचे धर्म, त्याच्या तीन बाजूच्या प्रमाणांनीं सिद्ध झालेलें क्षेत्रफळ, आणि परिघि व त्रिज्या यांचें परस्पर प्रमाण, याविषयीं सूर्यसिद्धान्तांत जे जे शोध हिंदूंनीं केले, त्यांत त्यांचें विशेष नैपुण्य दिसून येतें. आणि ह्या शास्त्रांतही त्यांचें पाऊल इतर[१] राष्ट्रापेक्षां

त्यांचें भूमितिशास्त्र.

( मागील पृष्ठावरून पुढें चालू )

than in astronomy. In the "Surya sidhanta," * * * is contained a system of Trigonometry, which not only goes far beyond anything known to the Greeks, but involves theorems which were not discovered in Europe till the sixteenth century."

1 "Their Geometrical skill is shown, among other forms, by their demonstrations of various properties of triangles, especially one which expresses the area in the terms of the three sides, and was unknown in Europe till published by Clavius ( in the sixteenth Century); and by their knowledge of the

( पुढें चालू )

जास्त पुढें सरसावल्यासारखें दिसतें. कारण, तत्संबंधीं ज्ञान **यूरोपखंडांत** सोळाव्या शतकापर्यंत कोणासही नव्हतें.

त्यांचें अंकगणित व बीजगणितशास्त्र.

**अंकगणितांत** देखील दशांश रीति प्रथमतः **हिंदूंनींच** शोधून काढिली असल्यामुळें, त्यांचें श्रेष्ठत्व आपोआपच प्रसिद्धीस आलें. परंतु यापेक्षांही **ब्राह्मणांची** सर्वांवर "**तान**" म्हटली म्हणजे **बीजगणितांत** होय. या विषयांत त्यांनीं आपल्यावर दुसऱ्या कोणत्याही राष्ट्राची मात्रा लागून बिलकुल चालूनच दिली नाहीं. इसवी शकाच्या पांचव्या शतकांत **आर्यभटाच्या** वेळीं, म्हणजे इ० स० ४७६ नंतर, हें शास्त्र अगदीं पूर्णत्वास येऊन पोहोंचलें असून, **आर्यभटाच्या** बीजारोपणावरच **ब्रह्मगुप्त** व **भास्कराचार्य**, यांनीं यथावकाश जलसिञ्चन करून, तो शास्त्रवृक्ष

---

( मागाल पृष्ठावरून पुढें चालू )

proportion of the radius to the circumference of a circle, which they express in a mode peculiar to themselves, by applying one measure and one unit to the radius and circumference. This proportion which is confirmed by the most approved labours of Europeans, was not known out of India, until modern times."

1. "The Hindus are distinguished in Arithmetic by the acknowledged invention of the decimal notation; and it seems to be the possession of this

( पुढें चालू. )

पूर्ण विकासाप्रत आणिला. **आर्यभटाचा** समकालीन **डायोफान्टस्** असल्याविषयीं **कोलब्रूक** याचें म्हणणें आहे; आणि **डायोफान्टस्** हा **ग्रीस** देशांतला पहिला बीजगणिति होय. समीकरणें सोडविण्यांत **डायोफान्टस्**पेक्षां **आर्यभटाची** जास्त कुशाग्रबुद्धि असून, तो **डायोफान्टस्**पेक्षां एकंदरीनें श्रेष्ठतर होता, असें **पाश्चिमात्य**ही कबूल करतात. **आर्यभटाच्या** वेळीं बीजगणितशास्त्र इतक्या पूर्णत्वास आलें होतें त्यावरून,

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू )

discovery which has given them so great an advantage over the Greeks in the science of numbers."

1. "But it is in Algebra that the Brâhmans appear to have most excelled their contemporaries." In the time of Arya Bhat, "the science seems to have been at its height; and who, though not clearly traced further back than the fifth century, may, in Mr. Colebrooke's opinion, not improbably have lived nearly as early as Diophantus, the first Greek writer on Algebra; that is, about A. D. 360."

"But, whichever may have been the more ancient, there is no question of the superiority of the Hindus over their rivals in the perfection to which they brought the science. Not only is Arya Bhata superior to Diophantus, (as is shown by his knowledge of the resolution of equations involving several unknown quantities, and in a general method of resolving all intermediate problems of

( पुढें चालू )

कदाचित् त्याच्याही पूर्वी बरींच शतकें सदरहू शास्त्राचें अन्वेषण हिंदूंनीं सतत चालविलें असावें, असें साधारण अनुमान होतें. कारण, अनेक वर्षांचे सतत शोध चालू असल्याशिवाय अशीं शास्त्रें पूर्णत्वास येण्याचा क्वचितच संभव असतो.

भरतखंडाच्या तुलनेनें यूरोपांतील अज्ञान.

जें समीकरणें ब्रह्मगुप्तानें इ० स० च्या सहाव्या शतकांत तपशीलवार सोडविलें, त्याच तऱ्हेचें, किंबहुना तेंच समीकरण सोडविण्यास, यूरोप खंडांत शंभर वर्षांवर वर्षें लागलीं. आणि तितक्याही मुदतींत, तिकडील

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

at least the first degree,) but he and his successors pressed hard upon the discoveries of algebraists who lived almost in our own time. Nor is Arya Bhata the inventor of algebra among the Hindus; for there seems every reason to believe that the science was in his time in such a state, as it required the lapse of ages, and many repeated efforts of invention, to produce. It was in his time, indeed, or in the fifth century, at latest, that Indian science appears to have attained its highest perfection."

1 * * * "Another occurs in the same Review (vol. XXIX. P. 153.), where it is stated, from Mr. Colebrooke, that a particular solution given by Bháskara (A. D. 1150) is exactly the same that

( पुढें चालू. )

कित्येक विशाळ, व तीव्र मेंदू खर्ची पडले. प्रथमतः इ० स० १६५७ सालीं लॉर्ड ब्राउंकर यांच्या लक्षांत हें समीकरण आलें. त्यांनीं तें सोडविण्याच्या कामीं पुष्कळ यत्न केला. परंतु तो निष्फळ झाला. पुढें युलरनेंही प्रयत्न केला, पण तो देखील सिद्धीस गेला नाहीं. शेवटीं इ० स० १७६७ सालीं, डी. ला. ग्रेंजनें तें दीर्घोद्योगानें सोडविलें.

सदरहू सर्व गोष्टींवरून इतकें कोणाच्याही लक्षांत येईल कीं, प्राचीन काळीं हिंदूंचें ज्ञान इतर सर्व राष्ट्रांपेक्षां श्रेष्ठतर असे; त्यांचे शोध अन्य राष्ट्रांच्या मानानें पुष्कळ प्राचीनतर होते; व त्यांच्या बुद्धिवैभवामुळें, इतर राष्ट्रें त्यांस फार पूज्य मानीत. आणि असें जर आहे तर,

---

( मागील पृष्टावरून पुढें चालू. )

was hit on by Lord Brounker, in 1657; and that the general solution of the same problem was unsuccessfully attempted by Euler, and only accomplished by De. la. Grange, A. D. 1767; although it had been as completely given by Brahma Gupta in the sixth century of our aera."

"But the superiority of the Hindus over the Greek algebraists is scarcely so conspicuous in their discoveries as in the excellence of their method, which is although dissimillar to that of Diophantus (Strachey's Bija Ganita, quoted in the " Edinburgh Review", vol. XXI. P. P. 374. 375.), and in the per-

( पुढें चालू. )

कांहीं अविचारी व असमंजस पाश्चात्यांनीं केवळ दर्पानें हिंदूंस मूढ व रानटी म्हणावें, त्यांस अगदीं पशुतुल्य मानावें, त्यांचा निष्कारण तिरस्कार करावा, आणि आपण अध्यी हळकुंडानेंच पिंवळें होऊन फुगावें, यासारखी लाजिरवाणी गोष्ट ती दुसरी कोणती?

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

fection of their logorithm. (Colebrooke, Indian Algebra, quoted in the "Edinburgh Review," vol. XXIX. P. 162.) One of their most favourite processes (that called *cuttaca*) was not known in Europe till published by Bachet de Mezeriac, about the year 1624, and is virtually the same as that explained by Euler. (Edinburgh Review, vol. XXIX. P. 151). Their application of algebra to astronomical investigations and geometrical demonstrations is also an invention of their own; and their manner of conducting it is, even now entitled to admiration. (Colebrooke, quoted by Professor Wallace, ubi Suprà, 408 409.; and Edinburgh Review.)

# भाग २३ वा.

## वैद्यशास्त्र.

हिंदूंचें वैद्यक हें त्यांच्या स्वतंत्र परिश्रमाचें फल.

**हिंदूंचें वैद्यक** देखील त्यांच्या स्वतंत्र परिश्रमाचेंच फल होय. ज्याप्रमाणें कर्ममार्ग प्रवृत्तीच्या संबंधानें वेळाचें नियमन होण्यासाठीं, नक्षत्रावलोकन करून ज्योतिःशास्त्राच्या मूलतत्वाचा पाया **हिंदूंनीं** घातला, त्याप्रमाणेंच पशुयज्ञांत निरनिराळ्या देवतांस निरनिराळ्या भागाचें हवन करण्याच्या निमित्यानें, त्यांस सहजींच शारीरिक ज्ञान झालें; आणि त्या योगानेंच हळू हळू **आयुर्वेदाची** अति पुराण इमारत रचली गेली. वैद्यशास्त्र किंवा आयुर्वेद हा **उपवेद** असून, तो **ईश्वरप्रणीत** आहे असें **हिंदु** लोक मानतात. **हिंदूवैद्यशास्त्र** फार प्राचीन काळींच विकासाप्रत पावलें असावें, असें दिसून येतें. **अथर्वण संहितेंत** निरनिराळ्या रोगांचीं नांवें दिलीं असून, त्यांच्या उपशमनार्थ भिन्न भिन्न वनस्पतींची योजना केलेली आहे.

त्याचें पौराणत्व.

**ऋक्संहितेंतील अपृण सूर्यसूक्तांत** पाली, सर्प, विंचू,

इत्यादि जंतूंच्या विषाचें नामनिदर्शन केलें असून, त्याच्या उपशमनार्थ पृथक् पृथक् प्रतिकारही सांगितलें आहेत; व त्यांतच कांहीं मंत्रांच्या प्रयोगाचीही योजना केल्यासारखें दिसतें:—

नवानां नवतीनां विषस्य रोपूषीणाम् ।
सर्वा सांमग्रभं नामारे अस्य योजनं हरिष्ठा मधुत्वा मधुला च ॥
त्रिःसप्तमयूर्यः सप्त स्वसारो अग्रुवः ।
तास्ते विषंवि जभ्रिर उदकं कुम्भिनी रिव ॥
इयत्तकः कुषुम्भकस्तकं भिनद्म्यश्मना ।
ततो विषंप्र वावृते पराचीरनु संवतः
कुषुम्भक स्तदब्रवीद्गिरेः प्रवर्तमानकः ।
वृश्चिकस्या रसं विषमरसं वृश्चिक ते विषम् ॥

( अ २. अ ९. व १६. मं १. अ २४. सू १९१. )

शतपथ ब्राम्हणांत ( १३ ) "सर्पविद्येचें" कथन केलें असून, अश्वलायन श्रौतसूत्रांत "विषाविद्येचें" नामोच्चारण झाल्याचें दिसतें. शतपथ ब्राह्मणांत "वयोविद्या" ह्मणजे पक्षिशास्त्र, याचाही उल्लेख केल्याचें आढळून येतें. आणि पतंजलीच्या महाभाष्यावरून तर, प्राणिशास्त्राचेंही थोडेंबहुत विवेचन करण्याचा प्रयत्न त्या काळीं

केल्यासारखें भासतें. आणि **अथर्वपरिशिष्टांत** "लक्षणा" संबंधीं जे विभाग दर्शविले आहेत त्यावरून अंतरीक्ष विद्येविषयीं दिग्दर्शन केल्याचें दिसतें.

त्याचा विकास-काल.

हिंदुवैद्यक केव्हां विकासाप्रत पावलें तो काळ निश्चयपूर्वक कळत नाहीं. तथापि, बाह्यपुराव्याच्या साधनांनीं तो ठरवितां येतो. **पाणिनी**च्या व्याकरणांत भिन्न भिन्न रोगांचीं नांवें दिलीं आहेत. त्यावरून **पाणिनी**च्या कालापूर्वीच, ह्मणजे इसवी शकापूर्वी ७०० वर्षे, व त्याच्याही अगोदर, वैद्यशास्त्रांत हिंदूंचा चांगला अभिनिवेश झाल्याचें दिसतें. तसेंच, कोशांमध्यें अतिप्राचीन असा जो **अमरकोश**, त्यांतही शारीरिक अध्यायांत, वैद्यकाचें शास्त्रीयरीत्या संवर्धन आणि उत्कर्ष झाल्याचें दिसून येतें. **अमरसिंहाचा** काल खात्रीपूर्वक कळून येत नाहीं. तथापि, **भोजराजा**च्या पदरीं जीं नवरत्नें होतीं त्यांपैकींच हा असल्यास, त्याचा उदयकाल इसवी शकापूर्वी ५६ वर्षें, किंवा त्या सुमारास असावा असें वाटतें.

हिंदु वैद्यकावरील अति प्राचीन ग्रंथ.

हिंदुवैद्यकावर लिहिणारे अति प्राचीन ग्रंथकार ह्मटले ह्मणजे **आत्रेय**, **अग्निवेश**, **चरक**, **धन्वंतरि**, **सुश्रुत**, **वाग्भट्ट**, इत्यादि होत. त्यांपैकीं **चरक** हा सूत्रकालांत झाला असावा, असा अजमास आहे.

ऋग्वेदांत याचें आदिकथन.

आतां, आमच्या **वैद्यशास्त्राचीं** मुळें किती दूरवर गेलीं आहेत, याचा विचार शोधकबुद्धीनें केला तर असें दिसून येईल कीं, तीं थेट **वेदकालांतहीं** खिळलेलीं दिसत असून त्यांचा प्रादुर्भाव, अखिल जगत्तलांवरील विशेष प्राचीन आणि अति पूज्य ग्रंथ जो **ऋग्वेद** यांत देखील, दृग्गोचर होतो. कारण, राजयक्ष्मा, हृद्रोग, वगैरे रोगांचीं नांवें, तसेंच यकृत्, प्लीहा, वगैरे शारीरिक भागांच्या संज्ञा, आमच्या **ऋग्वेदांत** आढळतात. त्यांवरून आमच्या **वैद्यशास्त्राच्या** उत्पत्तीचें व मूलतत्वांचें प्राचीनत्व किती आहे, हें वाचकांच्या सहजींच ध्यानांत येईल.

आयुर्वेदांत त्याचें विवेचन, व तत्संबंधीं पौराणिक कथानक.

**वैद्यशास्त्राचें** थोडें बहुत विवेचन **आयुर्वेदांत** केलेलें असून, त्यांत निदान, लक्षणें, व चिकित्सा, तसेंच रोगी आणि निरोगी, या दोन्ही अवस्थांचा विचार सांगितलेला आहे. ह्याविषयीं **पौराणिक** कथानक असें आहे कीं, हा **आयुर्वेद** पूर्वी **इन्द्रास** येत असून, त्यानें तो **भरद्वाजास**, तो अति बुद्धिमान् असे समजून, थोडक्यांत सांगितला. ह्यानें त्या स्कंधत्रयात्मक **आयुर्वेदाचें** यथार्थ ज्ञान, आपल्या बुद्धिप्रभावानें लवकरच प्राप्त करून घेतलें. त्यायोगानें तो रोगरहित, व चिरायु होऊन, त्यानें हा **वेद** इतर **ऋषींस** शिकविला. त्यांपैकीं,

**अत्रि** पुत्र जो **पुनर्वसु**, यानें केवळ लोकहितासाठींच, **ह्या** वेदाचें आपल्या सहा शिष्यांकडून फारच प्रेमानें पठण करविलें. ह्या षड्शिष्यांचीं नांवें **अग्निवेश**, **भेड**, **जातुकर्ण**, **पराशर**, **हारीत**, आणि **क्षारपाणि**, अशीं होतीं. सर्वांत **अग्निवेश** हा फारच बुद्धिमान् असल्या कारणानें, त्यानेंच प्रथम **वैद्यशास्त्रा**वर ग्रंथ लिहिला असून, तोच ह्या शास्त्रावरील आद्यग्रंथ आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. **अग्निवेशा**नंतर **भेडा**दि शिष्यांनींही आपापले ग्रंथ तयार केले; व ते **आत्रेया**दि महर्षींनीं पसंत केल्यावरून, तेच " **षड्भिषक् संहिता** " या नांवानें सर्वत्र प्रसिद्ध झाले.

याप्रमाणें, **वैद्यशास्त्रा**वरील ग्रंथकारांची **पौराणिक** कालांतील परंपरा अशा प्रकारची असून, **चरकां**तील चिकित्सास्थानाच्या १८ व्या अध्यायांत, **आत्रेयाला** " आयुर्वेदविदांश्रेष्ठं भिषग्विद्याप्रवर्त्तकम्, " असें ह्मटलें आहे. तथापि, **अग्निवेश तंत्रा**पुढें कोणाचेंही तेज पडतनासें झाल्यामुळें, त्याच्या पूर्वी, वैद्यकावर जीं जीं ह्मणून तंत्रें झालीं, तीं तीं सर्व लुप्त होऊन, त्यांचा हल्लीं मागमूस देखील राहिला नाहीं.

अग्निवेशतंत्र.

**अथर्ववेदां**त औषधांचें गुण वर्णन करणारीं कांहीं सूक्तें आढळतात. आणि **वैद्यशास्त्र** हें ह्या **वेदा**चेंच उपांग असल्याविषयीं **चरकादिकां**चें म्हणणें आहे. तसेंच

**ऋग्वेदांत** देखील कांहीं रोगांचीं नांवें, व शारीरिक भागांचें वर्णन आढळतें, त्यावरून **अग्निवेशापूर्वींही** वैद्यकावर कांहीं ग्रंथ झाले असावेत, असें अनुमान होतें. तथापि, ते सर्व ग्रंथ सूत्राप्रमाणें थोडक्यांत आणि संक्षेपानें लिहिलेले असून, त्यांपैकीं एकाचा देखील **अग्निवेशकृत तंत्रापुढें**, कांहींच प्रकाश पडतनासा झाल्यामुळें, ते आपोआपच नष्ट झाले असावे, असें वाटतें.

काय चिकित्सा व शल्यचिकित्सा.

**अग्निवेशादिकांच्या**, वर निर्दिष्ट केलेल्या, ज्या सहा संहिता प्रसिद्ध आहेत, त्या **कायचिकित्सेच्या** संबंधाच्या आहेत. **शल्यचिकित्सेच्यासंबंधानें औपधेनव, औरभ्र, पौष्कलावत**, आणि **सौश्रुत**, अशा चार संहिता प्रसिद्ध असून, त्यांत देखील श्रेष्ठतम अशी शेवटलीच होय. हें **शल्यशास्त्र सुश्रुताला दिवोदास** ह्मणून **काशीचा** राजा होता त्याजकडून प्राप्त झालें असून, हा राजा **धन्वतरी** देवतेचा अवतार असल्याविषयीं आख्यायिका आहे. शल्य चिकित्सेचाच एक भाग **शालाक्य** या नांवानें प्रसिद्ध असून, त्यांत मानेवरील भागांच्या रोगाची, ह्मणजे नेत्र रोगाची वगैरे चिकित्सा सांगितली आहे. ह्या भागाचेंही **सुश्रुतांत** इत्थंभूत वर्णन आहे. तथापि, ह्या भागाचा प्रवर्तक **दिवोदास** नसून **विदेह** देशाचा **निमि** नामक राजाच त्याचा आद्यगुरु आहे, असें मानितात.

चरकानें वैद्यकावर स्वतंत्र ग्रंथ लिहिलेला नसून फक्त अग्निवेश तंत्रांतच कांहीं फेरफार व कमी जास्ती करून, आणि जरूर ती भर घालून त्यानें चरकसंहिता तयार केली. चरकाचा काल पाणिनीच्या पूर्वीं निदान दोनशें वर्षें तरी असावा असें डाक्टर गर्दे[1] यांचें म्हणणें आहे. चरकानंतर बऱ्याच कालानें सुश्रुत झाला. ह्याच्या शारीरस्थानांत चरकापेक्षां जास्त माहिती असून, त्याची विषयविवेचनपद्धति देखील विशेष व्यवस्थेची दिसते. प्रसिद्ध वार्तिककार जो कात्यायन, यानें सुश्रुताचा उल्लेख केल्याचें आढळतें. त्यावरून त्याच्या पूर्वींचाही सुश्रुत असावा असें उघड होतें. डाक्तर गर्दे यांच्या समजुतीप्रमाणें सुश्रुत हा इ० स० पू० सुमारें ७०० वर्षें, म्हणजे बुद्धावतार होण्यापूर्वीं अजमासें एक दोन शतकें, झाला असावा असें दिसतें. (सार्थवाग्भट पान २९ प्रस्तावना पहा.)

चरक व त्याचा काल.

सुश्रुत व त्याचा काल.

---

१ डाक्तर गर्देकृत सार्थवाग्भट पहा. डाक्तर भांडारकर प्रभृति आधुनिक विद्वानांचें असें मत आहे कीं, पाणिनि हा इसवी सनापूर्वीं सुमारें ७०० सातशें वर्षें होऊन गेला असावा. पाश्चात्य व इतर पंडितांच्या मतें तो इ० स० पूर्वीं सुमारें ३५० वर्षें होऊन गेला. ( वाग्भट. पान १३।१४ प्रस्तावना. )

H. I. Literature. By Dr. Weber. P. 219.
(Goldstucker on Panini.)

ज्याला इंग्रजींत होमिओप्याथि ह्मणतात, तेंच आमचें रसवैद्यक होय. ह्याचीं मूलतत्वें चरकाला देखील चांगल्या प्रकारें माहीत होतीं, असें निर्विवाद सिद्ध होतें. कारण, त्यांचा उल्लेख चरक [illegible]तेंत केल्याचें दिसून येतें.

रसवैद्यक, व त्याचीं मूलतत्वें.

तथान्तः [illegible] [illegible]चारिणाम् ।
भवेत्[illegible] [illegible] क्रिया ॥
अन्तर्गतं पित्तधा[illegible] [illegible] ।
नयन्तो बहि[illegible] तथोष्मं [illegible] ॥
बाह्यश्च शीतैः [illegible] पीडितः ।
सोन्तर्गूढं कफं हन्ति [illegible] तथा जयेत् ॥
श्लेष्म[illegible] [illegible] दाहकृत् ।
त्वग्गत[illegible] [illegible]न्यथा गुरुः ॥
छर्दिघ्नी मक्षिकाविष्ठा मक्षि[illegible] [illegible] ।

( च. चि. अ. ३० )

ह्याचा भावार्थ इतकाच कीं, 'शरीराच्या आंतील भागांत किंवा सांध्यामध्यें, फार खोल संचार करणाऱ्या दोषांवर, नेहमींच्या पद्धतीविरुद्ध अशा क्रिया, केव्हां केव्हां अगदीं प्रशस्त दिसतात. उदाहरणार्थ, एखादा पित्तविकार अन्तर्भागांत झा[illegible] असतां तो भाग शेकून, अथवा तो सिञ्चन करून, किंवा त्याजवर पोटीस बांधून,

अथवा अशा प्रकारचे अन्य उष्ण उपाय करून, आंतील पित्त बाहेर निघून जातें; आणि तज्जन्य विकार बरा होतो. ह्मणजे उष्णानें उष्ण बरें होतें. तसेंच, एखाद्या खोल ठिकाणीं झालेला कफविकार थंड घड्या वगैरे ठेवून केवळ बाह्योपचारानें बरा होतो. ह्या क्रियेंत उष्मा थंडीच्या दाबानें आंत शिरून तो कफास मारितो. याप्रमाणें शीतानें शीत नाहीसें होतें. चन्दन बारीक उगाळून त्याचा दाट लेप अंगावर पसरल्यास, त्यानें देखाल त्वचेंतील उष्मा कोंडला जाऊन दाह होतो. त्या प्रमाणेंच, अगर उगाळून लाविल्यानें, तो स्वयमेव उष्ण असूनही शैत्य करतो. माशीची विष्टा उलटी बंद करिते. परंतु पाहूं गेलें असतां, तीच माशी वामक आहे. '

ह्यावरून इतकें खचित सिद्ध होतें कीं, रसवैद्यकांतील प्रायः सर्व औषधें व्याधीच्या गुणांशीं मिळतीं असून, तीं तद्विपरीत गुणाचीं नाहींत. ह्मणजे तत्वदृष्टीनें पाहूं गेलें असतां त्याचें मूलबीज असें दृष्टीस पडतें कीं, ज्या औषधांपासून जे विकार उत्पन्न होतात, त्यांनींच ते हटकून बरे होतात. मात्र, औषध अगदीं अल्प प्रमाणानें दिलें पाहिजे. कारण,

**मात्रया भक्षितं देवि विषमप्यमृतायते ।**
**मात्राधिक्कं वरारोहे ह्यमृतं वा विषंभवेत्॥**

( रसरत्नसमुच्चय अध्याय २९. )

रसवैद्यकाचा काल.

रसक्रियेंतील बहुतेक औषधें ह्याच नियमास अनुसरून असल्यामुळें, त्यांचें खरें तत्व, व त्या क्रियेंतील मूलबीज, हीं आमच्या हिंदूंस आज सुमारें अडीच हजार वर्षांपूर्वी उत्तम प्रकारें माहीत होतीं, याचें चांगलें दिग्दर्शन होतें. होमिओप्याथीचा प्रवर्तक हान्मन नांवाचा एक जर्मन् शोधक असल्याविषयीं युरोपखंडांत प्रसिद्धि आहे. परंतु याचा शोध देखील, आमच्या रसक्रियेवरच अवलंबून असल्याचें उघड दिसतें. कारण, एकंदर वैद्यकाचें ज्ञान यूरोपस्थांस आम्हां पासूनच आरबी लोकांच्या मार्फत प्राप्त झालें असून, ती गोष्ट इतिहासप्रसिद्धही आहे.

---

1. "These authors" (Charaka and Susruta) "were translated into Arabic, and probably soon after, that nation turned its attention to literature. The Arab writers openly acknowledge their obligations to the Medical writers of India, and place their knowledge on a level with that of the Greeks. It helps to fix the date of their becoming known to the Arabs, to find that two Hindus, named Manka and Saleh, were physicians to Hárun al Ràshid in the eighth century."

"Their acquaintance with medicines seems to have been very extensive. We are not surprised at

( पुढें चाल )

वागभट, व

**चरक** आणि **सुश्रुत** या भिषग्वरांनंतर, विशेष महत्वाचा असा **वाग्भट** होय. हा **पंजाब**च्या वायव्येकडील प्रांतांत राहणारा असून, त्याच्या बापाचें नांव **सिंहगुप्त** होतें. त्याचा आजा फार प्रसिद्ध वैद्य असून, त्याचें एकंदर घराणें पिढीजादाच वैद्यकांत प्रवीण होतें. **वाग्भटाचे अष्टांगसंग्रह** व **अष्टांगहृदय** असे दोन फार नामांकित ग्रंथ आहेत; आणि ते दोन्हीही **चरक** व **सुश्रुत** यांच्या आधारें रचलेले आहेत. हे ग्रंथ रचण्यांत, भिषग्वर **वाग्भट** याचा इतकाच हेतु होता कीं, वैद्यशास्त्रासंबंधी जी माहिती अनेक आर्षग्रंथांतून इतस्ततः अस्ताव्यस्त पसरलेली आहे

त्याचे ग्रंथ

ती सर्व एकत्र करून, पुरातन वैद्यकीय ज्ञान भाराभर ग्रंथ न वाचतां, अल्पायासानें व्हावें. सदरहू दोहों ग्रंथापैकीं, **अष्टांगहृदय** विशेष सन्माननीय आहे. कारण

---

( मागील पृष्टावरून पुढें चालू )

their knowledge of simples, in which they gave early lessons to Europe, and more recently taught us the benefit of smoking datura in asthma, and the use of cowitch against worms: their chymical skill is a fact more striking and more unexpected."

(Elphinstone's India P. 279-280).

(vide also an essay by Dr. Royle on the antiquity of Indian materia medica).

त्यांत पाल्हाळ मजकूर बिलकूल नसून, थोडक्यांत पुष्कळ माहितीचा कार्यभाग व्हावा, अशी पद्धतशीर व्यवस्था केली आहे.

अष्टांगहृदय ग्रंथाचीं एकंदर सहा स्थानें किंवा भाग आहेतः—१सूत्र; २शारीर; ३ निदान; ४चिकित्सा; ५कल्प; आणि ६उत्तरस्थान अष्टांग ह्मणजे आयुर्वेद किंवा वैद्यशास्त्र होय. त्याचीं आठ अंगें आहेतः—१कायचिकित्सा, २बालरोगचिकित्सा, ३भूतचिकित्सा, ४ शालाक्य, ५ शल्यतंत्र, ६विषचिकित्सा, ७ रसायनतंत्र, आणि ८ वाजीकरण. ह्या सर्वांचा अष्टांग हृदयांत समावेश होत असून, सदरहू ग्रंथांतील पहिलें जें सूत्रस्थान त्यांत, १ सर्व शास्त्रार्थांची मूलतत्वें, २ आरोग्यशास्त्र, ३ औषधिविद्या, ४ द्रव्यरसांचें वर्गीकरण, व त्यांची पृथक् पृथक् विकारावर योजना, आणि ५ यंत्रशस्त्रादिकांची माहिती, वगैरे संक्षेपतः व व्यवस्थित रीतीनें दिली आहे. ह्या सूत्रस्थानाचे एकंदर तीस अध्याय आहेत.

अष्टांगहृदय

दुसरें जें शारीरस्थान त्यांत १ गर्भविवेचन, २ प्रसूतिसंकट, ३ त्याचा प्रतिकार, ४ प्रकृतिविचार, ५ मरण चिन्हें, आणि ६ रोगाविषयीं साध्यासाध्य विचार, या विषयांचें वर्णन असून, त्याचे एकंदर आठ अध्याय आहेत.

तिसरें जें निदानस्थान त्यांत रोगाचें सामान्य निदान,

किंवा कारण सांगितलें असून, त्याचे एकंदर सोळा अध्याय आहेत.

चौथें जें चिकित्सास्थान त्यांत निदानस्थानांतील एकंदर रोगांची चिकित्सा, विस्तारानें सांगितली आहे. ह्याचे बावीस अध्याय आहेत.

पांचवें जें कल्पस्थान त्यांत औषधांचे कल्प, त्यांचीं वजनें, मारे, आणि त्यांचें कषाय, इत्यादि गोष्टींचें विवेचन आहे. त्याचे सहा अध्याय आहेत.

सहावें व शेवटलें जें उत्तरस्थान, यांत १ अवशिष्ट रोगांची निदानें, २ शालाक्यतंत्र, ३ शल्यतंत्रसंबंधी रोग, ४ विषचिकित्सा, ५ रसायनतंत्र, आणि ६ वाजीकरण, या विषयांवर, विवेचन असून, त्याचे एकंदर चाळीस अध्याय आहेत.

ह्यावरून, वाचकांच्या इतकें सहज लक्षांत येईल कीं, हिंदु वैद्यकांत देहचिकित्सेच्या संबंधानें सर्व कांहीं सांगितलें असून, त्यांत त्याविषयीं इत्थंभूत वर्णन आहे.

हिंदु वैद्यकाची पर्याप्ति.

औषधिविद्येंत नानाप्रकारचीं खनिज, वनस्पतिज, आणि प्राणिज भेषजें सांगितलीं असून, त्यांत औषधें तयार करण्याविषयीं अनेक तऱ्हेच्या चतुर उपायांचें सविस्तर विवेचन केलें आहे. तसेंच रोगनिदान, व तत्संबंधीं पथ्यापथ्य विचार, आणि रोग चिन्ह व तत्संबंधीं साध्यासाध्य विचार, याविषयींही साद्यन्त वर्णन आहे.

**शल्यशास्त्रांत** देखील हिंदूंचें नैपुण्य विशेष दिसून येतें. उदर, कुक्षि, गर्भकोश, वगैरे ठिकाणीं जरूर त्या प्रसंगीं ते शस्त्रक्रियेचें अवलंबन करीत असत. मूत्राश्माचा छेद करण्यासाठीं ते शस्त्रक्रिया चालवीत; आणि अंत्रवृद्धि, अर्श, व भगंदर, हे रोग ते बरे करीत. संधिभंग झाला असल्यास, तो सांधा ते मोठ्या दक्षतेनें बसवीत. वातशूळ, नासिकाकरण, गर्भविमोचन, वगैरे जोखमीचीं कामें ते फारच विलक्षण धैर्यानें व प्रकृतिनैपुण्यानें करीत. **सर्प-**

हिंदूंचीं वैद्यकीय शस्त्रं.

**फण, शरपुंखमुख, गर्भशंकु, तालयंत्र, शंकु, कंकमुख, स्वस्तिकयंत्र, मंडलाग्र, अर्धचंद्रमुखशलाका, सूचि, एषणी, मुचुंडीयंत्र, सनिग्रहसन्दंशयंत्र, अर्शोयंत्र** ( रोगपाहण्याचें ), **योनिव्रणेक्षण, वृद्धिपत्र, शरारिमुख, वेतसपत्र, आटिमुख, त्रिकूर्दक, कुठारी, अध्यर्धधार, उत्पलपत्र, व्रीहीमुख, अंगुलीशस्त्र, बडीश** ( गळ ). वगैरे[१] **शस्त्रास्त्रांवरून**, सुमारें दोन हजार वर्षांपूर्वी आमचें **आर्यवैद्यक** किती परिपक्वतेस आलें होतें, याचे अनुमान सहजींच होण्यासारिखें आहे.

**वाग्भटाचा** काल इसवी शकाच्या तिसऱ्या शतकांत

---

१ डा० गर्देकृत सार्थवाग्भट.

हिंदुशल्यशास्त्रांत एकंदर १२७ हत्यारांचें वर्णन केलें आहे; आणि छेदन, भेदन, लेखन, व्याधन, एष्यम्, अहर्य, विश्रवण, सेवन, इत्यादि शस्त्रक्रियेचे भेद सांगितले आहेत.

वाग्भटाचा काल, व तदनंतरचे वैद्यका-वरील ग्रंथकार.

असावा असें अनुमान आहे. वाग्भटानंतर वृंदमाधव, वैद्यरहस्य, चिकित्सासार, भैषज्यरत्नावली, शार्ङ्गधर, भावप्रकाश, तोडरानंद, निघंट, माधवनिदान, वातव्याधिचिकित्सा, वगैरे ग्रंथांचे प्रवर्तक होऊन गेले. ह्यांपैकीं, महत्वाचा आणि जुना ग्रंथ ह्मटला म्हणजे सहाव्या शतकांतील **धन्वंतरीकृत निघंट** होय. ह्यांत पहिल्यानें द्रव्याचे सर्व पर्यायशब्द सांगितले असून, नंतर त्याचे गुणदोष वर्णन केले आहेत. तदनंतर सुमारें सातशें वर्षांनीं, ह्मणजे इसवी सनाच्या चौदाव्या शतकांत, "**वीरसिंहावलोक**" नामक ग्रंथ **तोमर** वंशांतील **वीरसिंह** नांवाच्या **ग्वाल्हेरच्या** राजानें केला. हा राजा इ० सन १३७९ च्या सुमारास राज्य करीत होता. त्यानंतर इसवी सनाच्या सतराव्या शतकांत, ह्मणजे अजमासें दोनशें वर्षांमागें, **वैद्यविलास** नामक ग्रंथ **चौल** येथील **रघुनाथ** पंडितानीं केला होता. याप्रमाणें, आमच्या **आर्यवैद्यकाचें** इतिवृत्त, अति पुरातन काळापासून तों तहत सतराव्या शतकापर्यंत, थोडक्यांत वाचकांपुढें सादर केलें आहे.

**होरेस् विलसन्** हा एके ठिकाणीं असें लिहितो कीं, 'हिंदूंस **वैद्यक**, आणि **शस्त्रक्रिया**, हीं उत्तम प्रकारचीं माहीत होतीं.'

---

1 ** In medicine, as well as in astronomy

( पुढें चालू )

हिंदूवैद्यकापासून इतर राष्ट्रांस प्राप्ति.

हिंदू वैद्यकावरून पाहतां, ते या शास्त्रांत कोणाचेही ऋणी नाहींत, असें निर्विवादपणें सिद्ध होतें. कारण, ज्योतिर्ग्रंथाप्रमाणें यांत यवनादिकांचा कोणत्याही प्रकारें, व केव्हांही, बिलकुल उल्लेख केला नाहीं. इतकेंच नाहीं तर, पाश्चिमात्य राष्ट्रांत हिंदू वैद्यकाबद्दल मोठी ख्याति व प्रौढी असून, लाटीन भाषेंत हिंदू वैद्यकावरून जीं जीं भाषांतरें झालेलीं आहेत, त्या सर्वांत चरकाचें नांव वारंवार दृष्टीस पडतें. आमचें आर्यवैद्यक शिकण्याची लालसा प्रथमतः आरबी लोकांनीं प्रदर्शित केली. त्यानंतर त्यांनीं चरक व सुश्रुत या प्रसिद्ध आणि सर्वमान्य भिषजांच्या ग्रंथांचें आरबी भाषेंत भाषांतर करविलें. आणि तेव्हांपासून आर्यवैद्यशास्त्राचा

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू )

and metaphysics, the Hindus once kept pace with the most enlightened nations of the world; and that they attained as thorough a proficiency in medicine and surgery as any people whose acquisitions are recorded, and as indeed was practicable, before anatomy was made known to us by the discoveries of modern inquirers. That surgery (as well as other departments of medical science) was once extensively cultivated and highly esteemed by the Hindus."

Vol. II. (Dádá Bhái Nawroji's Speeches).

अभ्यास करण्याचा त्यांनीं सतत प्रयत्न चालविला. पुढें आरबी लोकांपासून युरोपस्थांनीं ही भिषग्विद्या संपादन केली; आणि इबनूसिना, अल्‌रासी, इबनसिराबी, वगैरे आरबी ग्रंथांचें लाटीन भाषेंत भाषांतर करून, त्यांस त्यांनीं आविसेना. ऱ्हेजस्, आणि सिराबिअन, वगैरे लाटीन नांवें दिलीं. याप्रमाणें आह्मां आर्यांपासून आरब लोकांनीं, आणि आरबांपासून युरोपस्थांनीं, या वैद्यकाचें ज्ञान, परंपरेनें संपादिलें असून, हा पौरस्त्यांकडील ज्ञान निर्झर पाश्चिमात्यांस थेट सतराव्या शतकापर्यंत सतत प्राप्त होत होता, यांत बिलकूल शंका नाहीं. चरक व सुश्रुत यांचें आरबी भाषेंत भाषांतर इसवी शकाच्या आठव्या शतकापूर्वी झालें असून, संस्कृतांतील वैद्यक ग्रंथांचें भाषांतर बगदादच्या कालिफांनीं इ० सन ७५०-९६० सालीं केल्याचें दिसतें.

हिंदुवैद्यकाची चढती व उतरती कला.

हिंदू वैद्यकाची चढती कला इसवी शकापूर्वी २५० वर्षांपासून तों इसवी शकाच्या ७५० वर्षांपर्यंत होती. त्यानंतर त्याला उतरती कळा लागली असून, त्याचें पूनरुज्जीवन अजूनपर्यंत झालें नाहीं. तथापि, दिवसानुदिवस त्याचें पुनरुज्जीवन करण्याकडे, बंगाल, मुंबइ, आणि मद्रास इलाख्यांतील विद्वज्जनांचें लक्ष्य चांगलें

लागत चाललें आहे. ह्यावरून, आमच्या **आर्यवैद्यका**-च्या उपयुक्ततेबद्दल साशंक होण्याचें बिलकूल कारणच राहिलें नाहीं. पुरातन वैद्यकाच्या परीक्षणार्थ जी कसोटी लावावयाची, ती तत्कालानुरूपच लाविली पाहिजे. त्या मन्वंतरांतील लोकस्थिति, विद्याप्रसार, आणि शास्त्रान्वेषण, इत्यादि गोष्टींकडे लक्ष दिलें ह्मणजे, त्यावेळच्या वैद्यक-प्रवर्तक ऋषींचे अश्रांत परिश्रम, दीर्घ उद्योग, अलौकिक मानसोत्साह, कुशाग्रबुद्धि, विचारपरिशीलन, आणि हस्तकौशल्य, इत्यादि गुणांचें फारच आश्चर्य वाटून, त्यांचेच वंशज आह्मी असतां, आमच्यांत त्या गुणांचा लेश मात्र देखील कां राहिला नाहीं, व आह्मी इतक्या हीन दशेप्रत कां पोहोंचलों आहों, यबद्दल अतीव विस्मय होतो. पूर्वी **शस्त्रक्रिया** ही प्राचीन वैद्यकाचें एक महत्वाचें अंग होतें. परंतु तीच हल्लींच्या आमच्या वैद्यकांत अगदीं नष्ट झाली आहे. मुतखडा काढणें, मोतिबिंदु खालीं दडपणें, ग्रंथि कांपणें, जलोदर वेधणें, गर्भविमोचन करणें, नाक बसविणें, वगैरे अनेक शस्त्रक्रिया, आमचे पूर्वज फारच चलाखीनें व कुशलतेनें करीत. पशुचिकित्सेंत देखील त्यांचें पाऊल बरेंच पुढें सरसावलेलें असून, त्यावर **शालिहोत्राचा** प्रसिद्ध ग्रंथही आहे. आमचें **शल्यशास्त्र व औषधिविद्या**, हीं दोन्ही आमच्याकडूनच **पाश्चि**-

मात्यांस प्राप्त झाली असून, ती गोष्ट ते कबूलही करितात.

वैद्यकांत, हिंदूंची क्षणोक्षणीं इतरांस मदत.

पाश्चात्यांच्या सहवासामुळें, ज्याप्रमाणें आपणांस हल्लीं हरएक बाबतींत त्यांचेंच साहाय्य घेण्याची संवय झाली आहे, त्याचप्रमाणें प्राचीनकाळीं, पाश्चात्य आणि पौरस्त्य वगैरे यच्चावत् राष्ट्रें प्रत्येक गोष्टींत ब्राह्मणांची

---

1 "The medical science of the Bràhmans was also an independent development. The national astronomy and the national medicine of India alike derived their first impulses from the exigencies of national worship. Observations of the heavenly bodies were required to fix the dates of the recurring festivals; anatomical knowledge took its origin in the dissection of the victim at the sacrifice, with a view to dedicating the different parts to the proper gods."

"Unlike the astronomical treatises of the Bráhmans, the Hindu medical works never refer to the Yavanas, or Greeks: as authorities; and, with one doubtful exception, they contain no names which point to a foreign origin. The chief seat of the science was at Benares, far to the east of Greek influence in India. Indeed, Indian Pharmacy employed the weights and measures of Provinces still farther to the south-east, namely, Magadha and

( पुढें चालू )

मदत मागत असत. इसवी सनाच्या आठव्या शतकांत **बगदाद्**चा प्रसिद्ध **कालिफ हरूण अल्‌रशीद** यानें आपल्या खानगी तैनातींत, खुद्द स्वतःसाठीं **हिंदुस्थानांतले** दोन नामांकित **ब्राह्मण** वैद्यच ठेविले होते. ह्यांस तिकडे **मणका** व **साले** असें म्हणत. याच्याही अगोदर सुमारें सातशें वर्षें, म्हणजे इसवी सनाच्या पहिल्या शतकांत **डिआस्कोरायडीज़नें** वैद्यकावर म्हणून जो ग्रंथ लिहिला, त्यांत बहुतेक **आर्यौषधोपचारच** सांगितले आहेत. **थिओ-**

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू )

Kalinga. Arabic medicine was founded on the translations from the Sanskrit treatises, made by Command of the Kaliphs of Bagdád, 750-960 A.D. European medicine, down to the 17th century, was based upon the Arabic; and the name of the Indian physician Charaka repeatedly occurs in the Latin translations of Avicenna (Ibn Sina), Rhazes (Al Rasi), and Sarapion (Ibn serabi)."

"Indian medicine dealt with the whole area of the science." * * *

"The surgery of the ancient Indian physicians appears to have been bold and skilful. They conducted amputations; * * * practised lithotamy; performed operations in the abdomen and uterus; cured hernia, fistula, piles; set broken bones and

( पुढें चालू )

**फ्रेजस्** हा इ० स० पूर्वी तिसऱ्या शतकांत होऊन गेला असून, त्याच्या लेखावरून देखील त्यानें **हिंदु** वैद्यकाचा पुष्कळच उपयोग केला असल्याचें दिसतें. ह्याच्याही पूर्वी सुमारें शंभर वर्षे, ह्मणजे इ० स० पूर्वी चौथ्या शतकांत खुद्द **शिकंदर** बादशहानें देखील आपल्या-पदरीं दोन **ब्राह्मण** वैद्यच ठेविले होते. आणि तेही मुख्यत्वेंकरून अशा हेतूनें कीं, **ग्रीक** वैद्यांच्या हातून

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू )

dislocations ; and were dexterous in the extraction of foreign substances from the body. A special branch of surgery was devoted to rhinoplasty, or operations for improving deformed ears and noses, and forming new bones ; a useful operation, * * and one which European surgeons have borrowed."

"The ancient Indian surgeons also mention a cure for neuralgia. * * * They were expert in midwifery, not shrinking from the most critical operations, and in the diseases of women and children. They devoted great care to the making of surgical instruments, and to the training of students by means of operations performed on wax * *, or on the tissues of the vegitable kingdom, and upon dead animals. * * * Considerable advances were also made in veterinary science, and monographs exist on the diseases of horses and elephants"

(Indian empire P. P. 106-108).

जे रोग बरे होत ना, त्यांचें त्यांनीं उपशमन[1] करावें. सर्प[2]-दंशाचा व्याधि आमचे आर्यवैद्य तेव्हांच बरो करीत. परंतु **ग्रीक** लोकांस तें साधत नसे. कारण, त्यांस तत्संबंधीं औषधीच माहीत नव्हती. त्याचप्रमाणें कित्येक आधि-व्याधींच्या कारणांनीं, जेव्हां जेव्हां **ग्रीक** लोकांस अस्वस्थता वाटे, तेव्हां तेव्हां ते तदुपशमनार्थ **ब्राम्हणां**कडेसच जात[3].

आर्यवैद्यक, व त्याचा इतर राष्ट्रांवर अनुग्रह.

तात्पर्य इतकेंच कीं, अखिल जगांतील **वैद्यकाची** **मूळ खाण**, अथवा **आदिनिर्झर**, केवळ हिंदूंचें[4] होत; व त्यांच्यापासूनच यच्चावत् इतर राष्ट्रांस ज्ञानप्राप्ति. आणि असेंच जर आहे तर, आमचें **ऋण** प्रत्येक

1 Romesh Chander Dutt's Ancient India. P. 736.

2 "The Grecian physicians found no remedy against the bite of snakes, but the Indians cured those who happened to incur that misfortune." (Nearchus).

3 The Greeks "when indisposed, applied to their Sophists (Brâhmans) who, by wonderful, and even more than human means, cured whatever would admit of cure." (Arrian).

4 "It is to the Hindus, we owe the first system of medicine." (Review of the History of medicine, 1867. vide also the commentary on the ancient Hindu system of medicine. 1845. By Dr. Wise, of the Bengal medical service).

राष्ट्रानें प्रांजलबुद्धीनें कबूल करणें अगदीं यथान्याय आहे. परंतु दुराग्रह व अहंभाव, हा कांहीं कांहीं पाश्चात्यांत जणूं काय खिळूनच गेला असल्यामुळें, आम्हां भारतीयांचें ऋण कबूल करण्याची त्यांजला लाज वाटते; आणि ह्मणूनच प्रत्येक शास्त्राचा किंवा कलेचा उत्पादकपणा ग्रीस अथवा रोमच्या डोसक्यांवरच लादण्याचा ते सतत प्रयत्न करितात. परंतु त्यांचें ते सर्व प्रयत्न अंतीं निष्फळच होतात. इतकेंच नाहीं तर, जास्त

---

1 "In Europe the antiquity of Hindu medicine is not yet generally known and recognized, and the habit of tracing the origin of all Aryan culture to the Greeks, still impedes an impartial inquiry." (Dutt's Ancient India. P. P. 727-728).

"Facts regarding the ancient history of medicine have been sought for, only in the classical authors of Greece and Rome ; and have been arranged to suit a traditional theory which repudiated all systems which did not proceed from a Grecian source. We are familiar from our youth with classical history and love to recall events illustrated by the torch of genius and depicted on our memories; and it requires a thorough examination of a subject, a careful weighing of new evidence, and a degree of ingeniousness not always to be found, to alter early impressions. Still candour and truth require us to examine the value of new facts in history as

( पुढें चालू. )

शोधानें सर्व शास्त्रकलापांचा, व कलासमूहांचा उत्पादकपणा, हिंदूंच्या कडेसच येतो. आणि ज्या हिपोक्रेटीज्‌ला युरोपस्थ हे वैद्यशास्त्राचा उत्पादक ह्मणून समजत, त्यानें सुद्धां आमच्या हिंदुवैद्यकाचें चांगलें अध्ययन केलें असल्याचें, त्याच्याच ग्रंथावरून चांगलें शाबीद होतें.

---

( मागील पृष्टावरून पुढें चालू )

they are discovered, so as to arrive at just conclusions."

(Review of the History of medicine. By Dr. Wise.)

1 Dr. Royle's Essay on "The antiquity of Hindu medicine." 1837.



# भाग २४ वा.

## नीतिशास्त्र.

संस्कृतांतील नीतिग्रंथ.

आमच्या भारतीयांस बहुत उपदेशप्रद, आणि अखिल जगास विशेष बोधावह, असे अत्युपयुक्त नीतिग्रंथ देखील संस्कृतांत आहेत. आतां, हे ग्रंथ जरी स्वतंत्र आहेत तरी त्यांचीं मूलतत्त्वें पाहूं गेलें असतां, तीं वेद, रामायण, व महाभारत, यांत दिसून येतात. त्यावरून नीतिशास्त्राचें पौराणत्व वाचकांच्या ध्यानांत सहज येईल; सदहू दोहों महाकाव्यांपैकीं महाभारत ह्मटलें ह्मणजे, नानाविध दिव्यरत्नांचा एक महोदधीच असून, त्यांत महत्वाच्या अशा बहुतेक सर्व विषयांचें विवेचन केल्याचें दिसून येतें. धर्मशास्त्र व नीतिशास्त्र; राजधर्म व क्षात्रियधर्म; ज्ञानकांड व कर्मकांड; उपासनामार्ग व भक्तिमार्ग; धर्मसंस्था व लोकसंस्था; तसेंच वाग्विलास, सभापांडित्य, इतिहास, भूगोल, आणि इतर उपयुक्त विषय, या सर्वांचा थोडा बहुत विचार त्यांत केला आहे.

कामन्दकीय नीतिशास्त्र म्हणून नीतिशास्त्रावर एक स्व-

कामन्दकीय नीतिशास्त्र.

तंत्रच ग्रंथ असून, त्याचे एकोणीस अध्याय आहेत. ह्याच नांवाचा व अशाच प्रकारचा दुसरा ग्रंथ, हिंदूंनीं जाव्हास देशान्तर केलें त्यावेळीं, त्यांनीं आपल्या बरोबर इ० स० च्या चौथ्या शतकांत नेला असल्याविषयीं, राजेन्द्र लालमित्र यांचें ह्मणणें आहे. त्यावरून पाहतां, कामन्दकीय नीतिशास्त्र हें चौथ्या शकापूर्वीं निदान एक दोन शतकें तरी रचलें असावें, असें वाटतें.

पंचतंत्र, हितोपदेश, व दुसरीं नीतिकाव्यें.

ह्याशिवाय पांचव्या शतकांत, विष्णुशर्मा ब्राह्मणानें रचलेलें पंचतंत्र; सातव्या शतकांतील भर्तृहरिकृत नीतिशतक व वैराग्यशतक; अकराव्या शतकांतील भोजदेवकृत सरस्वतिकंठाभरण; हालकृत सप्तशतक; गोवर्धनकृत सप्तशति ( १२ वें शतक; यावरूनच प्रसिद्ध अर्वाचीन हिंदु कवि विहारिलाल यानें सत्तसई नामक काव्य रचलें आहे ). श्रीहर्षदासकृत सदुक्तिकर्णामृत ( शके ११२७. इ० स० १२०५; यांत ४४६ कवींच्या कृतींतून पृथक् पृथक् अवतरणें घेतलेलीं आहेत ); शार्ङ्धरपध्दति ( १४ वें शतक. यांत ६००० वेंचे, सुमारें २६४ कवि व ग्रंथकार यांच्या ग्रंथांतून, घेतले आहेत ); चौदाव्या शतकांतील नारायणकृत हितोपदेश; वगैरे अनेक नीतिबोधक ग्रंथ आहेत.

ह्या सर्वांत, **पंचतंत्र** व **हितोपदेश** हीं अग्रेसर होत.

भारतीयांचा कथा-मृतनिर्झर.

**नीतिमार्ग** प्रदर्शक यासंबंधानें, हे दोन्ही ग्रंथ इतके उत्कृष्ठ साधले आहेत कीं, **प्राच्य** व **प्राश्चात्य** देशांत त्यांचीं भाषांतरें बहुतेक सर्व भाषांत तयार होऊन प्रसिद्ध झालीं आहेत. आणि हा आमच्या **भारतीयांचा कथामृतनिर्झर प्राची** दिशेकडून **प्रतीची** दिशेकडे सतत वाहत, जाऊन तो अखिल **प्राश्चात्यांची** नीतिजीवनकला उदयास आणण्यास, व ती प्रफुल्लित करण्यास, कारणीभूत झाला.

पंचतंत्राचीं भाषांतरें.

पल्हवींत,

**पंचतंत्राचें** भाषांतर प्रथमतः इसवी शकाच्या सहाव्या शतकांत, **इराणचा** शहा **अनुशीवार्ण** याच्या **बुझरजुह्मेर** नामक प्रसिद्ध **वजीरानें पल्हवी** भाषेंत केलें. ह्या **शाहानें**, व त्याच्या मागून जेवढे राजे गादीवर बसले तितक्यांनीं, हें पुस्तक एक अमूल्य **रत्न** समजून, आपल्या संग्रहीं ठेविलें. इतकेंच नाहीं तर, त्याची बहुत जोपासना करून तत्कथित नीतिदीप प्रकाशानें त्यानें आपलें राजकीय, सामाजिक, धार्मिक, आणि स्वकीय वर्तन, सुसंस्कृत केलें. पुढें कांहीं कालानें, **कालीफ अबूजाफरनिकी** यानें अतिपरिश्रमानें त्याची एक प्रत **पल्हवी** भाषेंतच मिळवून,

तत्कालीन प्रसिद्ध विद्वान् **इमानहुसेनअबदुल मोकाफ** याजकडून तिचें **अरबी**भाषेंत भाषांतर करविलें. तदनंतर **हिजरा** शकाच्या

अरबींत,

**३८०** सालीं, ह्मणजे इसवी सनाच्या दहाव्या शतकांत, **सुलतान महमद गिझनी** यानें तें पद्यात्मक रचिलें. व पुढें सदरहू शकाच्या ५१५ व्या वर्षी, **बेहरामशाहाच्या** हुकुमानें त्याचेंच **आरबी** भाषेंतून **इराणींत** भाषांतर झालें असून, तेंच

इराणींत,

हल्लीं "**कालिलदमन**" ( **पंचतंत्रांतील पिंगल** नामक मृगाधिपाचे मंत्रिद्वय १ **करटक** आणि २ **दमनक** ) या नांवानें सुप्रसिद्ध असलेलें उपलब्ध आहे.

**अरबी** भाषेंत झालेल्या भाषांतरांत पद्यात्मक रचना विशेष असून, त्यांत अप्रसिद्ध, आणि व्यवहारातीत, अशा शब्दांचा फारच उपयोग केला असल्यामुळें, तें अति दुर्बोध झालें होतें. सबब, **मुलनाअल्ली हुसेन** यानें तें आधुनिक भाषेंत रचून, त्याला **अन्वर सोहेली** हें नांव दिलें. पुढें इसवी सन १००२ सालीं, **जलालउद्दीन महमद आकबर** यानें, तें सर्व लोकांस सुगम होऊन समजेल अशा भाषेंत तयार करण्याविषयीं, आपला विद्वान वजीर **अबुल फाजिल** यास सांगून, त्याजकडून तें तयार करविलें; आणि त्यास **आयरदनीश** अथवा **ज्ञानोदधि** असें नांव दिलें.

इसवी सन १७०९ सालीं, सदरीं लिहिलेल्या 'कलिल दमन' नामक पारसीक पाठभेदाचे
फ्रेंच भाषेंत, फ्रेंच भाषेंत भाषांतर होऊन, त्याला "भारतीय ज्ञाननिष्ठ पिल्पेकृत नीतिकथामृत सागर" अशा आशयाचें त्याच भाषेंत नामधेय
इंग्रजींत, मिळालें. व त्याचेंच पुढें इंग्रजींत भाषांतर होऊन, तद्रसास्वादकुतूहल हें पाश्चिमात्यांत अति तीव्र आणि प्रखर झाल्यामुळें, इ० स० १७७५ सालीं, त्याच्या एकावर एक अशा पांच आवृत्ति काढाव्या लागल्या.

अमरसोहिलीचें टर्की भाषेंत इ० स० १५४० सालीं भाषांतर झालें असून, तें तयार हो-
व तुर्कीत. ण्याच्या कामीं भाषांतर करणार अल्लीबेनसाले, याला वीस वर्षे सतत परिश्रम करावे लागले असें सांगतात. ह्याचेंच भाषांतर इ० स० १७७८ सालीं, एमकारडॉन् नामक फ्रेंच विद्वानानें फ्रेंच भाषेंत करून, त्याला "बिडपेकृत भारतीय नीतिसार" अशा अर्थाचें नांव दिलें.

याप्रमाणें, जगद्विख्यात भारतीय पंचतंत्राचा संक्षिप्त इतिहास असून, त्या अनुपम नीतिसागरापासूनच पाश्चात्य ज्ञानोदकांत नीतिसिंचन होऊन, त्याचीं फळें सर्वत्र दिसूं लागलीं.

प्राचीचें पाश्चात्यांस ऋण.

आतां ही गोष्ट पाश्चिमात्यांस देखील कबूल करणें भाग पडतें. प्रोफेसर मोक्षमुलर ह्मणतात कीं:—

"Even the study of fables owes its new life to India, from whence the various migrations of fables have been traced at various times and through channels from East to West. Buddhism is now known to be the principal source of our legends and parables."

(What can India teach us ? P. 9)

प्रोफेसर वेबर लिहितात कीं:—

"Of the Ethico-Didactic Poetry–the so-called Nitishàstràs—but little has survived in a complete form (some pieces also in the Tibetan Tandjur), no doubt because the great epic, the Máhá Bhàrata, in consequence of the character of universality which was gradually stamped upon it, is itself to be regarded as such a Nitishàstra. Still, relics enough of the aphoristic ethical poetry have been preserved to enable us to judge that it was a very favourite form, and achieved very excellent results. Closely allied to it, is the literature of the 'Beast Fable', which has a very special interest for us, as it forms a substantial link of connection with the West. We have already pointed out that the oldest animal-

fables known to us at present occur in the Chhándogyopanishad. Nor are these at all limited there to the representation of the gods as assuming the forms of animals, and in this shape associating with men, of which we have even earlier illustrations, but animals are themselves introduced as the speakers and actors. In Pànini's time, complete cycles of fables may possibly have already existed, but this is by no means certain as yet. The oldest fables, out of India, are those of Babrius, for some of which at least the Indian original may be pointed out. But the most ancient book of fables extant is the Pancha Tantra." * * * *

"Allied to the fables are the Fairy Tales and Romances, in which the luxuriant fancy of the Hindus has in the most wonderful degree put forth all its peculiar grace and charm. These too share with the fables the characteristic form of setting just referred to, and thereby, as well as by numerous points of detail, they are sufficiently marked out as the original source of most of the Arabian, Persian, and Western fairy tales and stories."

(History of Indian Literature.
P. P. 210/ 211. 212. 213.)

ऋक्संहितेंत सूर्याला गृध्र किंवा श्येन, यांची उपमा दिल्याचें आदळतें. तसेंच छान्दोग्योपनिषदांत देवादि-

प्राच्य कथांचें पौराणत्व.

कांनीं पशुरूपाचा अंगिकार करून मनुष्यांबरोबर आहारविहार केल्याचें दिसून येतें. इंद्रानें मर्कट, कपिंजल, मेष, इत्यादिकांचें रूप धारण केल्याचें, आणि मानवीसुखासाठीं व तद्रक्षणार्थ ईश्वरानें देखील मत्स्य, कूर्म, वराह, नृसिंहादि अवतार घेतल्याचें सर्वांस महशूर आहेच. यावरून आमच्या कल्पित कथांचें एतिहासिक पौराणत्व कोणाच्याही ध्यानांत आल्यावांचून राहणार नाहीं.

प्राच्य कथापर्यटन.

आतां, हें कथापर्यटन प्राची दिशेकडून प्रतीची दिशेकडे कसें झालें, आणि त्याचें स्थलांतर, स्थित्यंतर, व देशांतर, हें कोणत्या मार्गानें झालें, याविषयीं दोन शब्द लिहिणें अगदीं अगत्याचें आहे. वर सांगितल्याप्रमाणें या कथानिर्झराचा उगम प्रथमतः भरतखंडांत झाला. हें भरतखंड, ज्याला हल्लीं हिंदुस्थान म्हणतात तें, प्राचीन कालीं चौदाविद्यां आणि चौसष्टकलांचें केवळ माहेरघरच होतें. तेव्हां उघडच, येथील शास्त्रकलांचा रसास्वाद घेण्याचा उपक्रम इराणच्या शहानें केल्यामुळें, पंचतंत्राचें भाषांतर प्रथमतः अरबी भाषेंत सहाव्या शतकांत होऊन, हा कथौघ क्रमाक्रमानें अफ-

---

१ भाग २० वा पृष्ट २१३ पहा.

आशियाखंडांत.

गाणिस्थान, इराण, अरबस्थान, सीरिया, पालेस्टाइन, आणि लघु आशिया किंवा आशियामायनर, येथें पसरला. या ठिकाणीं अनेक विद्वानांनीं अनेक भाषांत त्याचें भाषांतर करून, यथामति देशसेवा करण्यासाठीं बहुत परिश्रम घेतले; व यश संपादिलें. ख्रिस्ती धर्मशास्त्र जें बायबल त्यांत देखील हस्तिदंत, कपि, चंदन, केकी ( मयूर ), वगैरे संस्कृत शब्दांचे अपभ्रंश दृष्टीस पडतात. त्यावरून हे पदार्थ हिंदुस्थानांतून सीरिया, पालेस्टाइन, व आशियामायनर इकडे, इराणचें आखात, तांबडा समुद्र, व भूमध्यसमुद्र, यांतून निर्गत होत असल्याचें ठरत असून, सदरहू देशांमध्यें इकडील ज्ञानाचा मोबदला होण्यास हाच दळणवळणाचा मार्ग खुला होता, असें आतां निर्विवाद सिद्ध होत आहे.

यूरोपखंडांत, आणि

याप्रमाणें पंचतंत्रांतील नीतिवैभवाची कीर्ति थेट आशियामायनर आणि भूमध्यसमुद्रापर्यंत जाऊन थडकल्यामुळें, यूरोपांतील तुर्क लोकांचें कुतूहल तदामोदसेवनाविषयीं जागृत होऊन, त्यांनीं आपली जिज्ञासा तृप्त करण्यासाठीं, अमरसोहिलीचें भाषांतर

1 Lectures on the science of Language. Vol.1 P. 231.

अमेरिकेंत.

तुर्की भाषेंत, इसवी सन १५४० साली करविलें. तदनंतर सर्व यूरोपखंडांत त्याचा प्रसारहोत जाऊन, बहुतेक सर्व भाषांत त्याचीं तेथें भाषांतरें झालीं; आणि तिकडूनच त्याचा पातालांत ( अमेरिकेंत ) ही फैलाव झाला.

ग्रीक गंथाविषयीं मिथ्या व निर्मूलक कल्पना.

कांहीं पाश्चात्य पंडित ( वेबर प्रभृति ), प्राच्य कथानकांत ईसाबनीतीचा ग्रीक गंथ असल्याविषयीं कल्पना करितात. परंतु ही त्यांची कल्पना केवळ निराधार आहे. इतकेंच नाहीं तर, ईसाबे नांवाचा कोणी ग्रीक होता किंवा नाहीं, यावि-

---

1 * * * "And as the very existence of Æsop, whom the Arabs believe to have been an Abyssinian, appears rather doubt-ful, I am not disinclined to suppose that the first moral fables which appeared in Europe were of Indian or Ethiopian origin."

(Sir William Jones. Asiatic antiquities, 1786.)

"An important part of the Hindu Literature, however, still remains to be noticed, in their tales and fables; in both of which species of composition they appear to have been the instructors of all the rest of mankind. The most ancient known fables (those of Bidpài) have been found almost all chang-

( पुढें चालू )

षयींच विद्वज्जनांत अलीकडे अनेक कारणांनीं संशय

( मागील पृष्ठावरून पुढें चालू )

ed in their Sanskrit dress; and to them almost all the fabulous relations of other countries have been clearly traced. The complicated scheme of story-telling, tale within tale, like the "Arabian Nights," seems also to be of their invention, as are the subjects of many well-known tales and romances both Oriental and European."

(Elphinstone's History of India P. 302.)

"And the Sanskrit Beast-stories now occupy an even more significant place in the History of Indo-European literature than they did then. Many fables of animals familiar to the Western world, from the time of Æsop downwards had their original home in India. The relation between the fox and the lion in the Greek versions has no reality in nature. It was based, however, upon the actual relation between the lion and his follower the jackal, in the Sanskrit stories. Weber thinks that complete cycles of Indian fables may have existed in the time of Panini (B. C. 350)" * * *

"The most ancient animal fables of India are at the present day the nursery stories of England and America. The graceful Hindu imagination delighted also in fairly tales; and the Sanskrit compositions of this class are the original source of many of the fairy tales of Persia, Arabia, and Christendom."

(Dr. Hunter's Indian Empire P. P. 127-128).

उत्पन्न होऊन, मतभेद झाला आहे. सर विल्यम जोन्स सारखे महाविद्वान व अतिशोधक गृहस्थ देखील तत्संबंधी आपली आशंका प्रदर्शित करितात.

असो. पंचतंत्राविषयीं पाश्चात्यांचे अभिप्राय या खालीं थोडक्यांत देतों, त्यावरून त्याचें महत्व आणि सर्वमान्यता, हीं वाचकांच्या सहज लक्षांत येतील.

"The following translation, * * * is a faithful portrait of a beautiful work, which * * * is the Sanskrit original of those celebrated fables which after passing through most of the oriental languages, ancient and modern, with various alterations to accommodate them to the taste and genius of those for whose benifit or amusement they were designed, and under different appellations, at length were introduced to the knowledge of the European world with a title importing them to have been originally written by Pilpay or Bidpài, an ancient Brahman."

(Wilkins.)

"Their (the Hindoos) Nitisástra, or system of ethics, is yet preserved, and the fables of Vishnuserma, whom we ridiculously call Pilpay, are the most beautiful, if not the most ancient, collection of Apologues in the world."

(Sir William Jone's discourse 1786, on the antiquities, arts, sciences and Literature of Asia).

"The ancient Brahmins of India, after a great deal of time and labour, compiled a treatise (which they called Kurtuk and Dannak) in which were inserted the choicest treasures of wisdom, and the perfectest rules for governing a people."

(Fraser. Catalogue of Oriental manuscript.)

पंचतंत्रांतील नीतितत्वांची कीर्ति.

आतां, ज्या **पंचतंत्राची** धवलकीर्ति अखिल जगांत पसरली; ज्याचा परिमल सर्वत्र सुटला; ज्याचा आमोद ह्या भूतलावरील सुधारलेल्या सर्व राष्ट्रांनीं घेतला; ज्यांतील अमृतपान सर्व लोकांनीं केलें; आणि ज्यांतील उत्कृष्ठ मकरंद सर्वांनीं चाखला; त्या **पंचतंत्राच्या** मूलइतिहासाविषयीं दोन शब्द लिहून हा भाग पुरा करितों. **दक्षिण** देशांत **महिलारोप्य** नामक नगरीं, इ० स० च्या सुमारें पांचव्या शतकांत, **अमरशक्ति** नांवाचा राजा राज्य करीत होता. त्याला **वसुशक्ति, उग्रशक्ति,** आणि **अनेकशक्ति,** असे तीन पुत्र असून, ते तिन्ही अगदीं मतिमंद, व केवळ पशुतुल्य होते; त्यामुळें तो फार दिलगीर होऊन, त्याचें मोठें राज्यही त्याला शून्यवत् भासूं लागलें. पुढें, ह्या पुत्रांची अशी मुढावस्था त्या राजाला दुःसह झाल्याकारणानें, ते हरएक प्रयत्नानें व कोणत्या तरी उपायांनीं शहाणे व्हावे, एतदर्थ, त्यानें एके दिवशीं आपल्या दरबारांतील सर्व मंत्री मंडळास

पाचारण केलें. राजाज्ञेप्रमाणें सर्व सचिववर्ग एकत्र झाल्यावर, आपले पुत्र शास्त्रविमुख आणि विवेकशून्य असल्याविषयीं, राजानें त्यांस कळवून, त्यांच्या बुद्धीवर जेणेंकरून प्रकाश पडेल, असा उपाय योजण्याविषयीं आज्ञा केली. तदनंतर त्या ठिकाणीं जमलेल्या पांचशें पंडितगणांत उभे राहून एकानें असें प्रत्युत्तर केलें कीं, हे राजा, ज्ञानार्जन आणि विद्याव्यासंग हीं फार कठिण आहेत. कारण कीं, फक्त व्याकरणाचेंच अध्ययन करण्यास बारा वर्षे लागतात. त्यानंतर मन्वादि ऋषींचीं धर्मशास्त्रें, चाणाक्यासारख्या राजकार्य धुरंधरांचीं अर्थशास्त्रें, आणि वात्स्यायनादींचीं कामशास्त्रें, यांचें सम्यक् अध्ययन करावें लागतें; आणि हीं सर्व यथासांग झालीं ह्मणजे धर्मार्थ कामशास्त्रांत निपुणता घेऊन, मनुष्यास व्यवहारज्ञान प्राप्त होतें.

हें सर्व ऐकून घेऊन, दुसऱ्या एका बुद्धिमान् पंडितानें असें सुचविलें कीं, अशा प्रकारच्या शिक्षणक्रमानें राजाचा हेतु सिद्धीस न जाऊन, त्याच्या पुत्रांचा देखील कार्यभाग होणार नाहीं. कारण,

अनंत पारं किलशब्दशास्त्रम्
स्वल्पं तथायुर्बहवश्चविघ्नाः ।
सारं ततो ग्राह्य मपास्य फल्गु
हंसैर्यथा क्षीरमिवांबु मध्यात् ॥

सबब, या ज्ञानोदधीच्या अनंतत्वांत आपल्या अल्पशा

आयुष्याचें क्षेम, असंख्य विघ्न राशींचें निवारण करूनही, येनकेन प्रकारेण अवश्य करून घेतलें पाहिजे. याकरितां, ह्या राजपुत्रांच्या अत्युद्धार उपदेशार्थ व नीतिशिक्षणासाठीं, **विष्णुशर्मा** नामक विद्वान् पंडिताची योजना झाल्यानेंच, थोडक्या काळांत ह्या राजपुत्रांची सर्व विषयांत प्रवीणता होईल. तें ऐकून राजानें विष्णुशर्म्यास बोलावून आणून आपल्या पुत्रांस त्याच्या स्वाधीन केलें. तदनंतर त्या विद्वान् पंडितानें **पंचतंत्र** या नांवाचा ग्रंथ रचून, त्या राजपुत्रांस नीतिशास्त्रांत फार निपुण केलें. आणि तेव्हांपासूनच ह्या **पंचतंत्रां**ची प्रसिद्धि उत्तरोत्तर वाढत जाऊन, तो अप्रतीम ग्रंथ, **प्राच्य** व **पाश्चात्य** राष्ट्रांत, सर्वमान्य झाला.

हिंदुधर्मांतील नीतिशास्त्राचीं मूलतत्वें.

असो. याप्रमाणें नीतिशास्त्रांतील मूलतत्वें **हिंदुग्रंथांत**, व **हिंदुधर्मांत**, सर्वत्र पसरलीं असून, तीं **वेदां**पासून तो तहत **महाभारत** व **रामायणा**सारख्या महाकाव्यांत, **पुराणांत**, आणि **तंत्रांत**, ठायीं ठायीं मूर्तिमंत दिसतात. यामुळें, **हिंदुपिंडांत** तीं सर्व जशीं कांहीं खिळूनच गेलीं आहेत. त्या कारणानें,

त्यावर परधर्मी यांचे हल्ले.

**मुसलमान** लोकांच्या स्वाऱ्यांचा, आणि **परधर्मी** लोकांच्या जुलुमाचा, आह्मांवर एकसारखा कहर व गर्दी होऊन गेली अस-

तांही, तिचा यत्किंचित्‌ही, किंवा निदान ह्मणण्यासारखा तरी परिणाम आमच्या हिंदुधर्मावर किंवा नीतीवर घडला नाहीं. इतकेंच नाहीं तर, हिंदूनीं आपलें पूर्वींचें ब्रीद, आणि नीतिश्रेष्ठत्व, हीं आजमितीसही कायम राखिलीं आहेत.

व त्याचा परिणाम.



# भाग २५ वा.

## आर्यकला.

आमच्या सर्वमान्य आणि जगद्वंद्य आर्यांनीं ज्ञानामृताच्या विशाल उदधींत सर्वत्र सखोल शिरून, त्यांतील प्रत्येक ठिकाणचा सुंदर आस्वाद, व अवर्णनीय आमोद घेतल्याचें दिसतें. त्यामुळें, ते ज्ञानाच्या प्रत्येक शाखेंत प्रवीण असून, त्यांचें विशारदत्व, चौदाविद्या आणि चौसष्ट कलांत असल्याविषयीं सर्वांस महशूर, व इतिहासप्रसिद्ध आहे. ह्या चौदा विद्या, आणि चौसष्ट कला कोणत्या, या विषयींचें स्पष्टिकरण मागील विसाव्या भागांत प्रथमारंभीच केलें आहे. त्यावरून तत्संबंधीं सर्व तपशील ध्यानांत येण्यासारखा आहे.

आर्यकला.

आर्यकलांत धनुर्वेद, गांधर्ववेद, आणि अर्थशास्त्र, यांचा समावेश होतो. धनुर्वेदांत युद्धकला व तत्संबंधीं सर्व विवेचन आहे. गांधर्ववेदांत गायनकला, नृत्यकला, नाट्यकला व वाद्यकला, यांचा समावेश होतो. आणि अर्थशास्त्रांत

त्यांतील विषय.

इतर शिल्पकलांची अभिव्याप्ति होते. सबब या सर्वांचा आतां पृथक् पृथक् विचार करूं.

### धनुर्वेद.

धनुर्वेद, व तत्संबंधीं ग्रंथ.

**युद्धकलेचा शास्ता विश्वामित्र** असून, तद्विषयक संपूर्ण माहिती **प्रस्थानभेद** नामक ग्रंथांत आहे. हयगजश्रेणी कोणत्या उपायांनीं, कशी तयार राखावी, याविषयींचें विवेचन **भारद्वाज ( द्रोण ? )** याच्या ग्रंथांत आहे. **युद्धकलेच्या** संबंधाची बहुतेक माहिती **कामन्दकीय नीतिशास्त्रांत**ही विपुल असून, **राजा** आणि **क्षत्रिय** वर्गांची कर्तव्यकर्में, व तत्संबंधीं साद्यंत शिक्षण, हीं **महाभारतांत** विस्तारेंकरून सांगितलीं आहेत. तसेंच **अग्निपुराणांत**ही या विषयाच्या संबंधानें इत्थंभूत माहिती आहे.

युद्धकलेचें शास्त्रीय विवेचन.

**महाभारतादि** महाकाव्यांत, आणि इतर स्वतंत्र ग्रंथांत, **युद्धकलेच्या** संबंधानें जें शास्त्रीय विवेचन करण्यांत आलें आहे, त्यावरून असें वाटतें कीं, **युद्धकला** म्हणजे एक अति महत्वाचा शास्त्रीय विषयच आहे, असें त्यावेळचे लोक समजत असत. आणि त्या कारणानेंच त्यांत, याविषयींचें पद्धतशीर विवेचन, तपशीलवार वर्णन, आणि तत्संबंधीं अनेक शाखांतील अमूल्य वृत्तान्ताचा साद्यन्त उहापोह केल्याचें दिसतें.

# भाग २६वा.

## आर्यकला–संगीतशा॰

### गायनकला.

सजीव कोटींतील प्राणिवर्गावर[1] गायनाचा कसा परिणाम होतो, हें बहुतकरून प्रत्येक मनुष्याला ( मग तो सुशिक्षित असो अगर रानटी स्थितींतील असो यास ) माहित आहे.

गायनकला व तिचें मोहकत्व.

जर पशु, पक्षी, कीटक, इत्यादि, केवळ नादानेंच इ॰के लुब्ध होतात तर, मनुष्यमात्राला गायन किंवा संगीत ॰ेय असावें, यांत नवल तें काय? आणि म्हणूनच ॰याला तें प्रिय नाहीं, त्याची गणना भर्तृहरीनें[2] पशूंत ॰ली आहे. गायनानें मनुष्याच्या स्वभावावर निसर्गतःच ॰दात्त परिणाम होतो. अतएव, ज्याला संगीताची गोडी

1 "Music hath charms to sooth the savage reast. To soften rocks or bend a knotted oak.
(An English poet.)

२ साहित्य संगीत कला विहीनः ।
साक्षात् पशुः पुच्छविषाणहीनः ॥

नाहीं, त्याचें अंतःकरण, दुर्वासना, कुकल्पना, व अत्यंत नीच विचार, ह्यांनींच भरलेलें असलें पाहिजे, असें शेक्स[1]-पियरचें म्हणणें आहे.

दोलायां शायितो बालो रुदन्नास्ते यदा क्वचित् ।
तदा गीतामृतं पीत्वा हर्षोत्कर्षं प्रपद्यते ॥ १ ॥
क्रुद्धो विषं वमन्सर्पः फणामान्दोलयन्मुहुः ।
गानं जांगलिकाच्छ्रुत्वा हर्षोत्कर्षं प्रपद्यते ॥ २ ॥
मृगः सोऽपि तृणाहारो विचरन्नटवीं सदा ।
लुब्धकादपि संगीतं श्रुत्वा प्राणान्प्रयच्छति ॥ ३ ॥

( संगीत पारिजातः )

एखादें लहान मूल पाळण्यांत रडत असलें तर, गायनामृत पिऊन उगीच राहतें, व त्याला अत्यानंद होतो. क्रोधाग्नीनें फूत्कार करीत असलेला विषारी सर्प देखील, गारोड्याच्या पोंग्यानें नादलुब्ध होऊन, मोठ्या प्रेमानें आपली फणा डोलवितो. तसेंच केवळ चारा खाऊन आपली उपजीविका करणारा मृग सुद्धां, व्याधाचें संगीत ऐकून, आपल्या प्राणास अर्पण करितो.

**गायनं पंचमो वेदः**; म्हणजे गायन हा पांचवा वेदच

---

1 "The man that hath no music in himself,"
"Nor is not moved with concord of sweet sounds"
"Is fit for treason, stratagems, and spoils."

आर्यसंगीताचें प्राचीनत्व.

होय. आणि गायनाला **गांधर्ववेद** किंवा **गंधर्वविद्या** ह्मणण्याचा परिपाठही आहे. त्यावरून गायनकलेची महती वाचकांच्या सहजीं ध्यानांत येईल. ही गायनकला आपणांस **गंधर्वां**पासून मिळाल्याविषयीं आख्यायिका आहे.

गायनाची गोडी आमच्या **भरतखंडांत** [1]अनादि कालापासून आहे. वेदकालांतील आमचे पुराण ऋषि मोठ्या प्रेमानें ऋचा आणि मंत्र गाऊन, देवतांची स्तुति करीत. **“ अर्चिनो गायंति ”। “ गाथिनो गायंति ”। “ सामिनो गायंति ”** । इत्यादि पाठ, आणि नानाविधवाद्यांचे उल्लेख, **ऋग्वेदांत** आपल्या पाहण्यांत येतात;

1 "In this country music was studied and cultivated both as a science and an art, from the Vedic period up-wards of 3,000 years ago. The system of civilization established and developed by the Indian branch of the Aryans after they left their Caspian home, had in it its infancy, youth, prime of life, and old age. Music had at the Vedic time attained the dignity of a science just as other branches of human knowledge had". "There were specialists called Gandharwas, whose treatise on music was styled 'Gandharva Veda,' and the influence which it had in improving the tone of 'Sangita Sástra' was simply immense."

(Hindu music and the Gayana Samaja. Madras. 1887).

त्यावरून गायनाची **अभिरुचि** तितक्याही पुरातनकाळीं **भारतीयांस** असल्याचें सहजींच व्यक्त होतें.

**रामायण** कालांत **रावण** हा नृत्य, गायन, आणि वादन, यांच्या आनंद्रांत अगदीं निमग्न असे, असें **वाल्मीकिरामायणां**त[1] वर्णन आहे.

**कृष्णाच्या** मुरलीरवानें **गोपिका** किती तल्लीन होऊन जात असत, हें तर आमच्या **भारतीयांस** सुप्रसिद्धच आहे. त्या मुरलीचा सुस्वर इतका मोहक होता कीं, चतुष्पाद जनावरें देखील त्या योगानें लुब्ध होऊन तटस्थ रहात. त्यांच्या तोंडांतला घांस तोंडांतच राही. तीं दृष्टीनें निरखून पहात. आणि भूक, तहान, वगैरे सर्व विसरून, एकाग्र चित्तानें केवळ चित्राप्रमाणें तीं **वेणुध्वनिच** श्रवण करीत.[2]

---

१ नृत्यवादित्रकुशला राक्षसेंद्रभुजांकगा ।
काचिद्वीणां परिष्वज्य प्रसुप्ता संप्रकाशते ।। १ ।।
पटहं चारुसर्वांगी न्यस्य शेते शुभस्वनी ।
विपंचीं परिगृह्यान्या नियता नृत्यशालिनी ।। २ ।।
( वा. रा. सुन्दरकांड. )

२ वृंदशो व्रजवृषा मृगगावो वेणुवाद्यहृतचेतस एत्य ।
दंतदष्टकवला धृतकर्णा निद्रिता लिखितचित्रमिवासन् ।। १
बर्हिणस्तबक धातुपलाशैर्बद्धमल्लपरिबर्हविडंबः ।
कर्हिचित्सबलआलिसगोपैर्गास्समाह्वयति यत्र मुकुन्दः ।। २
तर्हि भग्नगतयः सरितो वै तत्पदांबुजरजोऽनिलनीतम् ।
आमृशन्पयासि वा बहुपुण्याः प्रेमवेपितभुजा हतवेगाः ।।३।।
( श्रीमद्भागवते दशमस्कंदे ).

याप्रमाणें वैदिक आणि पौराणिक कालांतील हकीकत असून, ऐतिहासिक कालांत देखील बहुतेक सर्व राजपुत्र व राजकन्या, श्रीमान लोक आणि सत्स्त्रिया, इत्यादि, गायन विद्येचा व्यासंग करीत, आणि तें ज्ञानाचें एक अवश्य अंगच आहे असें ते समजत असत. ह्याचें प्रत्यक्ष प्रमाण आपणांस संस्कृत काव्यांत आणि विशेषतः नाट-

हिंदुसंगीताचा पौराणिक, व ऐतिहासिक काल.

---

I "There is one remarkable circumstance concerning the grant before us which deserves notice. It was at the instance of a woman that king Soma made the grant. In the audience-hall where were assembled eminent and influential men of his and other kingdoms, and persons proficient in the art of music and dancing, and men of taste were gathered together, and instrumental music was going on, she sang a beautiful song in a most skilful manner, and obtained from the king who was very much pleased, as a reward, his consent to give the land in charity, and granted it herself on the occasion ; but afterwards got the king to do so more formally in the usual manner." * * * * *

" There is, therefore, no doubt that Savaldevi was a married queen of Soma ; and if so, we have evidence here that in the last quarter of the twelfth century of the Christion era, music and dancing formed a part of the education of kshatriya girls and that a married kshatriya woman could be present,

( पुढें चालू )

कांत चांगल्या प्रकारें दिसून येतें. चारुदत्तासारख्या दरिद्र्याच्या घरीं देखील, वीणादि वाद्यें असल्याचा मृच्छकटिकांत उल्लेख आहे. तसेंच मालविकेसारख्या उच्च कुळांतील राजकन्येला गायन व नर्तन शिकविण्यास, गणदासाची योजना झाली होती. आणि महाश्वेतेचा वीणा-ध्वनि तर चंद्रापीडाप्रमाणें, कादंबरीरसामृताचा घुटका घेणाऱ्या प्रत्येक सहृदय वाचकाच्या कर्णरन्ध्रांत दुमदुमत असेल. इसवी सनाच्या बाराव्या शतकांत, सोम राजाची राणी चवलदेवी हिनें चार संभावित, रसिक, आणि मर्मज्ञ गृहस्थ भर सभेंत जमले असतां, आपल्या प्रियपतीच्या सन्निध बसून, फार कुशलतेनें सर्वांच्या देखत सुरस व मधुर गान केलें. व तसें करणें त्याकाळीं अगदीं प्रशस्तही समजत असत. हल्लींच्या प्रमाणें गोषांतील पद्धत त्यावेळीं खचित नव्हती. मुसलमानांचा अम्मल भरतखंडांत सुरू झाल्यानंतरच हें त्याचें भलतेंच वळण आम्हांस नवीनच लागलें.

---

( मागील पृष्टावरून पुढें चालू )

at an assembly of eminent men, and sing before them without impropriety. The strict purdah system which the Maratha princes and chiefs observe at the present day, and which even the most highly educa, ted among them have not the courage to give up, did not exist in those days." (A paper read by Dr. Bhandarkar before the B. B. R. A. S. on the 30th July 1892).

हिंदु संगीताची चढती, व उतरती कला.

एकंदरांत भरतखंडवासी आर्यांची गायनप्रियता फारच उत्कट होती, असें अनेक प्रमाणांवरून सिद्ध होतें. पृथिवीवरील इतर सर्व राष्ट्रें अज्ञान सागरांत डरडरा घोरत होतीं, अशा वेळीं गायनकलेचें इकडे चांगलें लालनपालन होऊन, तिला बहुतेक पूर्णावस्थाच प्राप्त झाली होती. रसिकत्वाविषयीं आह्मां हिंदूंचीं पूर्वींपासूनच ख्याति आहे. आणि जावत्कालपर्यंत आह्मी स्वतंत्र, व उन्नतावस्थेचा पूर्ण उपभोग घेत होतों, तावत्कालपर्यंत ह्या गायनकलेचा उत्कर्षच होत चालला होता.

कोणत्याही सुधारलेल्या राष्ट्राचा इतिहास पाहिला, तर असें दिसून येतें कीं, हम्मेष मानसिक उन्नतीबरोबरच ह्या संगीत विद्येचा उत्कर्ष होतो, व तत्संबंधी अभिरुचि उत्तरोत्तर वाढत जाते; आणि देशाला विपन्नदशा येतांच तिचा तत्काल लोप होतो. त्याप्रमाणेंच आमच्या गायनकलेची अवस्था झाली आहे.

हिंदुस्वातंत्र्य व साम्राज्य असतां, आमची गायनविद्या पूर्ण विकासाप्रत पावली होती. परंतु इस्लामशाहीच्या धामधुमींत तिचा पूर्ण लोप होऊन, गायनाची इतकी कमी किंमत झाली कीं, गायनाचा व्यासंग करणें ह्मणजे केवळ हलकट धंदा स्वीकारणें होय, अशी लोकांची समजूत झाली. तथापि, सांप्रतच्या इंग्रजी साम्राज्यांत तिचा

जीर्णोद्धार होऊन, ती दिवसानुदिवस पुनश्च वाढीस लागली आहे.

गायनांत १ आर्चिक, २ गाथिक, ३ सामिक, आणि स्वरांतर, असे चार भेद असून, त्यांत स ( षड्ज ), रि ( ऋषभ ), ग ( गांधार ), म ( मध्यम ), प ( पंचम ), ध ( धैवत ), नि ( निषाद ), मिळून सप्तसुरांची योजना केली आहे. १ उदात्त, २ अनुदात्त, आणि ३ स्वरित, असे जे मुख्य तीन स्वर, त्यांच्या मिश्रणानेंच हे सप्तसूर बनले आहेत.

गायनाचे प्रकार, व सूर

सदरहू सप्तस्वर कोणत्या स्थानापासून कसे बनले आहेत, याविषयींचें वर्णन समयाकरांत[3] आहे.

---

१ आर्चिकं गाथिकं चैव सामिकं च स्वरांतरम् ।
एकांतरः ऋक्षु गाथासु द्व्यंतरः स्वरः ॥
सामसु त्र्यन्तरो विद्यादेतावत्स्वरतोन्तरम् । नारदी शिक्षा ॥

२ उदात्तांत ' नि ' आणि ' ग ' यांचा समावेश होतो.
अनुदात्तांत ' रि ' आणि ' ध ' यांचा समावेश होतो;
व स्वरितांत ' स ' ' म ' ' प ' यांचा समावेश होतो.

३ नासा कंठ उरस्तालुजिह्वा दंतांगनथैव च ।
षड्भिः संजायते यस्मात्तस्मा त्षडज इति स्मृतः ॥
नाभे स्समुदितो वायुः कण्ठशीर्षसमाहितः ।
ऋषभवन्नदेद्यस्मात्तस्मादृषभ ईरितः ॥
नाभे स्समुदितो वायुः कण्ठशीर्षसमाहतः ।

( पुढें चालू )

**संगीताचीं १ गीत, २ वाद्य, व ३ नृत्य, अशीं तीनें अंगें असून, एकंदर संगीतशास्त्राचे १ मार्गी आणि २ देशी असे दोने**

संगीताचीं अंगें.

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू )

गंधर्वसुखहेतुः स्याद्गांधारस्तेन कथ्यते ॥
वायुस्समुत्थितो नाभेर्हृदयेषु समाहतः ।
मध्यस्थानोद्भवत्वाच्च मध्यमस्तेन कीर्तितः ॥
वायुस्समुत्थितो नाभेरोष्टकंठशिरोहृदः ।
* * * पंचमस्तेन संमतः ॥
नाभेस्समुत्थितो वायुः कण्ठतालुशिरोहृदि ।
तत्तत्स्थाने धृतो यस्मात्ततोऽसौ धैवतो मतः ॥
नाभेस्समुत्थितो वायुः कण्ठतालुशिरोहतः ।
निषीदंति स्वराः सर्वे निषादस्तेन कथ्यते ॥
( समयाकर )

१ गीतं वाद्यं नर्तनं च त्रयं संगीतमुच्यते ।
( संगीतदर्पण )
गीतं वाद्यं तथा नृत्यं त्रयं संगीतमुच्यते ।
( संगीतरत्नाकरः )

२ मार्गदेशीयभेदेन द्वेधा संगीतमुच्यते ।
द्वेधा मार्गाख्यसंगीतं भरतायाब्रवीत्स्वयम् ॥
ब्रह्मणोऽधीत्य भरतः संगीतं मार्गसंज्ञितम् ।
अप्सरोभिश्च गंधर्वैः शंभोरग्रे प्रयुक्तवान् ॥ मतंगः ॥
अबलाबालगोपालैः क्षितिपालैर्निजेच्छया ।
गीयते याऽनुरागेण स्वदेशे देशिरुच्यते ॥ मतंगः ॥
देशे देशे जनानां च यत्स्याद्धृदयरंजकम् ।
गानं च वादनं नृत्यं हृद्देशीत्याभिधीयते ॥
( संगीतरत्नाकरः )

प्रकार आहेत. आर्यप्रणीत गायनाच्या प्रकाराला **मार्गी** ह्मणतात, व लोकांच्या भिन्न भिन्न अभिरुची प्रमाणें, मनोरंजन प्रीत्यर्थ, जी गायनपद्धति बनली, तिला देशी[1] ह्मणतात.

## वाद्यकला.

वादनकला.

हिंदूंच्या गायनकलेबरोबरच वादनकला परिपक्वतेस आली होती. एक ब्राह्मण गात असतां, दोन **ब्राह्मणांनीं** वीणा वाजवावा, असें श्रुतीच[2] सांगते. वीणावाद्य[3] हें रुद्र, **नारद**, इत्यादिकांस फार प्रिय होतें. विण्याशिवाय दुसरीं अनेक वाद्यें, व मृदंग, पखवाज, ढक्का, इत्यादिकांचाही वाद्यांत समावेश होतो.

## नाट्यकला.

**नृत्यकलेचे** १ **तांडव** आणि २ **लास्य** असे मुख्य दोन

---

१ निबद्धश्चानिबद्धश्च मार्गोऽयं द्विविधो मतः ।
आलापादिनिबद्धो यः स च मार्गः प्रकीर्तितः ।
आलापादिविहीनस्तु स च देशी प्रकीर्तितः ॥
( मतंगः )

२ ब्राह्मणौ वीणागाथिनौ गायतः
ब्राह्मणोऽन्यो गायेदिति श्रुतिः ।

३ श्रुत्या स्मृत्या दृष्टां रुद्रेष्टां नारदादिभिर्जुष्टाम् ।
कलयंत्वलयं वीणां संतः संतोषपोषार्थम् ॥
( रागविबोधः )

४ प्रयोगमुद्धतं स्मृत्वा स्वप्रयुक्तं ततो हरः ।
तंडुना स्वगणाग्रण्या भरताय व्यदीदृशत् ॥
( पढें चाल )

नाट्यकला.

प्रकार असून, त्याचे आणखी **नाट्यं**[1], **नृत्य**, व **नृत्त**, असे तीन भेद आहेत. **तांडव** हें मर्दानी, व **लास्य** हें जनानी **नृत्य** होय.

नाट्यांत नानाविधभाव, अनेक अभिनय, व कित्येक अंगविक्षेप असतात. त्यापैकीं, हिंदुनाट्यकलेच्या पूर्णतेचें दिग्दर्शन होण्याकरितां, येथें थोडे देतों:—

अंगप्रत्यंगोपांगः, अभिनयलक्षण, २९ असंयुतहस्तभेद, २४ संयुतहस्तभेद, ११ बांधव्यहस्तभेद, १६ देवहस्तभेद, ९ नवग्रहहस्तभेद, १० दशावतारहस्तभेद, ४ चतुर्वर्णहस्तभेद, हरिश्चंद्र व पुण्यराजहस्तभेद, वृक्षजातिहस्तभेद, सिंह आणि मृगहस्तभेद, गरुड व पक्षिहस्तभेद, सर्पहस्तभेद, भूराद्यधोलोकहस्तभेद, हस्तद्वादशप्राणभेद, शृंगारादिरसभेद, रसालंबनायिकानायकदूतिभेद, इत्यादि.

# ताल.

तालाची अवश्यकता हिंदुसंगीतांत विशेष मानली

---

( मागील पृष्टावरून पुढें चालू )

लास्यमाल्याग्रतः प्रीत्या पार्वत्या समदीदृशत् ।
बुद्ध्वा तु तांडवं तंडो मर्त्येभ्यो मुनयोऽवदन् ॥
पार्वत्यप्यनुशास्तिस्म लास्यं बाणसुतामुषाम् ।
( संगीतरत्नाकरः )

1 नाटयं नृत्यं तथा नृत्तं त्रिधा तादिति कीर्तितम् ।
नाट्यभेदं ददौ पूर्वं भरताय चतुर्मुखः ॥
( संगीतरत्नाकरः )

ताल. आहे. ताल[1] ह्मणजे काल, क्रिया, आणि मान, यांचें संमिलन होय. तालाचे काल, मार्ग, क्रिया, अंग, ग्रह, जाति, कला, लय, गति, आणि प्रस्तारक, असे दहा[2] प्राण आहेत.

असो. आमच्या **गायनकलेंतील** सुरांचा नामनिर्देश प्रथमतः **वेदांगांत**, ( ह्मणजे **छंद** आणि **शिक्षा** यांत ), व **अथर्ववेदांतील गर्भोपनिषदांत**, दिसून येतो. तसेंच सुरांचें दिग्दर्शन **पिंगलसूत्रांत** झाल्याचें दिसतें.

**स, रि, ग, म, प, ध, नि**, ह्मणून जे **हिंदूंचे** सुप्रसिद्ध सप्तसूर आहेत, तेच आमच्यापासून **पारसीकांनीं** म्हणजे **इराणी** लोकांनीं, व परंपरेनें त्यांजकडून **आरबांनीं** उचलले असून, त्यांचेंच अनुकरण क्रमशः, **यूरोपस्थांनीं** केलें, यांत बिलकुल शंका नाहीं. व ही गोष्ट **यूरोपस्थ**[3]ही कबूल करितात. ह्या सप्तसुरांची सुरवात **यूरो-**

---

१ कालः क्रिया च मानं च संभवंति यथा सह ।
तथा तालस्य संभूतिरिति ज्ञेयं विचक्षणैः ॥
कालः क्षणादिको ज्ञेयस्तालयोर्घटनं क्रिया ।
क्रिययोरंतरं यत्तु विश्रामो मान उच्यते ॥
( चामरसिंहः )

२ कालो मार्गाः क्रियांगानि ग्रहो जातिः कलालयौ ।
गतिः प्रस्तारकश्चेति तालप्राणा दश स्मृताः ॥
( संगीतदर्पणम् )

3 History of Indian Literature by Dr. Weber P. 272. note 315.

गायनकलेंत हिंदूंचें इतर राष्ट्रांनीं केलेलें अनुकरण.

**परखंडांत** प्रथमतः **गायडो. डी. आरेझो** यानें, इसवी शकाच्या अकराव्या शतकाच्या आरंभींच, केल्याचें कळून येतें. आमच्या सप्तसुरांस अनुसरूनच **इराणी** लोकांनीं आपले सूर बसविले असून ते **दा, री, मी, फा, सा, ला, बी,** असे आहेत. **संस्कृतांत** गायनस्वराच्या कलेचा वाचक जो **ग्राम** शब्द, तोच **यूरोपस्थांच्या** भाषांत '**ग्यामट्**', '**ग्यामा**', '**ग्यामी**', या अपभ्रंश झालेल्या रूपानें आपल्या दृष्टीस पडतो. आणि ह्या अपभ्रष्ट झालेल्या सर्व शब्दांचें मूलरूप म्हटलें म्हणजे '**ग्राम**' शब्दच होय, यांत संशय नाहीं.

गायनकलेंतील ग्रंथकार.

**गायन** विद्येवर ज्यांनीं ह्मणून थोडे बहूत परिश्रम करून विवेचन केलें आहे, असे ग्रंथकार थोडे असून **भरत, ईश्वर, पवन, कल्लिनाथ,** व **नारद,** वगैरे त्यांपैकींच होत. शार्ङ्गदेव कृत **संगीतरत्नाकरांत, अभिनवगुप्त, कीर्तिधर, कोहल,** आणि **सोमेश्वर,** इत्यादि ग्रंथकार, प्रमाणभूत ह्मणून **शार्ङ्गदेवानें** दाखल केले आहेत. ह्या **संगीतरत्नाकरांतील** विषय ह्मटला ह्मणजे केवळ गायनच नसून, तदंगभूत असें जें नृत्य, व नाट्य, याविषयींही त्यांत सविस्तर विवेचन आहे.

**संगीतविषयावर** जेवढे ह्मणून नामांकित व प्रमाण

ग्रंथकार होऊन गेले, त्यांची नांवनिशी **संगीत** ग्रंथांत दिली आहे, ती वाचकांच्या माहितीसाठीं, याखालीं देतोंः—

सदाशिवः शिवोब्रह्माभरतः कश्यपोमुनिः ।
मतंगः पार्ष्णिगोदुर्गाशक्तिः शार्दूलकोहलौ ॥
विशाखिलोदंतिलश्चकंबलोऽश्वतरस्तथा ।
वायुर्विश्वावसूरंभाऽर्जुनो नारदतुंबुरू ॥
आंजनेयो मातृगुप्तो वारुणो नन्दिकेश्वरः ।
स्वातिर्गणो देवराजः क्षेत्रराजश्चराहलः ॥
दुर्जयोनामभूपालो भोजो भूवल्लभस्तथा ।
परमंदीच सोमेशो जगदेकमहीपतिः ॥
व्याख्यातारो भारतीये लोल्लटे द्भटशंकुकाः ।
भट्टाभिनव गुप्तश्च श्रीमत्कीर्तिधरोपरः ॥
अन्येचबहवः पूर्वेये संगीतविशारदाः ।

( संगीतरत्नाकरः )

* * * हाहा हूहूश्चरावणः ।
रंभाबाणसुताचापा फाल्गुनः फाणिनांपति ॥

( संगीतपारिजातः )

याविषयावरील कांहीं कांहीं ग्रंथांचीं भाषांतरें **इराणी** भाषेंत झालीं असून, तीं ह्या भाषेंत होण्यापूर्वींही, त्यांचीं भाषांतरें **आरबी** भाषेंत झालीं होतीं.

**पाणिनीच्या** पूर्वीं, ह्मणजे इसवी शकापूर्वीं ७००

गायनकलेची अभिवृद्धी, व तिचा ऱ्हास.

सातशें वर्षें, किंबहुना त्याच्याही अगोदर, गायनकलेचा उत्कर्ष **हिंदुस्थानांत** होत चालला असून, गायनांकनपद्धति **ब्राह्मणांनीं** चांगल्या पूर्णतेस आणिली होती. व तीच पूर्वी निर्दिष्ट केल्याप्रमाणें, **ब्राह्मणां**-पासून परंपरेनें **युरोपस्थांस** प्राप्त होऊन, ती प्रथमतः **गायडो डी. आरेझोनें** त्या खडांत प्रचारांत आणिली. याप्रमाणें दिवसानुदिवस आमची गायनकला अभिवृद्धी-प्रत पावत असतां, तिला **मुसलमान** कारकीर्दींत इतर कलांप्रमाणेंच, उतरती कळा लागली. त्यामुळें **हिंदुगाय-कांची** संख्या उत्तरोत्तर कमीच होत गेली. ती इतकी कीं, **आकबर** बादशहाच्या पदरीं निवडक म्हणून जे उत्तम गायक ३६ छत्तीस होते, त्यांपैकीं फक्त पांचजणच काय ते **हिंदु** होते.

हिंदु राग.

**हिंदु** गायनांत **कल्याण**, **बिहाग**, **कानडा**, **मालकंस**, **बहिरव**, आणि **सारंग**, असे मुख्य सहा राग असून, **धनश्री**, **पूर्वी**, **केदार**, **छायानाट**, **सोनी**, **देस**, **परज**, **सोरट**, **कालिंगडा**, **भूप**, **बेहेरवी**, **बागेसरी**, **बिलावल**, **खमास**, वगैरे उपराग व रागिण्या आहेत. वाद्यांत वीणा, सतार, ताऊस सारंगी, सारमंडल, वीन, वगैरे तंतुवाद्यें; जलतरंगासारखीं जलवाद्यें; मृदंग, तबला, इत्यादि चर्म-

वाद्यें; आणि सनई व अलगुजा सारखीं काष्टवाद्यें; अशीं नानाप्रकारचीं आहेत.

गायनकलेची सांप्रतची स्थिति.

नामांकित गायक, व उत्तम बजवय्ये, असे सांप्रतच्या स्थितींत **हिंदुस्थानांत** फारच थोडे सांपडतील. कारण, हल्लींच्या काळांत **संस्थानिकां**शिवाय त्यांचा कोणीही पोषिंदा नसल्यामुळें, त्यांच्या धंद्यास बिलकुल उत्तेजनच राहिलें नाहीं. तथापि, कांहीं वर्षांनीं ह्या कलेचें पुनरुज्जीवन होईल, अशीं शुभ चिन्हें दिसूं लागलीं आहेत ठिकठिकाणीं **गायन**समाज, आणि **वादित्र** स्थलें, यांची योजना होत चालली आहे. **राजा सर सुरेंद्र मोहन टागोर** सारख्या देशाभिमानी हिंदूंनीं नानाविध ग्रंथ छापून, ह्या **गांधर्व**विद्येस जरूर तें उत्तेजन देण्याचें योजिलें आहे; व **पुण्यपत्तनां**तील **गायन**समाजही हल्लीं चांगल्या भरभराटीच्या स्थितींत असल्याचें दिसत आहे.

तत्संबंधीं पाश्चिमात्यांचें अज्ञान, व तज्जन्य अवहेलना.

आमचें गाणें, व बजावणें, **पाश्चिमात्यांस** बिलकुल मधूर लागत नाहीं. इतकेंच नाहीं तर, तें अगदींच बेसूर आहे ह्मणून ते लोक समजतात. आणि कांहीं काहीं तर त्याची केवल अवहेलनाच करतात. ह्याचें कारण त्यांचें तत्संबंधीं अज्ञान, व नासमजपणा होय; याशिवाय दुसरें

कांहीं एक नाहीं. ह्या संबंधानें डाक्टर हन्टरनीं दिलेला खालीं लिहिलेला अभिप्राय केवळ यथार्थ आहे:--

"No Englishman has yet brought an adequate acquaintance with the technique of Indian instrumentation to the study of Hindu music. The art still awaits investigation by some eminent Western professor; and the contempt with which Europeans in India record it, merely proves their ignorance of the system on which Hindu music is built up."

(Indian Empire P. P. 111-112.)



# भाग २७ वा.

---

## आर्यकला.

### अर्थशास्त्र.

अर्थशास्त्र, व त्यांतील विषय.

या शास्त्रांत चित्रकला, शिल्पकला, निर्माणविद्या, वास्तुविद्या, यंत्रकला, पटनिर्माणविद्या, पात्रनिर्माणकला, गंधद्रव्यक्रिया, पाकशास्त्र, द्यूतविद्या, आणि अक्षविद्या, इत्यादिकांचा समावेश होतो. सबब त्याविषयीं पृथक् पृथक् विवेचन करूं.

### चित्रशास्त्र.

चित्रकला, व तिचें प्राचीनत्व.

चित्रकलेविषयीं नाटकांत आणि काव्यांत, वारंवार उल्लेख केल्याचें दृष्टीस पडतें. आणि ह्या कलेंत प्राचीनकालापासून हिंदूंस इतकी प्रवीणता, व हातोटी साधलेली होती कीं, इच्छित मनुष्याचें हवें त्यावेळीं, व नियमित कालांत चित्र काढून, अगदीं हुबेहूब आकृति बनविण्यांत येत असे. ह्या विद्येचा व्यासंग राजेलोकही

मोठ्या उत्सुकतेनें करीत असत, असें प्राचीन ग्रंथांवरून उघड होतें. **कालिदासकृत शाकुंतल** नाटकांतील सहाव्या अंकांत **सानुमती** ह्मणते, "अहो एषा राजर्षेर्निपुणता। जाने सखी अग्रतो मेवर्तत इति"। **सानुमती** ही अप्सरा असून, ती गुप्तरूपें **दुष्यत राजाच्या** मागें आकाशांतच उभी होती. **शकुंतलेचें** तें अगदीं हुबेहूब राजानें काढलेलें चित्र पाहून, **सानुमतीस** मोठें नवल वाटून ती विस्मयानें ह्मणाली, "अगबाई! ह्या **दुष्यन्त राजर्षींची** चित्रकलेंत सुद्धां कायहो ही निपुणता! माझी सखी (**शकुन्तला**) ही जणूं काय माझ्यासमोर उभीच आहे, असें मला वाटतें." ह्यावरून त्याकाळीं, चित्रकला ही चांगल्या पूर्णतेप्रत पावल्याचें दिसत असून, राजे लोकही तिचा आदरपूर्वक आभ्यास करीत असत, असें सिद्ध होतें.

हिंदुचित्रकलेंतील उणीव.

तथापि **हिंदुचित्रकलेंत**, उन्मीलन चातुर्य आणि प्रभासौन्दर्य, यांची उणीवच दृष्टीस पडत असून, समुद्र, पर्वत, नद्या, वनें, उपवनें, आणि विहारस्थानें, इत्यादिकांचे रमणीय देखावे हुबेहूब वठविण्यांत हिंदूंचें नैपुण्य कमीच दिसतें. तसेंच, वर्षाऋतूंतील कृष्णवर्ण मेघांचें अमित ऐश्वर्य, व तत्कालीन निर्झरोदकाची अनुपमश्री, आणि अतिवृष्टीच्या योगानें प्रळय काळच्या वेळेसारखा होणारा

भयंकर देखावा, इत्यादिकांचें सुंदर व मार्मिक आलेख्य, किंवा तद्विषयक हृदयद्रावक असें तूलिकापाटव, यांचाही अभावच भासमान होतो.

पाणिनी व अशोक, यांच्या वेळची चित्रकलेची स्थिति.

जगद्विख्यात चक्रवर्ती **अशोक राजा** आणि **नागार्जुन**, यांच्या कारकीर्दींत **चित्रकला** अगदीं भरभराटीच्या स्थितींत असून, त्याकालीं **यक्ष** व **नाग** नामक शिल्पी फार प्रसिद्ध होते. ह्मणजे इसवी शकापूर्वी २५९ वर्षांपासून तों इ० स० ४० वर्षांपर्यंत, ह्या विद्येचा चांगला ऊर्जित काल होता, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. तथापि यापूर्वी, **पाणिनी**च्या वेळीं ( इ० श० पूर्वी ७०० वर्षे ) देखील, ही विद्या पुष्कळ प्रचारांत होती, यांत बिलकुल शंका नाहीं. कारण, **देवतां**च्या प्रतिमा करून त्या हमखास विकण्याची त्यावेळेस चाल होती. व अशीं नानाविध चित्रें कागदांवर काढून, किंवा तीं छापून विकण्याची अजूनही इकडे चाल आहे. आह्मां **हिंदुलोकां**त बहुतकरून प्रत्येक गृहीं, अनेक तऱ्हेचीं चित्रें भिंतीवर काढण्याचा, आजमितीसही बहुतेक सर्वत्र रिवाज आहे. त्यांतील विषय

हिंदु गृहांतील चित्रनिर्मिति.

ह्मटले ह्मणजे देवतांच्या लीला, **पौराणीक** गोष्टी, **ऐतिहासिक** कथा, आणि **सांसारिक** व्यवहार, हे होत.

# भाग २८ वा.

## आर्यकला.

### शिल्पकला.

शिल्पकला, व त्यांतील विषय.

शिल्पकलेंत हिंदूंचें चातुर्य व त्यांची करामत, हीं चित्रकलेपेक्षां पुष्कळांशीं जास्त दिसून येतात. आमचे लोक मूर्तिपूजक असल्यामुळें, आराध्यदेवतेची सुंदर आणि मनोहर मूर्ति घडविण्यांत, ते फार परिश्रम व काळजी घेतात. त्याकारणानें मोठमोठ्या आणि प्रतिद्ध देवालयांत, शृंगार, हास्य, व करुणादि नानाविध रसांतच जणूंकाय ओतलेल्या अशा भव्य, विशाल, मनोरम, आणि सुरेख मूर्ति दृष्टीस पडतात. कांहीं कांहीं ठिकाणीं कृष्णावतारच्या सुरम्यलीला प्रदर्शित केल्या असल्यामुळें, शृंगाररस दृग्गोचर होतो. कित्येक जागीं अट्टहास दाखविला असल्यामुळें हास्यरस दृष्टीस पडतो. आणि कोठें कोठें तर महाभारतांतील रसाळ कथानकांचें हृदयद्रावक असें आविष्करण केलेलें असल्यामुळें, करुणा, रौद्र, वीर,

भयानक, बीभत्स, अद्भुत, शान्ति, वात्सल्य, व भक्ति, हे सर्व रस, भाव आणि अभिनय, इत्यादि योगानें केवळ मूर्तिमंतच भासतात. तथापि, कांहीं कांहीं ठिकाणीं, व क्वचित् प्रसंगीं, अवयवसंगति आणि अंगसौष्टव, यांच्याकडे कमीच लक्ष्य पुरविल्याचें दिसतें. आणि त्याकारणानें शरीरव्यवच्छेदाच्या ज्ञानाचा अभाव असल्याचें भासमान होतें.

याविषयावर नानाविध ग्रंथ, प्रबंध, व शिक्षाकल्प असून, त्यांत मूर्ति-निर्मितीविषयीं विवेचन आहे. **वराहमिहिरकृत बृहत्संहितेंतही** तत्संबंधीं बरेंच वर्णन असून, शिवाय कोठें कोठें क्वचित् आलिखनाक्रियाही त्यांत सांगितली आहे.

## निर्माणविद्या.

हिंदूंची निर्माण-विद्या.

**निर्माणविद्येंत** हिंदूंचें पाटव, शिल्पकलेपेक्षां फारच जास्त, आणि विस्मय वाटण्यासारखें, निःसंशय दिसून येतें. त्यांचा अश्रांत व दीर्घ परिश्रम–विलास, त्यांची उत्कट बुद्धिमत्ता, आणि त्यांचें अपार हस्तकौशल्य, ह्यांचें प्रत्यक्ष प्रमाण ह्मटलें ह्मणजे ह्या **भरतभूमी**तील ठिकठिकाणचीं विशाल, भव्य, आणि रमणीय **विवर–मंदिरें** होत. ह्या **विवरमंदिरांसच कोरींवलेणीं**, किंवा कोणी **पांडवकृत चमत्कृति** ह्मणतात. हीं पाहिलीं ह्मणजे **निर्माणविद्येचें** पूर्ण शास्त्रीयज्ञान, आमच्या **हिंदूंस** फार प्राचीनकाळापासूनच असल्याचें दिसून येतें. इ-

तर्केंच नाहीं तर, तें ज्ञान त्यांनीं जणू काय या प्रचंड **शिलोत्खातगृहांत**च सर्वत्र ओंतून, आपली कीर्ति **विद्यावृक्षा**च्या याही शाखेंत अजरामर राही, अशी तजवीज केल्याचें भासतें.

त्यांनीं खोदून निर्माण केलेलीं विवरमंदिरें, अथवा कोरींव लेणीं.

अशा या **विवर—मंदिरां**तील नानाप्रकारचे शोभायमान स्तंभ, त्यांच्या उपस्तंभाची उदारश्री, त्यांचे उच्चशीर्षभाग, त्यांतील ठिकठिकाणचें सूक्ष्म शिल्पपाटव, आणि एकंदरींत सर्वांचेंच विशालप्रमाण, हीं पाहून सकौतुकाश्चर्य वाटतें; आपल्या कल्पनेची शक्ति अगदींच कुंठित होते; आपली मति गुंग होऊन जाते; आपल्या मनाचा उद्वेग तत्काल नाहींसा होतो; आणि मानवी साहसाच्या अचाट सामर्थ्याची फारच धन्यता वाटूं लागते.

मद्रास इलाख्यांतील लेणीं.

हीं **विवरमंदिरें** किंवा **कोरिंवलेणीं**, **हिंदुस्थानां**तील राजकीय विभागाचे जे मुख्य तीन **इलाखे**, **बंगाल**, **मुंबई**, व **मद्रास**, या सर्वांत आहेत. **मद्रासच्या** दक्षिणेस **महाबलिपूरम्** ह्मणून जें प्रसिद्ध स्थान आहे, तेथें असलीं लेणीं पुष्कळ असून तीं फार प्राचीनकाळचीं आहेत, असें सांगतात. तथापि, **विल्सन्** प्रभृति पाश्चात्य पण्डितांची अशी समज आहे कीं, हीं इसवी शकानंतर

बाराव्या किंवा तेराव्या शतकांत झालीं असावीं. परंतु ह्या ह्मणण्यास बलवत्तर व निरुत्तर असा विशेष कांहींच आधार दिसून येत नाहीं.

मुंबई इलाख्यांतील लेणीं.

सर्वांत अद्भुत आणि भव्य शिल्पनिर्मिति ह्मटली ह्मणजे मुंबई इलाख्यांतील "वेरूळ" व "कान्हेरी" येथील कोरींव लेणीं होत. अखिल पृथिवीवरील प्राचीन आणि अर्वाचीन अशा यच्चयावत् मानुषीय चमत्कृतींत, हीं 'लेणीं,' केवळ अद्वितीय आहेत. इतकेंच नाहीं तर, तीं आजपर्यंत ज्यांनीं ज्यांनीं ह्मणून पाहिलीं, त्यांचीं मनें विस्मयानें अगदीं थक्क होऊन गेलीं. त्यांची कल्पना कुंठित झाली. आणि त्यांचें चांचल्य स्थिरतेप्रत पावलें.

यांची उच्च व शोभायमान विवरपटलें, त्यांचें उदार शिल्पलावण्य, भव्य आणि विशाल मंडप, स्थूलाकार शिलास्तंभ, व विलक्षण आणि रमणीय वीथिका, हीं खरोखर सर्वच अतीव प्रेक्षणीय आहेत. कोठें कोठें हे स्तंभ गोल व भाजनाकृति आहेत. कोठें चतुष्कोन शृंखलालंकृत दृष्टीस पडतात. कोठें ते अष्टपैलु आहेत. कोठें शिखावलंबि व मालावृत असे ते भासतात. क्वचित् क्वचित् मनुष्य व पशु, पुष्पें आणि फलें, वृक्षशाखा व लता, इत्यादिकांच्या नानाविध आणि कमनीय आकृतींनीं ते मण्डित असल्यामुळें, अतृप्त नेत्रकमलांचें जणू काय तें पारणेंच फेडतात. आणि कांहीं कांहीं ठिकाणीं

तर, ह्या सर्वांचें सुरम्य मिश्रण व मनोरम व्यतिकर झाल्यामुळें, तज्जन्य अनुपम श्री स्वस्थानापन्न होते. तात्पर्य, अशा प्रकारचें प्राचीन हस्तकौशल्य, व कलापाटव, ह्या जगांत अन्य ठिकाणीं क्वचित्च दृष्टीस पडतें.

कोरींव लेण्यांचीं मुख्य स्थलें.

**वेरूळ** हें **वेरूळ परगण्यांत, निजाम** सरकारच्या मुलुखांत आहे. हें **दौलताबादे**च्या उत्तरेस असून त्याला "**अद्भुत चमत्कृतीचा प्रदेश,**" अशी संज्ञा आहे. **कान्हेरी** हें स्थल कुर्ले व मुंबई यांच्या दरम्यान् **साष्टी** तालुक्यांत डोंगरावर आहे. याशिवाय **घारापुरी, माहाड, मांदाड** ( तालुके माणगांव ), **पांडवगड** ( तालुके **वाई** ), आणि **जुन्नर** वगैरे ठिकाणीं देखील कोरींव लेणीं आहेत; परंतु तीं लहान आहेत. तथापि, त्यांतही कांहीं कांहींचें खोदींव सभामण्डप इतके विशाळ आहेत कीं, त्यांत पांचशेंपासून हजारपर्यंत लोकसमूह मावूं शकेल. या मण्डपांत देखील तऱ्हेतऱ्हेचें व सुबक खोदींव काम सर्वत्र दृष्टीस पडतें. त्यामुळें ही निर्माणविद्या ह्मणजे जणूं काय आमच्या पूर्वजांच्या हाताचा मळच कीं काय, असें भासूं लागतें.

सदरहू नामांकित **कोरींव लेण्यांविषयीं**, एका **फ्रेंच** फिरस्त्याचें खालीं लिहिल्याप्रमाणें उद्गार असल्या-

त्यांविषयीं परकी- यांचें अभिप्राय.

बद्दल, डाक्टर बरजेस् यांच्या अवतरणावरून दिसून येतें. ते ह्मण- तात कीं:—

"All commentary grows pale" "before the magnificent ruins of the temples of Ellora, which more than any other ruins confuse the human imagination. Though it was in the seventh century before Christ that Gautama Budha had flourished, Budhism remained for about 400 years like a ship in the ocean of Brahminism, until the time of the great Ashok, the Buddhist Constantine. The work of cave-excavations seems to have begun after his time. The Brahmans out of religious rivalry followed next, and then the Jains. The caves of Ellora ran from south to north on the western side of a hill near Roza in the order of their antiquity. The Brahman caves though not equal to the Buddhist in point of originality and truthfulness of their design, were superior in point of extent and richness of decoration."

एडिन्बर्गोरिव्ह्यू नामक प्रसिद्ध पत्राचा एक पुराण लेखक या वेरूळास "the region of wonders" ह्मणजे "अद्‌भुत चमत्कृतीचा प्रदेश" असें ह्मणत असून, दुसरा एक प्रवाशी त्यांतील कोरींवलेण्यांच्या संबंधानें असें लिहितो कीं:—

No drawings, however elaborate and skilful, and no descriptions, however faithful and graphic, can create in the mind an impression at all equal to the effect produced by a glance on the spot at this chef d' aeuvre of antiquity.

या निर्मितींविषयीं प्रसिद्ध एल्फिन्स्टन् इतिहासकार यांचा अभिप्राय.

एल्फिन्स्टन् साहेब या प्राचीन निर्मितीविषयीं आपल्या हिंदुस्थानच्या इतिहासांत असें लिहितात कीं, अशा मासल्याचें सौंदर्य व सुबकपणा पृथिवीच्या पाठीवर अन्यत्र कोठेंही पहावयास सांपडणार नाहीं. भरतखंडांत प्रत्येक ठिकाणीं उत्कृष्ठ नक्षीचें कोरींव काम दृष्टीस पडत असून, त्यांतील शिल्पपाटव चांगल्या पूर्णतेस आल्याचें भासतें. तसेंच शिल्पशास्त्रांचीं मूलतत्वें फार प्राचीनकाळींही हिंदूस चांगलीं अवगत होतीं असें दिसतें. ते असें म्हणतात कीं:–

"These arabesques, the running patterns of plants and creepers in particular are often of an elegance scarcely equalled in any other part of the world."

" There are some beautiful specimens of Hindu architecture in Tod's Râjasthân.' The work of

---

* Observations of a tourist who contributed a leries of articles on the subject, to the columns of the "old Bombay Telegraph and courier," since colsected together in the form of a pamphlet (1856).

Ràm Ráz shows the details every where employed, as well as the general architecture of the south ; but the splendid works of Daniells exhibit in perfection every species of cave or temple in all the wide range of India." * * * *

"Though in temples of recent formation there is sometimes a mixture of the Mahometan style, yet the general character of these buildings is strikingly original, and unlike the structures of other nations. We may infer from this that the principles of the art were established in early times."

(Elphinstone's History of India.
P. P. 310. 311. 312).

अशा प्रकारचीं लेणीं घारापुरी, कान्हेरी, कारलें, महाड, मांदाड ( तालुके माणगांव), जुन्नर, वांई आणि वेरूळ, वगैरे ठिकाणीं असल्याबद्दल सदरीं लिहिलें असून, त्या सर्वांत वेरूळच्या लेण्यांची गणना उत्कृष्टांत असल्याकारणानें, तत्संबंधीं दोन शब्द येथें लिहितों.

देवगड नांवाचें फार नामांकित भरभराटीचें शहर पूर्वीं दक्षिणेंत होतें. ह्यालाच सांप्रतकाळीं दौलताबाद अशी संज्ञा आहे. ह्या शहराच्या नजीकच वेरूळ नांवाचें एक लहान खेडें असून, त्याच्या पूर्वेच्या बाजूस सुमारें अर्ध्या कोसावर, एक अर्धचंद्राकृति डोंगर आहे. ह्या डोंगराचा विस्तार दक्षिणोत्तर असून, त्याचीं दोहों बाजूचीं

टोंकें मध्यभागापेक्षां पुष्कळच उंच आहेत. उत्तर टोंकाच्या शेवटास जें लेणें आहे त्याला **पारसनाथसभा** असें नांव असून, दक्षिण टोंकाकडील लेण्यास **धेडवाडा** असें म्हणतात. हें ठिकाण फारच सुरेख आणि पाहण्यासारिखें आहे; परंतु तें विटाळाचें समजून हिंदू लोक तें पाहण्यास सहसा जात नाहींत. ह्या शिखरद्वयांच्या दरम्यानही ठिकठिकाणीं खालवर आणि पृथक् पृथक् लेणीं आहेत; व तीं बहुत करून खडक लागल्या ठिकाणीं खोदल्याचें दिसतें.

ह्या लेण्यांत **इंद्रसभा** व **कैलास** नांवाचीं लेणीं फारच नामांकित पैकीं आहेत. आणि त्यांतही **कैलास** हें सर्वोत्कृष्ठ होय.

'हें देऊळ भोंवतालून खडक फोडून, मध्येंच कोरून तयार केलें आहे. ह्याचा आंत जावयाचा जो थोरला दरवाजा आहे, तो फारच सुरेख व भव्य आहे. त्याच्या दोन्ही बाजूस बहुत नक्षी व कोरींव काम आहे. हा दरवाजा फार मोठा आहे, व त्याच्या दोन्हीकडे देवळ्या आहेत. दरवाज्यावर मोठें दालन आहे. ही **नगारखान्याची** जागा असावी असें वाटतें. ह्या **नगारखान्याचे** पुढले खांब फार शोभायमान आहेत. दरवाज्यांतून आंत जातांना दोहों बाजूंस बहुत कोरींव काम आहे. त्यामध्यें उजव्या बाजूस **अष्टभुजा भवानीचें** चित्र आहे. व डाव्या बाजूस **गणपतीचें** चित्र आहे. आंत गेलें म्हणजे मोठें विस्तीर्ण पटांगण

दिसतें. हें सर्व खडक वरून फोडीत आणून केलें आहे; व त्या पटांगणांत, मध्येंच खडक राखून, त्यांतूनच कांहींसें शंकाकृति असें मोठें देवालय कोरिलें आहे. ह्या देवळाची रचना व त्यावर जे तऱ्हेतऱ्हेचें बारीक व मनस्वी कोरींव आणि सुरेख काम आहे, त्यांचें कितीही वर्णन केलें तरी पुरें व्हावयाचें नाहीं. हें मुख्य देऊळ व दरवाज्यावरचा मजला हीं पुलानें जोडिलेलीं आहेत. हा पूल, इमारत खोदतांना मधलाच खडक राखून केला आहे. ह्या पुलाखालीं, दरवाज्याच्या समोरासमोर शेवटीं, कमळावर बसलेली भवानीची मूर्ति आहे, व तिच्या दोन्ही बाजूस दोन हत्ती आहेत. ह्यांनीं आपल्या सोंडा उचलून देवीच्यावर एकमेकींस लाविल्या आहेत. दरवाज्यांतून आंत जातांना दोन्ही बाजूस हत्ती आहेत. परंतु ते छिन्नभिन्न झाले आहेत. हत्तींच्या मागें दोन्ही बाजूंस दालनें आहेत, व त्यांमध्यें डाव्या बाजूचीं फारच सुरेख आहेत; त्यांत पुष्कळच कोरींव काम आहे. पटांगणांत दोन्ही बाजूंस दोन चौकोनी सुटे खांब आहेत. ह्या खांबांच्या शिखरांवर कोरींव काम असेल असें वाटतें; परंतु हल्लीं तीं शिखरें मोडून गेलीं आहेत. त्या शिखरावर एकेक सिंहाचें चित्र असेल, असें डाव्या हातच्या खांबाच्या शिखरावर जो कांहीं मोडका भाग राहिला आहे, त्यावरून अनुमान होतें.'

'थोरल्या दरवाज्यावरचा नगारखाना व मुख्य

देऊळ ह्यांच्यामध्यें पूल आहे, म्हणून सांगितलें; त्या पुलाच्या सुमारें मध्यभागीं **नंदीचें** चतुष्कोण देऊळ आहे. ह्या देवळाच्या दोन्ही बाजूंस दोन खिडक्या आहेत. व त्या खिडक्यांच्या समोरासमोर वर सांगितलेले दोन चौकोनी सुटे खांब आहेत. नंदीच्या देवळांतून निघून पुलावरून पुढें गेलें ह्मणजे मुख्य देवळाचें पुढलें उघडें दालन लागतें. तें पुलापेक्षां उंच आहे. हें दालन फारच सुरेख आहे. त्या दालनास दोन शानदार खांब आहेत, व त्या खांबावर पुढल्या बाजूस दोन सिंह आहेत; व आंतल्या अंगांत दुसरीं चित्रें आहेत. ह्या उघड्या दालनांतून मुख्य देवळाच्या मुख्य सभामंडपांत जावयाचा जो दरवाजा आहे तो फारच सुंदर आहे, व त्याच्या दोन्ही बाजूस मोठमोठीं चित्रें कोरलीं आहेत. ह्या उघड्या दालनांत खालच्या पटांगणांतून यावयास दोहों बाजूंस पायऱ्या आहेत. मुख्य देवळाचा चौथरा सुमारें एक मजला उंच आहे. त्याच्या दोहों बाजूस बाहेरच्या अंगावर एकीकडे **रामरावणांची** व एकीकडे **कौरवपांडवांची** अशा लढाया कोरल्या आहेत, व ह्या चित्रांच्या मध्यें हत्ती, सिंह, वाघ, वगैरे प्राण्यांचीं डोकीं कोरून त्यांवर मुख्य देऊळ आहे, असें दाखविलें आहे.'

'उघड्या दालनांतून सभामंडपांत जातां येतें. ह्या मंडपास दोहों बाजूंस खांबांच्या दोन दोन ओळी आहेत. सभा-

मंडपाचें मधलें दालन चौकोनी आहे. ह्या मंडपांत एकंदर सोळा खांब आहेत. ह्या मंडपाच्या शेवटच्या बाजूस गाभारा आहे. त्यांत **शिवाचें लिंग** आहे. गाभाऱ्याच्या दाराच्या दोहों बाजूंस पुष्कळ कोरींव सुरेख काम आहे. सभामंडपाच्या मध्यभागीं उभें राहिलें असतां दोहों बाजूंस दोन दारें लागतात. ह्यांच्या बाहेर दोन उघडीं दालनें आहेत. ह्या दालनाच्या ठिकाणीं देवळाचा चौथरा दोहों बाजूंस बराच पुढें गेला आहे. ह्या दालनांपैकीं उजव्या हाताकडलें दालन व त्याच्या समोरचा, ह्मणजे पटांगणांतला उजव्या हाताकडला सोपा, ह्यांच्यामध्यें पूर्वी पूल होता, तो सुमारें शंभर वर्षांपूर्वी पडला. तसेंच मुख्य गाभाऱ्याच्या तिन्ही बाजूंस मोकळा चौथरा आहे. त्या चौथऱ्यावर सभामंडपांत जाण्याकरितां मुख्य गाभाऱ्याच्या दोहों बाजूंस दोन दारें आहेत. ह्याप्रमाणें सभामंडपांत येण्यास पांच दारें लागतात. तसेंच ह्या उघड्या चौथऱ्यावर मुख्य गाभाऱ्याच्या दोहों बाजूंस दोन, व मागल्या बाजूंस तीन, अशीं पांच देवळें आहेत. त्यांवर नक्षीचें काम व कोरींव चित्रें बहुत आहेत, परंतु त्या देवळांत देवांच्या मूर्ति नाहींत.'

'पटांगणांत मुख्य देवळाच्या दोहों बाजूंस मोठमोठे सोपे आहेत. ही इमारत बहुतकरून दुमजली आहे. उत्तरेकडील सोप्याच्या दुसऱ्या मजल्यावर मोठें दालन

कोरलें आहे. ह्याचे खांब फार नक्षीचे व सुरेख आहेत, व दालनाच्या मध्यभागीं **ब्रह्मा, विष्णु,** आणि **महेश्वर,** ह्यांच्या मूर्ति शेजारीं शेजारीं आहेत. ह्याखेरीज तेथें दुसरीं पुष्कळ कोरींव चित्रें आहेत. व त्यांपैकीं कांहीं फारच उत्कृष्ठ आहेत. ह्या भागाच्या शेवटीं गाभाऱ्यांत **शिवाचें लिंग** आहे; व जिन्याचे वरच्या दाराजवळ **नंदी** आहे. दक्षिणेकडल्या बाजूस जो सोपा आहे, तो तिमजली आहे. ह्यांतही अनेक प्रकारचीं चित्रें आहेत. ह्या सोप्यांत मुख्य देवळाच्या सभामंडपांतून जावयास एक पूल राखिला होता, तो शंभर वर्षांपूर्वीं पडला, ह्मणून [illegible] [illegible] आहे. ह्या सोप्यांत हल्लीं शिडी लाविल्यावांचून जातां येत नाहीं. **औरंगजेब बादशहानें** व दुसऱ्या मुसलमान **राजांनीं** ह्या देवळाची बहुत खराबी केली, व पुष्कळ मूर्ति छिन्नभिन्न करून टाकिल्या.

'**कैलास** हें देऊळ बाहेरून पाहिलें असतां तटाच्या भिंतीसारखें सरासरी भिकार दिसतें; परंतु आंत जाऊन तेथलें मुळांपासून शिखरापर्यंत कोरींव कामानें भरलेलें मुख्य देऊळ व भोंवतालचे सोपे, व सुटे खांब, व हत्ती व दुसरीं हजारों चित्रें, हें सर्व जेव्हां दृष्टीस पडतें, तेव्हां चित्तास फारच चमत्कार वाटतो. ह्या येवढ्या अफाट कामाचा नकाशा पूर्वीं मनांत आणून तें ज्यांनीं तयार केलें असेल, ते लोक मोठे कल्पक, मोठे सामर्थ्यवान्, व दृढनिश्चयी असले पाहि-

जेत; व हे गुण हल्लींच्या हिंदु लोकांत त्या लोकांच्या मानानें, शतांश किंवा लक्षांश सुद्धां उरले नाहींत.'

एक **इंग्रज ग्रंथकार** ह्या लेण्यांविषयीं असें लिहितो कीं, ह्या भयाण इमारती प्रथम दर्शनीं मोठ्या भव्य दिसतात. व त्यापासून मन थक्क आणि उदास होतें. ह्या देवळांची संख्या, त्यांची शोभा, व कांहींकांची विस्तीर्णता व उंची, कांहींकांतलें अनेक प्रकारचे नक्षीचें काम, त्यांवरील नानाप्रकारची व चमत्कारिक वेलबुट्टी, त्यांच्या खांबावरचें उत्तम प्रकारचें खोदींव काम, अनेक प्रकारचीं भींतीवर कोरलेलीं चित्रें, व मोठमोठ्या विशाळ मूर्ति, इत्यादि सर्व [illegible] आश्चर्य वाटतें, आणि त्याचें मन व्यग्र होतें. ह्या इमारती पुष्कळ आहेत, व त्यांत पुष्कळ तऱ्हा आहेत; तेणेंकरून त्यांची एकवटीनें मनांत कल्पनाच आणितां येत नाहीं. ह्याविषयीं, प्रथम दर्शनी अंतःकरणांत ज्या भावना होतात म्हणून वर सांगितलें, त्या लवकरच नाहिशा होऊन, मनांत असा विचार उद्भवतो कीं, हीं एवढीं अचाट कामें ज्या लोकांनीं बांधिलीं, व त्याकरितां ज्यांनीं इतका परिश्रम केला, व त्यांवर इतकें कौशल्य प्रगट केलें, ते लोक अडाणी तर खचीत नव्हते; पण ते कोण होते, व कोणत्या काळीं ते येवढ्या वैभवास

१ हीं भव्य आणि अप्रतीम मंदिरें, इसवी सनाच्या आठव्या शतकांत तयार झालीं असल्याविषयीं, दाखला मिळतो.

( पुढें चालू )

चढलें, आणि त्यांचें पुढें काय झालें, व त्यांचा कांहींच मागमूस कसा राहिला नाहीं, इत्यादि विचार मनांत येऊन फारच आश्चर्य वाटते.'

प्राचीन काळचीं अशा प्रकारचीं भव्य आणि मनोहर कामें ह्या भरतखंडाशिवाय अन्यत्र कोठेंही दृष्टीस पडत नाहींत. आतां, मिसर देशांत मात्र प्रचंड मनोरे पाह-

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू )

"In the Baroda grant it is stated that Krishnarája 'caused to be constructed a temple of a wonderful form on the mountain at Elápura. When the gods moving in their aerial cars saw it, they were struck with wonder, and constantly thought much over the matter, saying to themselves, 'This temple of Siva is self-existant ; for such beauty is not to be found in a work of art.' Even the architect who constructed it was struck with wonder, saying when his heart misgave him as regards making another similar attempt, 'wonderful ! I do not know how it was that I could construct it." * - * * *

"Thus it appears that it was Krishna Rajà that caused the Kailasà to be constructed, and the date assigned to it by Drs Fergusson and Burgess simply on architectural grounds is verified. Krishna Rajá must have reigned in the last quarter of the seventh century of the Sáka era, *i. e*, between 753 and 775 A. D."

(Early History of the Dekkan by Dr. Bhandarkar P. P. 48/49).

ण्यांत येतात; परंतु त्यांत सुबकपणा व रमणीयता कोठें देखील दृग्गोचर होत नाहीं. तथापि, अर्वाचीन काळीं, सुमारें दोनशें वर्षांपलीकडे, मुसलमानी कारकीर्दीत, कांहीं कांहीं इमारतींचीं कामें फारच सुरम्य आणि वर्णनीय झालेलीं आहेत. विजापुरास इब्राहीम अदिलशहाची फार भव्य व मोठी मशीद आहे. औरंगाबादेस मुकुरबा नामक बहुत शोभायमान मशीद पाहण्यांत येते. आणि उत्तर हिंदुस्थानांत तर अशा इमारती अनेक आहेत; व त्यांत ताजमहाल ही तर सर्वोत्कृष्टच होय.

'ही इमारत आग्रा नामक शहरापासून दीड कोसावर यमुना नदीच्या पश्चिम तीरावर आहे. ह्या इमारतीपेक्षां विशेष शोभायमान, विशेष भव्य, व विशेष सुंदर इमारत सर्व पृथ्वीवर दुसरी कोठेंही नाहीं. ही इमारत फार मोठी आहे, असें नाहीं; पण तिचें सौंदर्य, तिच्या निरनिराळ्या अवयवांचें यथायोग्य परिमाण, त्या प्रत्येक अवयवांच्या बांधणींत व्यक्त झालेलें बांधणारांचें अनुपमेय कसब, व एकंदर इमारतीचा अलौकिक व नाजूक घाट, इत्यादि गोष्टी पाहिल्या असतां, पाहणारा आश्चर्यानें अगदीं थक्क होऊन जातो; व त्यापासून झालेला आनंद त्याचे मनांत मावेनासा होतो ही मशीद बांधून सुमारें दोनशांपेक्षां अधिक वर्षे होऊन गेलीं आहेत, तरी ती जशी कांहीं कालच बांधली आहे, अशी नवीन व नाजूक अद्यापिही दिसते, असें सांगतात. ही सर्व

इमारत पांढऱ्या संगमरवरी दगडांची आहे. हे दगड पांढरे असून त्यांत किंचित् काळसर रंगाची झांक मारिते. तेणेंकरून ते फारच शानदार दिसतात. ही इमारत संगमरवरी दगडांच्या चौथऱ्यावर आहे, व त्या चौथऱ्याच्या चार कोंपऱ्यांवर चार, त्याच जातीच्या दगडांचे मनोरे आहेत. व एकंदर सर्व इमारतीवर आंतून व बाहेरून उत्तम प्रकारची नक्षी खोदिली आहे. पांढऱ्या भुईवर नानाप्रकारच्या चित्रविचित्र रंगाचे खडे बसवून, भिंतीवर वगैरे फारच सुबक वेलबुट्टी काढिली आहे. दारांच्या व खिडक्यांच्या महिरपांवरून पांढऱ्या दगडांत काळेखडे बसवून, शाईनें पांढऱ्या कागदावर लिहिल्यासारखी अरबी लिपींतलीं अक्षरें दाखविलीं आहेत. व त्या अक्षरांनीं कुराणांतलीं वाक्यें लिहिलीं आहेत, असें म्हणतात. मशीदीचें मुख्य घुमट, व चार लहान घुमटें, व त्या सर्वांवरचें कळस, ह्यांवरही उत्तम प्रकारची नक्षी खोदिली आहे, व नानाप्रकारच्या रंगांचे खडे बसवून चमत्कारिक फुलें दाखविलीं आहेत. घुमटाचा आकार आंड्यासारखा लांबट व वाटोळा आहे; व हा आकार शिल्पशास्त्रवेत्ते व मार्मिक पुरुष फारच चाहतात.'

'ह्या मशीदींत शिरल्याबरोबर तेथील अंधक उजेड पाहून, व गंभीर प्रतिध्वनि ऐकून, मनुष्याच्या मनांत एकदम कांहीं एक चमत्कारिक वृत्ति उत्पन्न होते. जसें ए-

खाद्या देवळांतल्या गाभाऱ्यांत शिरावें, आणि तेथें थोडा उजेड व थोडा अंधकार असावा, व किती एक तपस्वी लोक गंभीर मुद्रेनें ध्यान करीत आहेत, कितीएक भजन पूजनांत गुंतले आहेत, असें दृष्टीस पडावें, आणि तें सर्व पाहून अंतःकरणांत कांहीं भय, कांहीं पूज्यबुद्धि, असा कांहीं चमत्कारिक भाव उत्पन्न होतो, व संसारांतले विचारांची विस्मृति पडते, तसें ह्या मशीदींत गेलें असतां चित्ताची भावना कांहीं वेळ होते. ह्या ठिकाणीं जें बोलावें तें व तो गाभारा उलटून बोलतो, असें वाटतें. व ह्या प्रतिध्वनीचा आवाज मेघगर्जनेसारिखा गंभीर ऐकूं येतो.'

'प्रत्येक कमानीला खिडकी आहे, व त्यांच्या चौकटी संगमरवरी दगडांच्या आहेत. मुख्य गाभाऱ्यांत बादशहा व राणी ह्यांचीं थडगीं आहेत ह्मणून वर सांगितलें; पण हीं थडगीं वास्तविक नव्हत. तर ह्या गाभाऱ्याखालीं एक तळघर आहे. त्यांत ह्या दोघांच्या कफनी पुरून त्यांचीं वास्तविक थडगीं तेथेंच खालीं आहेत, व वरच्या महालांतलीं थडगीं दर्शनीं मात्र होत. मुसलमान लोकांत खालीं व वर अशा दोन ठिकाणीं थडगीं करण्याची चाल आहे. असो, हें तळघर चौकोनी आहे, व संगमरवरी दगडांचें बांधिलेलें नाहीं. ह्या तळघरांत जाण्याकरितां पूर्वीं रुप्याचा दरवाजा होता; हल्लीं तो दरवाजा लांकडी आहे.'

'ही इमारत चौकोनी आहे, ह्मणून वर सांगितलेंच

आहे. हिच्या प्रत्येक बाजूस मध्यें एक मोठी कमान व दोहों अंगांस दोन लहान लहान कमानी, अशा तीन कमानी आहेत, व कोपरे छाटून घेऊन चार कोपऱ्यांस चार लहान लहान कमानी दिल्या आहेत. ह्या कोपऱ्यांतल्या कमानी, ज्या बाजूसमोर आपण उभें रहावें, त्या बाजूच्या आहेत असें वाटतें. मधल्या गाभाऱ्याच्या सभोंवतीं मुख्य चार दिशांस चार चौकोनी जागा, व चार कोपऱ्यांस चार अष्टकोनी जागा, अशा आठ जागा आहेत, व या सर्व फारच मनोहर आहेत. दुसऱ्या मजल्यावरही अशाच आठ जागा आहेत. '

' ही इमारत ज्या संगमरवरी चौथऱ्यावर आहे, त्यानें क्षेत्र तीनशें पन्नास फूट आहे, व त्याची उंची वीस फुटांपेक्षां अधिक आहे, ह्या चौथऱ्याच्या चारी कोपऱ्यांवर चार मनोरे आहेत. ह्या मनोऱ्यांच्या बैठकी अष्टकोनी आहेत, व त्यांचा घेर ऐंशीं फूट आहे. प्रत्येक मनोऱ्याच्या सोटाचा व्यास मुळांशीं वीस फूट आहे, व एकंदर मनोऱ्याची उंची सुमारें दीडशें फूट आहे. हे मनोरे पांढऱ्या संगमरवरी दगडांचे असून त्यांवर चित्रविचित्र रंगाचे खडे बसवून मोठी रमणीय नक्षी केली आहे, व त्यांची बांधणी फारच सुंदर व नाजूक आहे. ह्या चौथऱ्याखालीं साध्या दगडांची चिरेबंदी आहे. तिचें एकंदर क्षेत्र सुमारें नऊशें फूट असेल, असें वाटतें. त्या चिरेबं-

दीच्या चोहींबाजूंस चार मशिदी आहेत, व चार कोपऱ्यांस चार अष्टकोनी शानदार बुरूज आहेत.'

आपली राणी **अर्जमंदबानू** हिचें नांव अजरामर राहण्याकरितांच, **शहाजहान** बादशहानें ही इमारत बांधली होती.

श्रीरंग पट्टण, व

**श्रीरंगपट्टण** येथील देवालयांच्या प्रांगणाचा परिधी सुमारें दोन कोस आहे. त्याच्या अन्तर्गाभ्यांतील स्तंभसमुच्चय फारच विस्तृत असून उच्च आहे, व सुमध्यम असून सुकुमार आहे.

बंगाल इलाख्यां-तील, भुवनेश्वर ये-थील देवालयें.

**ओरिसा** प्रांतात **भुवनेश्वरा**जवळील देवालयांची व मंदिरांची ती विशीर्णावस्था आणि उध्वस्त दशा पाहून, परम दुःख झाल्याशिवाय राहत नाहीं. येथील देवालयांचे शिलाट्ट चाळीसपासून पन्नासपर्यंत असून, त्या प्रत्येकाची उंची पन्नास फुटींपेक्षां, ह्मणजे सरासरीच्या मानानें तेहेतीस हातांपेक्षां बिलकुल कमी नाहीं. ह्यांत कांहीं कांहीं तर १५० पासून १८० फुट पर्यंतही उंचीचे आहेत.

विजया नगरचा प्रध्वंस.

**तुंगभद्रा** नदीच्या तीरीं वामतटीं, सुप्रसिद्ध **विजयानगर** नामक शहराच्या तटबंदीचा, त्यांतील विशाल सरोवरांचा, सेतूंचा, आणि नामांकित, भव्य, उदार, व

मोठमोठ्या जुनाट अशा देवालयांचा प्रध्वंस दृष्टीस पडतो. ही सर्व पाहिलीं ह्मणजे सर्व भक्षी कालाच्या विचित्र गतीचा विस्मय वाटल्यावांचून खचितच राहत नाहीं. जें शहर सुमारें चार शतकें ( इ० स० १११८ पासून १५६५ ) पर्यंत चांगल्या भरभराटीच्या स्थितींत होतें, त्याची आजमितीस इतकी निकृष्ट दशा होऊन, तें अशा जर्जरावस्थेप्रत पोहोंचलें आहे. तथापि, त्यांतील मोडकळीस आलेल्या विशाळ इमारती, भव्य मंदिरें, व सुंदर देवालयें, हीं प्राचीनत्वाच्या संबंधानें हल्लीं देखील फार महत्वाचीं आहेत.

हिंदुस्थान व मिसर, या दोन देशांतील निर्मितीमध्यें तुलना.

इतक्या विशाल प्रमाणाच्या भव्य, सुरेख, आणि उदार चमत्कृति, **मिसर** ( **इजिप्त** ) देशाशिवाय, अन्यत्र कोठेंही नाहींत. तथापि, शिल्पपाटवचातुर्याच्या संबंधानें या दोहोंत तुलना पाहूं गेलें तर, जमीन अस्मानाचें अंतर दिसतें. **मिसर** देशांतील मनोरे अवाढव्य व स्थूल आहेत; परंतु त्यांत सौंदर्य आणि शोभा हीं यत्किंचित् सुद्धां भासमान होत नाहींत. **हिंदुस्तानांतील** निर्मिति अशा जगड्वाळ नाहींत; तथापि, त्यांत वैदग्ध्य व चातुर्य यांचें प्रतिबिंब पूर्णपणें वठल्याचें ठिकाठिकाणीं दृग्गोचर होतें. **मिसर** देशांतील मनोऱ्यांविषयीं अशी आख्यायिका आहे कीं त्यांच्या रचनेची सुरवात इसवी शकापूर्वीं ३०९१ वर्षांपासून

झाली असून ते पुरे होण्यास सुमारें ६१ वर्षें लागलीं, ह्या मनोऱ्याखालीं अजमासें तेरा एकर जमीन व्याप्त झाल्याचें कळतें.

वेरूळ येथील अप्रतीम मंदिरें, व त्यांचा काल.

**वेरूळ** येथील विवरमंदिरांत, अप्रतीम अशीं मंदिरें म्हटलीं म्हणजे **विश्वकर्म**, **कैलास**, आणि **इंद्रसभा**, हीं होत. हीं सर्व हिंदूंनींच एकमेकांच्या चढाओढीनें, व प्रतिस्पर्धेस पेटल्यामुळें, निर्माण केलीं आहेत. यांपैकीं "**विश्वकर्म**" नामक विवरमंदिर **बौद्धांनीं** तयार केलें. व तें पाहून त्यावर तान व्हावी अशी ईर्षा उत्पन्न झाल्यामुळें **ब्राह्मणांनीं** "**कैलास**" नामक शिलोत्खात मंदिर बनविलें. हें खरोखर अति प्रेक्षणीय असून नक्षी, व खोदीव कामाची त्यांत अगदीं लयलूट केली आहे; व तें सर्वोत्कृष्ठ तऱ्हेनें साधलें आहे. तदनंतर कांहीं कालानें **जैन** लोकांसही हौस आली. व त्यांनीं देखील नजीकच आपल्या मर्जीप्रमाणें "**इंद्रसभा**" नामक मंदिर खोंदलें. हें तर अप्रतीमच आहे. हीं विशाल कामें केव्हां झालीं असावीं, अशाविषयींचा काल, निश्चयात्मक रीतीनें ठरविण्यास, विश्वसनीय साधन कांहींच उपलब्ध नाहीं. तथापि कांहीं कांहीं ठिकाणीं शिलालेख सांपडतात, त्यावरून तद्विषयनिपुण शास्त्रज्ञ असें अनुमान करतात कीं, हीं विवरें इ० स० ३९० पासून १३०० पर्यंतच्या कालांत

निर्माण झालीं असावीं; व त्यांपैकीं प्रत्येक तयार करण्यास निदान ८० पासून १०० वर्षें तरी लागलीं असावीं, असा अजमास आहे.

सर्वांत अति प्राचीन व फार विख्यात असें देवालय **श्रीजगन्नाथाचें** होय. तरी ह्याचें काम इ० स० ११९८ सालीं संपूर्ण झाल्याचें सुप्रसिद्ध आहे. यापेक्षांही दुसरीं जुनाट देवालयें पुष्कळ आहेत, व त्यांतही अबूच्या पाहाडांत नामांकीत पैकीं आहेत.

जगन्नाथचें देवालय व त्याचा काल.

**तडाग** रचनेंत देखील हिंदूंचें उत्तम कौशल्य दिसून येतें. ही रचना बहुत करून दोन प्रकारची असते. ह्मणजे कांहीं तलाव, जलसंचयाकरितां, भूमींत खोद काम करून तयार केलेले असतात, व कांहीं दरीच्या तोंडाला मोठमोठे बंधारे घालून बांधलेले असतात. पहिल्या कृतींत, ह्या तलावांस बहुत करून चौफेर पाहिऱ्या असून, तलावांत त्या थेटपर्यंत खोल नेलेल्या असतात, व त्या मजबूत दगडाच्या घडींव बनविलेल्या दिसतात. बंधारे घालून निर्माण केलेल्या तलावांचा उपयोग कुल्यासिञ्चनाकडे होतो. पाणी दुर्मिळ असतें अशा ठिकाणीं, मोठमोठे कालवे अथवा पाट बांधून नेल्यानें, मनुष्यें व जनावरें ह्यांच्या उपजीविकेच्या साधनांचा

हिंदूंची तडागरचना.

अमित साठा होऊन सर्वत्र आबादानी व्हावी या हेतूनें, सदरहू तलावाचा उपयोग, त्याच कामाकडे केल्याचें दिसतें. हे तलाव फार प्रेक्षणीय आणि विशाळ आहेत. व त्यांतील कांहीं कांहीं तर इतके मोठे आहेत कीं त्यांचा परिधि कित्येक कोस लांबीचा असून, त्यांतील जलसेकानें शेंकडों कोस प्रदेश असूनही परिप्लुत होत आहेत.

कूपरचना.

तलावाप्रमाणें कूपरचनाही सुंदर आहे. कांहीं विहिरी फार खोल, रुंद, आणि चतुष्कोन असतात, व कांही वर्तुलाकार असतात. बहुतकरून अति जुनाट विहिरी चतुष्कोनच असतात. ह्या विहिरी मंचालंकृत असून, शोभायमान अशा अलिन्दांनीं परिवेष्टित असतात. त्यांत ठिकठिकाणीं बसण्यासाठीं व आरामाकरितां प्रशस्त जागा केलेल्या असतात. आणि आंत उतरण्यासाठीं सुगम अशी शिलासोपानपंक्तिही असते. त्यामुळें त्या फारच भव्य व रमणीय दिसतात.

सेतुरचना, व

सेतुरचना अगदीं साधीच दिसते. बहुतकरून बाजूला शिलास्तंभाची योजना केली असल्याचें भासमान होत असून, त्यांजवर दगडांचीच अडवीं बहालें टाकलेलीं असतात. आणि हीं एकाएकीं, अथवा सहजगत्या, पडलीं जाऊं नयेत म्हणून, त्यांस मधून मधून दगडी खांबाचे चांगले टेके दि-

लेले असतात. अशा प्रकारचे सेतु **दक्षिण हिंदुस्थानांत** पुष्कळ दृष्टीस पडतात. **श्रीरामचंद्रानें लंकाधिपती रावणावर** स्वारी केली, तेव्हां इतिहासप्रसिद्ध असा सागरोदकांत रचलेला सेतु सर्वांस महशूर असून, त्याचे विशीर्ण शिलाखंड, व अवशिष्ट भाग, आजमितीसही **सेतुबंधरामेश्वरा**जवळ दृग्गोचर होतात.

तोरणें, आणि जयस्तंभ.

याशिवाय **तोरणें**, **जयस्तंभ**, आणि **अलिन्द**, इत्यादिकांतही हिंदुंचें मुळचें शिल्पपाटव सहजीं दिसून येतें. **चितुरास** विजयश्री प्रकाशक, असा एक विशाल आणि फारच सुरेख **जयस्तंभ** आहे. ह्याची उंची १२० फूट आहे, व त्याचें वर्णन **टॉड्**कृत **राजस्थान**च्या इतिहासांत फार सुरेख दिलें आहे. **गुजराथे**च्या उत्तरेसही अशा मासल्याचीं तोरणें दृष्टीस पडतात. यापैकीं **बारनगर** येथील अत्युत्कृष्ठ पैकीं होय.

आर्यशिल्पाची स्वभावसिद्धता.

आमची **आर्यविद्या**, आमचें **आर्यशास्त्र**, आमच्या **आर्यकला**, आणि त्या सर्वांचीं अमूल्य उपमाहित्यें, हीं यच्चयावत् स्वप्रभावनिर्मितच असून, त्या प्रत्येकांत मुळचाच तीव्र बुध्यंकुर, व प्रज्वलित स्वयंप्रकाश, स्वभावतःच दिसून येतात. आतां, ह्या गोष्टीचें प्रतिपादन करण्याची अवश्यकता नसून, तीआमच्या ग्रंथांवरून, लेखांवरून,

व विवरमंदिरासारख्या शाश्वत प्रत्यक्ष प्रमाणांवरून, निर्विवाद सिद्ध होतें. असें असूनही, कांही पाश्चात्य पंडितांचें असें ह्मणणें आहे कीं, ह्या सर्वांत यावनिक[१] गंध, व तद्गुण प्रभाव, हे भासमान होतात. परंतु ही गोष्ट कोणत्याही प्रकारें सिद्ध होत नसून, बिलकुल प्रमाण नसतांही, केवळ दुराग्रहानेंच तिचें पुष्टीकरण केल्यासारखें दिसतें. आतां, ही गोष्ट आम्ही निष्प्राञ्जलपणें कबूल करतों कीं, अन्य राष्ट्रांचें गुणदोष पाहून, त्या धोरणानें आम्ही आपल्या शास्त्ररचनेंत, किंवा शिल्पवैदग्ध्यांत, कालांतरानें कमिजास्ती फेरफार केला आहे. तथापि, त्या सर्वांत आमचा अंकूर, तेज, व प्रभाव, हीं मूलचीं आणि स्वोदित असल्यामुळें, आम्ही विद्येच्या कोणत्याही शाखेंत, कोणत्याही राष्ट्रांचें, यत्किंचित्‌ही ऋणी नाहीं. इतकेंच नाहीं तर, सर्व विद्येंत, सर्व शास्त्रांत, आणि सर्व कलांत, इतर सर्व राष्ट्रांस आह्मांपासूनच ज्ञान प्राप्त झालें असल्यामुळें, तीं इतर राष्ट्रेंच आमचीं सर्व प्रकारें ऋणीं आहेत, असें ह्मणण्यास कांहीं हरकत नाहीं. आणि ही गोष्ट पाश्चात्य विद्वानें[२] देखील कबूल करतात.

१ यवन शब्दांत आरब, इराणी, वगैरे मुसलमान, व ग्रीक, आणि रोमन, तसेंच वायव्य सरहद्दीवरील रानटी जाती, रोमन, यांचा समावेश होतो, असें समजण्याचें आहे.

1 What can India teach us ? By Pro. Maxmuller.

( पुढें चालू )

**आर्यविद्येंत**, व **आर्यशास्त्रांत**, आणि **आर्यकलांत**, आह्मी इतर राष्ट्रांचे ऋणी नाहीं, अशाविषयीं, मागील ११।१२।१३ आणि २० ते २७ या भागांत, सविस्तर विवेचन केलें आहे. आतां चालू भागांत फक्त **आर्यशिल्पकलां**विषयींचाच विचार करूं.

यवनांनीं आर्यशिल्पाचें केलेलें अनुकरण.

आमच्या कित्येक इमारतींचे नमुने **यवनांनीं** उचलून घेतले असल्याचें, त्यांच्या विद्यमान असलेल्या प्राचीन मशिदींवरून, व देवालयांवरून सिद्ध होतें. **मुसलमान** लोकांच्या मशिदीची, आणि **ग्रीक** व **रोमन** लोकांच्या देवालयाची, जी घुमटासारखी आकृति दृष्टीस पडते, ती केवळ आमच्या **बौद्धांच्या स्तूपांचेंच** प्रतिबिंब होय. आणि हीं आमच्या हिंदूंची निमाण चमत्कृती पाहून, तिचेंच अनुकरण **यवनादि पाश्चात्यांनीं** केल्याचें अगदीं उघड दिसतें. ह्मणजे विद्येच्या या शाखेंत देखील ज्ञानाचा ओघ नेहमींच्या नैसर्गिक स्थितीप्रमाणें पूर्वेकडून पश्चिमेकडेसच गेला असून, त्याच्या उलट दिशेनें प्रवाह वाहिल्याचें यत्किंचितही प्रमाण दिसत नाहीं. **राजेंद्रलाल मित्रानें ओरिसा** येथील **प्राक्कालीन वृत्ता**विषयीं एक उत्तम

( मागील पृष्ठावरून पुढें चालू )

2 Elphinstone's History of India.

3 Dr. Hunters' Indian Empire.

4 The History of Indian Literature. By Pro. A. Weber.

पुस्तक छापिलें आहे, त्यांत आमच्या प्राचीन शिल्पकलांत यवनांच्या गुणप्रभावाचा यत्किंचित्‌ही गंध नसल्याविषयीं चांगलें प्रतिपादन[2] केलें आहे. आणि, कांहीं[3] पाश्चात्य पंडित सदरहू गोष्ट निर्वेधपणें कबूलही करि-

---

1 "The antiquities of Orissa."

2 "Rájendra Lál mitra, it is true, in vol. I. of his splendid work, "The antiquities of orissa" (1875), holds out patriotically against the idea of any Greek influence whatever on the development of Indian architecture, &c."

(The History of Indian Literature. By Pro. A. Weber. P. 274. Note 321 a).

3 "A far higher degree of development was attained by Architecture, of which some most admirable monuments still remain: It received its chief cultivation at the hands of the Buddhists, as these required monasteries, topes (stúpas), and temples for their cult. It is not, indeed, improbable that our Western steeples owe their origin to an imitation of the Buddhist topes."

"The painful minuteness, indeed, with which the erection of brick alters is described in the Vedic sacificial ritual (of the Sùlva-Sútras) might lead us to suppose that such structures were still at that time rare. But, on the one hand, this would take us back to a much earlier time than we are here speaking of; and, on the other, this scrupulous minute-

( पुढें चालू )

तात. तथापि कांहीं[1] पंडित तत्संबंधीं आपली आशंकाच प्रदर्शित करतात. परंतु, हा विकल्प प्राचीन निर्मितीस कोणत्याही प्रकारें बिलकुल लागू होत नसून, तो फक्त अर्वाचीन इमारतींबद्दलच मनांत आणण्यासारखा आहे.

रामराजानें[2] हिंदुशिल्पशास्त्रावर इ० स० १८३४ साली फार उत्तम निबंध लिहिलेला असून, त्यांत त्याविषयीं फारच सूक्ष्म आणि सविस्तर विवेचन केलें आहे. ही तपशिलवार माहिती 'मानसारां'तील अट्ठावन अ-

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू )

ness of description may simply be due to the circumstance that a specially sacred structure is here in question, in connection with which, therefore, every single detail was of direct consequence."

(History of Indian Literature. P. 274.)

1 "In the fifth volume of his Archieological Survey of India, P. 185, ff., Cunningham distinguishes the Indo-Persian style, the prevalence of which he assigns to the period of the Persian supremacy over the vally of the indus ( 500-330 ), and three Indo-Grecian-styles, of which the Ionic prevailed in Takshila, the Corinthian in Gandhara, and the Doric in Kashmir."

(History of Inian Literature. P. 274. Note 321 A. )

2 Rám Ráz's Essay on the Architecture of the Hindoos. (1834).

ध्यायांतून, व मायमत, काश्यप, वैखानस, आणि अगस्त्यकृत सकलाधिकार, यांतून घेतल्याचें दिसतें. वराहमिहिर संहितेंतही एक सबंध अध्याय या शिल्पविवेचनासंबंधींच आहे.

1 Mayas' system, on which see Rajendra Lal mitra: Notices, II. 306.



# भाग २९ वा.

## आर्यकला.

### पटनिर्माणविद्या व रागकौशल्य.

भारतीयकला व जीवनसाधन.

स्थूलमानानें पाहूं गेलें असतां, भरतखंडांतील प्रजा कृपिकर्मजीवी आहे, हें खरें. तथापि, ती इतर उपयुक्त आणि चारुकलांत मूढ आहे, असें कोणीही बिलकुल समजूं नये. कारण, मानवी सुखोपभोगाच्या संबंधानें ज्या ज्या साधनांची, ऐषआरामाची, आणि ऐश्वर्याची, यत्किंचितही अवश्यकता आहे, तीं तीं यच्चयावत इकडील प्रजाजनांनीं पैदा केलीं असून, त्यांत ते आपलें अनुपम हस्तपाटव, अद्भुत् रासिकता, व प्रशंसनीय रसज्ञता, आजपर्यंत दाखवीत आले आहेत.

भरतखंडाची इतर देशांशीं तुलना.

इंग्लंडांतील ल्यांक्याशायर वगैरे मोठमोठ्या शहरांप्रमाणें आमच्या भरतभूमींत जरी असंख्य गिरण्या नाहींत, तरी पटनिर्माणविद्येंत हा देश अजूनही

पृथ्वींतील एका राष्ट्रास देखील हार गेला नाहीं. इतकेंच नाहीं तर, ह्या देशासारखें उत्कृष्ठ, तसेंच बारीक विणीचें, सुबक, आणि मुलाईम कापड पृथ्वीच्या पाठीवर अन्यत्र कोठेंही पैदा होत नाहीं. यूरोपखंडांतील लोक, व्यापार-निमित्य, जेव्हां हिंदुस्थानांत आले, तेव्हां येथील लोकांची सुधारणा, त्यांची उन्नतावस्था, त्यांचें शिल्पपाटव, विणकर कामाचें चातुर्य, कनकप्रावीण्य, रत्नादिकोश, भाजननिर्माणवैदग्ध्य, आणि गंधद्रव्यक्रिया, हीं पाहून त्यांस मोठें नवल वाटलें.

ह्या आमच्या चारुकला फार प्राचीनकालच्या अस-

---

तत्संबंधीं डाक्तर इंटरचा अभिप्राय. १ त्यासंबंधीं लिहितांना डाक्तर हंटर असें ह्मणतात कीं:—

"When the first European traders reached the coast of India in the 16th century, they found a civilization both among 'Moors' and 'Gentoos' at least as highly advanced as their own. In arhitecture, in fabries of cotton and silk, in gold-smith's work and jewellery, the people of India were then unsurpassed."

(Indian Empire P. 598).

"I delicacy of texture, in purity and fastness of colour, in grace of design, Indian cotton may still hold their own against the world."

(Indian Empire. P. P. 599/560).

आर्यचारुकलांचें ऐतिहासिक दृष्टीनें अन्वेषण.

तांही, त्यांचा अखंड प्रवाह आज तीन चार हजार वर्षांच्या प्रचंड घडामोडींत कसा राहिला, व कालाच्या असंख्य उलथापालथींत तो आजपर्यंत सतत, आणि अप्रतिहत, असा काय कारणांनीं, व कोणत्या साधनांनीं टिकला, हें समजण्याची जिज्ञासा प्रत्येक विचारी मनुष्यास झाल्यावांचून खचीत रहाणार नाहीं. व अशा प्रकारें झालेलें यथायोग्य कुतूहल पुरविण्यासाठीं, सदर्हू प्रवाहाच्या उगमाशींच जाणें अगदीं अत्यवश्य असून, त्या कलांच्या मूल संस्थांविषयीं ऐतिहासिक दृष्टीनें अन्वेषण करणें फारच महत्वाचें, व चित्तरंजक, आणि मनोवेधक आहे.

ह्या हिंदुग्रामसंस्थांच्या इतिहासाचें समग्र विवेचन या पुढें योग्य स्थळीं करण्यांत आलें आहे.[1]

हिंदुग्रामसंस्थांविषयीं दोन शब्द.

मात्र या ठिकाणीं इतकेंच दिग्दर्शन करितों कीं, या अफाट देशांतील बहुतेक प्रत्येक मोठ्या गावांत, एखादा शिल्पकार अथवा सोनार, तांबट अथवा लोहार, कोष्टी अथवा कुंभार, आणि सुतार, तेली, नापीत, किंवा चांभार, वगैरे नाना प्रकारच्या धंद्याचे लोक, कोणीना कोणी तरी असतातच. ह्या सर्वांस ज्याच्या त्याच्या उद्योगाच्या मानानें गिऱ्हाइकीही मिळे. त्यामुळें, ज्या त्या धंदेवाल्यांनीं उत्पन्न केलेल्या मालाचा

१ भाग ३४ वा पहा.

खप होण्यास, यत्किंचित्‌ही अडचण पडत नसे. तशांत ह्यांचा माल, दिवसानुदिवस, जसजसा चांगला, सुबक, आणि खुमासदार होऊं लागला, तसतशी त्याची उत्तरोत्तर प्रसिद्धी होऊन, तो मोठमोठ्या ठिकाणीं, श्रीमान् लोकांच्या घरीं, मध्या दरबारांत, व विलासी राजवाड्यांत, पुष्कळच खपं लागला. त्या कारणानें, अशा प्रकारचा माल तयार करण्यास चांगलेंच उत्तेजन येत चालेंं; आणि पूर्वींचे राजे व श्रीमान् लोक हे चांगले गुणज्ञ, व फारच रसिक असल्यामुळें, ते केवळ ह्या अप्रतीम कलांचे पोषिंदेच बनले. त्यामुळें, कलोत्कर्षाकडे करोडो रुपयांचा खर्च प्रतिवर्षी होत गेल्यानें, हा काळपर्यंत त्या जिवंत राहिल्या. परंतु पुढें पुढें, परद्वीपस्थांच्या कारकीर्दींत आमचें स्वातंत्र्य अगदींच नष्ट होत गेल्यानें, आमचे राजे, मांडलिक प्रभु, आणि त्यांचें सामंतचक्र, हीं सर्वच लयास जात चाललीं. त्या योगानें, ह्या कलांस त्यांजकडून मिळणारें उत्तेजन व पोषण, हीं साहजीकच कमी होत जाऊन, तें प्राचीन कलावैभव आजमितीस अगदींच संपुष्टांत आल्यासारखें झालें आहे. तशांत यूरोपखंडांतील, व त्यांतही विशेषतः इंग्लंडांतील बाष्पयंत्रांनीं, सर्व प्रकारचा माल फारच स्वस्ता करून टाकिल्या कारणानें, हा विलायती अल्पमूल्य व चटकदार माल टाकून, आमचा उज्ज्वल व

आर्यकलांचा उत्कर्ष व ऱ्हास व त्यांचीं कारणें.

टिकाऊ, परंतु बहुमूल्य, असा देशी माल घेण्यास, निर्धनतेमुळें कोणी देखील धजावत नाहीं.

त्यांचें पुनरुज्जीवन.

तथापि, ही एक गोष्ट मोठ्याच सुदैवाची समजली पाहिजे कीं, आमच्या देशाच्या ह्या निकृष्ठावस्थेंत व दीनदशेंत, इकडील कलांस आणि उद्योगास परद्वीपस्थांकडून, दिवसानुदिवस, थोडें बहुत तरी उत्तेजन मिळत चाललें आहे. तसेंच आमच्या प्राचीन कलांची ही सांप्रतची दुर्दशा पाहून, आमचे देखील आतांशा कोठेंसे डोळे उघडत चालले आहेत. त्यामुळें, ह्या पुराण आर्यकलांचें पुनरुज्जीवन होण्याचा बराच संभव दिसत आहे.

कार्पासनिर्मितीचा पौराणिक काल.

कापसाचें विणकर काम ह्मटलें ह्मणजे हिंदुस्थानांतील प्राचीन उद्यमांपैकींच एक उद्यम होय. हा उद्यम इतका पुरातन आहे कीं, तो महाभारत[1]कालाच्या पूर्वीपासूनही प्रचारांत आहे. हिंदुस्थानांत कापसाचा व इतर तयार झालेला माल, पूर्वीं देखील दूरदेशीं रवाना करण्यांत येत असे. ग्रीक भाषेंत कार्पास वस्त्राला सिंडान् अशी संज्ञा आहे; आणि ह्या शब्दाची शब्दव्युत्पत्ति

1 * * * "In Indian, cotton-weaving was practised" before the time of Mahà Bhàrata."

(Dr. Hunter's Indian Empire. P. 599).

पाहूं गेलें असतां असें दिसतें कीं, **सिंध** किंवा **हिंद** या पासूनच हा शब्द झाला आहे. कारण, ज्याप्रमाणें **कालिकत** बंदरांतून पैदा झालेल्या कापसाच्या वस्त्रांस **इंग्रजींत "कालिको"** असें ह्मणतात, तद्वतच **हिंद** अथवा **हिंदुस्थान** देशांतून प्राप्त झालेल्या कापसाच्या मालास **सिंडान्** हें नांव पडलें असावें. आमच्या **भरतखंडाच्या** प्राचीन व्यापारासंबंधीं अगदीं पुराण असा प्रथमचा प्रमाण लेख ह्मटला ह्मणजे **पेरिप्लस** नामक ग्रंथ होय. ह्या ग्रंथावरून असें दिसतें कीं, फार पुरातन काळीं देखील **हिंदुस्थानांतून** नानाप्रकारचें कापड दूरदेशीं निर्गत होत असे.

देशी मालाचा कारखाना, व त्याची निर्गत.

हें सर्व कापड हस्तनिर्मितच असे. कारण त्यावेळीं बाष्पयंत्रनिर्मिति कोणाच्या स्वप्नांत देखील नव्हती. इ० स० १८७० सालीं, **मद्रास इलाख्यांत** २,७९,२२० माग होते. ह्यांपैकीं, २,२०,०१९ माग खेड्यापाड्यांतील असून, बाकी ५९,२०५ शहरांतील होते; व त्यांपासून सुमारें साडेतीन कोट रुपयांपासून तों चार कोट रुपयांपर्यंत कापड निघालें असावें, असा अजमास आहे. सदरहू सालीं **मद्रास इलाख्यांतून** सुमारें २२,००,००० रुपयांचें देशी कापड परमुलुखीं रवाना

मद्रास इलाख्यांतील,

झालें. परंतु हें देशीकापडाच्या निर्गतीचें मान चढतें किंवा कायमही राहिलें नाहीं. तें दिवसानुदिवस कमीच होत गेलें. तें इतकें कीं, इ० स० १८८२।८३ सालीं, **मद्रासेहून** फक्त ४,९१,९६० रुपयांचेंच देशी कापड निर्गत झालें. **मद्रासेंत** एकंदर चार कापसाच्या गिरण्या आहेत. **बिलारी** परगण्यांत एक आहे, व इतर ठिकाणीं चार आहेत.

मध्यप्रांतांतील, व

**मध्यप्रांतांत** ह्या देशी धंद्याला अजून देखील चांगली तेजी आहे. इसवी सन १८७७।७८ सालीं ८७,५८८ माग, व १,४५८९६ विणकरी होते. आणि एकंदर माल सुमारें ८२,८०,००० रुपयांचा पैदा झाला होता. इ० स० १८८२।८३ सालीं, **मध्यप्रांतांत** कापसाच्या तीन मोठमोठ्या गिरण्या **नागपूर** वगैरे ठिकाणीं असून, शिवाय आणखी १,४३,८०१ मागही होते. ह्या सालीं एकंदर माल सुमारें ८९,८२,१९० रुपयांचा पैदा झाला. आणि येथूनच इ० स० १८७८–७९ सालीं, अजमासें १६,२६,४२० रुपयांचा माल इतर प्रांतीं रवाना केला.

मुंबईंतील.

**मुंबई इलाख्यांत विलायतेकडील** मालाचा पुष्कळ खप होत असल्यामुळें, इकडे देशी मागांची संख्या दिवसानुदिवस फारच कमी होत चालली आहे. तथापि, हळू हळू गिरण्यांचा जंगी कारखाना इतस्ततः बहुतेक ठिकाणीं पसरत

चालल्या कारणानें, देशाचें हीत बरेंच होत जाऊन, इकडील माल सुद्धां बऱ्याच प्रमाणानें, **चीन, जपान, अरबस्थान,** आणि **आफ्रिका,** वगैरे ठिकाणीं रवाना होतो.

हिंदुस्थानांतील गिरण्यांचा अहवाल.

वाफेच्या यंत्रानें चालणारी, अशी कापसाची व कापडाची पहिली गिरणी, **मुंबई** शहरांत इ० स० १८५४ सालीं स्थापन झाली. त्यानंतर त्यांचा क्रमाक्रमानें इतका फैलाव झाला कीं, इ० स० १८७९ सालीं, **हिंदुस्थनां**तील एकंदर गिरण्यांची संख्या (५८) अठ्ठावण पर्यंत येऊन पोहोंचली. यांपैकीं ३० गिरण्या तर फक्त **मुंबई** बेटांतीलच असून, १४ **गुजराथें**तील कापूस पिकणाऱ्या प्रांतांत, ६ **कलकत्ता** व नजीकच्या प्रदेशांत, ३ **मद्रासें**त, २ **वायव्यप्रांतांत कानपुरास,** १ **मध्यप्रांतांत नागपुरास,** १ **इंदूरास,** आणि १ **निजाम हैदराबादेस,** अशा होत्या. ह्या एकंदर गिरण्यांवर पुरुष, बायका, व मुलें, मिळून सुमारें चाळीस ४०,००० हजार मनुष्यांचा उदरनिर्वाहा चाले. गिरणीच्या ह्या संख्येंतही उत्तरोत्तर भर पडत जाऊन, त्याची मजल इ० स० १८८४ सालीं ८१ पर्यंत येऊन ठेपली; त्याचा तपशील खालीं लिहिल्या प्रमाणें:—

इ० स० १८७९ सालचा.

**मुंबई** बेटांत ४३; सदरहू **इलाख्यांतील** इतर भागांत

इ० स० १८८४ सालचा.

१८; बंगाल इलाख्यांत ६; वायव्य प्रांतांत ३; मध्यप्रांतांत १; निजाम हैद्राबादेस १; व मद्रासइलाख्यांत ९; याप्रमाणें गिरण्यांची परिसंख्या प्रांतवार वांटली जाऊन, त्या बांधण्यास ६८,६७,०८६ पाऊंड, ह्मणजे सुमारें सात कोट रुपये खर्च आला. त्यांत एकंदर १९,२०,०९९ चाती, आणि १९,७२९ माग असून, त्यांत त्या मागील बारा महिन्यांत ९१,३०० टन कापूस खपला; आणि त्या सर्वांवर, सरासरीच्या मानानें, रोज ६२,८३६ मनुष्यांचें पोषण झालें.

बंगाल इलाख्यांतील देशी माग.

बंगाल इलाख्यांत हाताचें विणकर काम मुंबई प्रमाणेंच मागें पडल्यासारखें झालें आहे. तथापि, युरोपखंडांतून सुताचे गठ्ठे पुष्कळच आयात होतात, त्यावरून देशी मागांवर विणण्याचें काम बऱ्याच प्रमाणानें चालतें, असें वाटतें. मिडनापूर, नडिया, आणि बर्दवान, या ठिकाणीं हिंदी कोष्टी असून, ते अजून सुद्धां इकडील मागांवर पुष्कळ कापड काढतात. हा माल बहुत करून जाडा भरडा असतो. कारण, स्वस्ततेच्या संबंधानें ह्याला गिऱ्हाइकी पुष्कळ असते, व तो फार खपला जातो.

हिंदुस्थानांत बारीक विणीचें मुलाईम कापड फार थोड्या ठिकाणीं होतें. तथापि, जें होतें तें इतकें सुबक

वस्त्रालंकरणांत हिंदूंचें पाटव.

होतें कीं, तसें अन्यत्र कोठेंही पैदा होत नाहीं. युरोपखंडांतील गिरण्यांनीं, आणि इतर नानाविध कारखान्यांनीं, जरी इकडील हरतऱ्हेचा माल स्वस्तः केला आहे तरी, कापड, धातु, व लांकूडकाम, यांवरील नानाप्रकारचें अति सूक्ष्म, दुर्गाह्य, आणि मनोहर अशा नक्षीकामाचें हस्तपाटव, व सुरम्यकौशल्य, हीं कार्यकुशलधुरंधर गौरकायांस देखील अजून साधलीं नाहींत. अर्थात्च, हीं सर्व बहुत परिश्रमानें, व अति खर्चानें तयार होत असल्याकारणानें, त्यांस श्रीमंत, धनाढ्य, व राजे ह्यांशिवाय दुसरें गिऱ्हाईकच मिळण्याचा संभव नाहीं.

डाका येथील मलमल.

डाका येथें अति सूक्ष्म विणीचें असें मलमलीचें कापड तयार होतें. तें हरएक जातीचें, व जसें सांगावें त्या प्रकारचें, तेथील लोक तयार करितात. ह्या कापडाच्या सुबकपणाविषयीं सर्व जगभर प्रसिद्धी आहे. हें विणकर काम करणारे बहुतेक हिंदूच असून, ह्या कामांत त्यांचें हस्तचातुर्य फारच विकासाप्रत पावल्याचें दिसतें, व तें प्रत्येकाच्या अनुभवासही येतें. हे विणकरी ज्या हत्यारांचा उपयोग करतात, तीं कमीत कमी एकशें (१२६) सव्वीस असतात; यावरून त्यांच्या उद्योग वैदग्ध्याचें सहजींच अनुमान होईल. त्रिप्परा परगण्यांत

**सरई** येथें, व **नडिया** परगण्यांत **शांतिपूर** येथें, बारीक विणीचें कापड, पूर्वीपासूनच फार नामांकितपैकीं तयार होत असतें. हें कधीं कधीं अगदीं साधें तथापि सुबक व मुलाईम होत असून, कधीं कधीं त्याजवर सूक्ष्म नक्षी, आणि सुंदर कशिदाही काढितात; व त्या मुळें तें फारच शोभिवंत दिसतें.

मद्रास येथील मलमल.

**मद्रास** इलाख्यांत उत्तम **मलमलीचीं** व इतर उंची वस्त्राचीं प्रसिद्ध अशीं ठिकाणें ह्मटलीं ह्मणजे **अरणी**, **मच्छलीपट्टण**, **विजयापट्टण**, **नेलोर**, आणि **बंगलोर**, हीं होत. **मलबार** किनाऱ्यावर **नायर** जातीचे लोक नामांकितपैकीं मलमलीचें कापड विणतात. **मच्छलीपट्टण** येथें उत्तम प्रकारचें चीट तयार होतें. **विजयापट्टण** येथें "**पंजम्**" नांवाचें एकशेवीस धाग्याचें कापड तयार होत असून, **नेलोर** येथें **सालंपूर** जातीचें निळें कापड पैदा होतें.

मलमलीवरील भरगच्चीचें काम.

**मलमलीवर** कोठें कोठें रेशिमाची वेलबुट्टी काढून, फार सुरेख नक्षीचें काम करितात. केव्हां केव्हां ह्याजवर जरतारीचें काम करितात; किंवा कधीं कधीं सोन्याच्या भरजरी कामानेंच हें वस्त्र अलंकृत व सुशोभित करितात. मूळ कापडाची वीण फारच बारीक आणि सुरेख

असल्यामुळें, ह्याजवर जितकें भरगच्चींचें काम करावें तितकें तें फारच खुलतें, व अतीव शोभायमान दिसतें. अशा प्रकारचें सुवर्णरोप्यमिश्रित विणकरकाम **दिल्ली, पाटणा, डाका, सिंध,** आणि **कच्छ,** येथें होतें.

**मुंबई** इलाख्यांत कापडाचीं प्रख्यात अशीं ठिकाणें **अमदाबाद, भडोच, सुरत, पुणें, नाशीक, येवलें, सोलापूर, नगर,** व **धारवाड,** वगैरे होत. आणि **मध्यप्रांतांत चांदा, नागपूर,** व **हुसंगाबाद,** हीं होत. येथें विणण्याचे मोठमोठे माग असून, त्यांत नानाप्रकारचीं लुगडीं, उंची साड्या, जरीकांठी खण, रेशीमकांठी धोतरजोडे, भरजरीचे शेले, सुबक उपरणीं, किंमतीं पागोटीं, सुंदर कलाबतू, आणि मौल्यवान् किनखाप, वगैरे हरतऱ्हेचें सामान तयार होतें.

मुंबईतील कापडां-चीं प्रसिद्ध ठिकाणें.

रेशीम तयार करण्याचे देखील इकडे मोठमोठे माग, व कारखाने आहेत. **बंगाल इलाख्यांत** रेशीम उत्पन्न करण्यासाठीं **रेशमी** किडे पाळण्याचा मोठाच व्यवसाय असून, त्या किड्यांचें पोषण होण्यासाठीं तिकडे **तुतीच्या** झाडांचीही पुष्कळच लागवड होत चालली आहे. इकडे तयार झालेलें रेशीम **वायव्यप्रांत,** आणि **युरोपखंड,** इकडे कच्च्या अवस्थेंतच रवाना होत असून, **मुंबई-**

रेशीम व त्याचे कारखाने

च्या खपाकरितां **चीन** देशांतील **रेशीम** आयात होतें. **आसाम** व **ब्रह्मदेशांत** रेशमी कपड्यांचा आणि वस्त्रांचा सर्व साधारणच उपयोग होत असून, हें कापड घरांतील बायकामाणसेंच विणतात. हल्लीं थोड्याच वर्षांपूर्वी, **मुंबईस** एका वाफेच्या रेशमी गिरणीची स्थापना झाली. हींत **ब्रह्मी** लोकांच्या उपयोगाचीं नानाप्रकारचीं रेशमीं वस्त्रें तयार होतात. इ० स० १८८२–८३ सालीं, **हिंदुस्थानांतून** सुमारें ३०,६२,२८० रुपयांचा माल दूरदेशीं निर्गत झाला.

किनखाब.

उत्तम व नामांकित रेशमीवस्त्रें **पंजाब**, **सिंध**, **आग्रा**, **दक्षिणहैदराबाद**, **तंजावर**, **त्रिचनापल्ली**, **बनारस**, **मुर्शिदाबाद**, **अमदाबाद**, आणि **सुरत**, वगैरे ठिकाणीं होतात. या पैकीं उज्ज्वल आणि भरजडावाचे **किनखाब** फक्त बनारस, मुर्शिदाबाद, अमदाबाद, व **त्रिचनापल्ली** येथेंच तयार करितात.

मखमाल.

**दक्षिणेंतील** इतिहासप्रसिद्ध अशीं जीं प्राचीन राजधानीचीं शहरें **कलबुर्गे**, व **औरंगाबाद**, येथें भरजरीची, अप्रतीम नक्षीची, आणि तेजानें व रंगानें झक्क, अशी **मखमाल** तयार होत असून, तिचे नानातऱ्हेचे **दरबारचे** पोषाक,

हरएक प्रकारचे वस्त्रालंकार, विचित्र तंबू, आणि सुंदर छत्रें, वगैरे बनवितात.

छोगे व शाली.

नामांकित लोंकरीचे कपडे, आणि अमूल्य ऊर्णावस्त्रें, हीं **सिंध, पंजाब,** व **काश्मीर,** येथें होतात. प्रसिद्ध व सर्वश्रुत **छोगे** हे सदरहू ठिकाणींच तयार होत असून, ते **पतु** ह्मणजे उंटाच्या केंसाचे बनवितात. त्यांची कीर्ति आजकाल **इंग्लंडांत**ही पसरली असल्यामुळें, त्यांचा तिकडे लोक फार उपयोग करितात; व त्या कारणानें इकडल्या प्रमाणेंच ते तिकडे प्रचारांत आहेत. **काश्मीर**च्या **शाली** तर सर्वत्रच प्रसिद्ध आहेत. ह्या खुद्द **काश्मीरांत** अथवा **लुधियानें**त, किंवा **पंजाबांत** तयार होतात; व शालीकरितां मुद्दाम राखून ठेविलेलीं जीं **पशमिना** नांवाचीं बकरीं असतात, त्यांच्या लोंकरीपासून त्या बनवितात. ह्या बकऱ्यांचें मूलनिवासस्थान **हिमालयावरील पठार** होय.

भरजरीचीं ऊर्णावस्त्रें.

ह्या **शालींत** जरतरीचें व भरगच्चीचें काम करून, ती इतकी शोभायमान करितात कीं, ती एकदां कां पाहण्यांत आली ह्मणजे तिच्याकडे दोन घटिका पाहावेंसेंच वाटतें. ठिकठिकाणीं बारीक नक्षीची वेलबुट्टी काढून, तिच्या मनोहर रचनेंत लतासौन्दर्य प्रदर्शित केलेलें असतें. जागोजागीं जरतरीचें व भरगच्चीचें काम केलेलें

दृष्टीस पडतें. त्यांतच मधून मधून सोन्याच्या कोंदणांत पाणीदार मौक्तिकें बसविलेलीं असतात. दरम्यानच्या फटींत तेजोमय हिरकण्यांची योजना केलेलीं असते. आणि इतस्ततः हिरवागार पाच बसविलेला असून, बाजूनें अन्य जातीची जरतरी असल्यामुळें, तेजःपुंज अशा मौल्यवान् खड्यांचें शोभायमान कोंदण सर्वत्रच एकदम भासमान होऊं लागतें. मिळून, जिकडे पहावें तिकडे सर्व कांहीं प्रभामयच वाटतें. ह्यांत केवळ एकटे पटकारच आपलें हस्तपाटव, व निःसीमवृत्तिचातुर्य दाखवितात असें नाहीं. तर, त्यांच्यावर आणखी जास्त ताान करण्याकरितां सुवर्णकारही आपलें अप्रतीम कौशल्य, आणि शिल्पवैदग्ध्य प्रदर्शित करितात. व ह्या सर्वांवर केवळ आपलीच छाप बसावी या हेतूनें, जणु कायं ईर्षेस पेटूनच, रत्नकारही आपल्या व्यवसायाचें पूर्ण मर्म, व अनुपम लावण्य, मोठ्या शिताबीनें दाखवितातसें दिसतें.

रत्नखचित चादर.

अशा मासल्याची **रत्नखचित चादर**, पूर्वीं एकदां, सुमारें एक कोट रुपये खर्च करून, **गायकवाडसरकारांनीं** तयार करविली होती. ती अजूनही **बडोधास** त्यांच्या संग्रहीं आहे. ह्या **चादरी**विषयीं लिहितांना **सर ज्यॉर्ज बर्डवूड** असें ह्मणतात कीं:—

"It was composed entirely of inwrought pearl

and pracious stones, disposed in an arabesque fashion, and is said to have cost a kror of Rupees (say one million sterling). Although the richest stones were worked in it, the effect was most harmonious. When spread out in the sun, it seemed suffused with an iridescent bloom, as grateful to the eye as were the exquisite forms of its arabesques."

ही चादर इतस्ततः मोत्यांनीं भरलेली असून, तिच्या नांवाप्रमाणें ती खरोखरच रत्नखचित आहे. तसेंच तिच्यावर सुंदर प्रकारची मनोहर अशी वेलबुट्टी सर्वत्र काढलेली आहे. ह्यांतील सुवर्णाची कांति व तेज, उज्ज्वल मोत्यांचा चकचकाट, आणि रत्नखंडांची शुभ्र प्रभा, इत्यादि योगानें नयनोत्सवाचें साफल्य होतें. व त्यांतही सूर्यकिरणांचें तेज त्यांजवर पडलें ह्मणजे तर ती विचित्र प्रभा समंतात् भागांत फांकली जाऊन, कांहीं विलक्षण सौन्दर्य दृग्विषयीभूत होतें.

सत्रंज्या, गालीचे, व नमदे.

इकडे नानाप्रकारच्या किमती सत्रंज्या, हरतऱ्हेचे मुलाईम गालीचे, व अनेक जातींचे विचित्र नमदे सुद्धां तयार होतात. हीं सर्व मुख्यत्वेंकरून काश्मीर, पंजाब, सिंध, आग्रा, मिर्झापूर, जबलपूर, वारंगळ, मलबार, आणि मच्छलीपट्टण, येथें बनविण्यांत येतात. लाहोर, जबलपूर, मिर्झापूर, बनारस, आणि

**बंगलोर**, येथील तुरुंगांत हे नमदे पुष्कळच तयार होत असल्यामुळें, ते दूर देशीं रवाना होतात; व **इंग्लंडांत** ते, प्रत्येकास चारपासून पांच रुपयेपर्यंत, विकले जातात. **मखमालीचे** गालीचे, **बनारस** व **मुर्शिदाबाद** येथें तयार होत असून, **रेशमी** गालीचे **तंजावर** आणि **सालेम** येथें काढितात. गालीच्यांचें मूळ ठिकाण **इराण** व **तुर्कस्थान** असून, **मुसलमान** लोकांच्या आगमनाबरोबरच त्यांचा इकडे प्रचार झाल्याचें कळतें. इ० स० १८९१ सालीं, **लंडनमध्यें प्रदर्शन** झालें, त्यांत अत्युत्कृष्ठ **नमदे वारंगळचे** होते. हें प्राचीनकाळच्या **अन्ध्र** राजांच्या राजधानीचें शहर असून, तें **दक्षिणहैदराबादेच्या** पूर्वेस सुमारें चाळीस कोसावर आहे.

लोंकरीच्या गिरण्या.

**हिंदुस्थानांत** हल्लीं लोंकरीच्या गिरण्याही झाल्या असून, त्या **गुरुदासपूर** परगणा ( **पंजाब** ), **कानपूर** ( **वायव्य प्रांत** ), आणि **मुंबई**, येथें स्थापन झाल्या आहेत.

तागाचे कारखाने व खप.

तागाचे देशी माग अजूनही **बंगाल्यांत**, **पुर्णिया** आणि **दिनाजपूर** परगण्यांत, आहेत. तागाचे कपडे व गोणताट हे, **कोच**, **राजबंसी**, किंवा **पाली**, वगैरे जातीचे लोक विणतात. तागाचे यंत्राचे कारखाने

**कलकत्त्याच्या** आसपास, नदीच्या पलीकडे **हौरा** परगण्यांत, **ब्रह्मपुत्रा** नदीच्या वरच्या बाजूला, कांठाजवळ **सिराजगंज** येथें, **मुंबईस**, व **मद्रासेंत** आहेत. इ० स० १८८२।८३ सालीं, **हिंदुस्थानांत** एकंदर तागाच्या गिरण्या २१ एकवीस होत्या. यांपैकीं १९ एकोणीस **बंगाल इलाख्यांत** असून, १ एक (मुंबई) **कुलाब्यास**, आणि १ एक **मद्रास** इलाख्यांत **विजयापट्टण** परगण्यांत **चित्तविलास** येथें होती. ह्या कारखान्यांवर सदरहू सालीं, पुरूष, स्त्रिया, व मुलें मिळून, एकंदर ४७,८६८ मनुष्यांस धंदा मिळून, त्यांचा चरितार्थ चालत होता. **हिंदुस्थानांत** जितका म्हणून गोणताटाचा खप आहे, त्याचा सर्व पुरवठा **कलकत्त्याहूनच** होतो, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. इ० स० १८७७–७८ सालीं एकंदर ८,००,००,००० गोण तयार झाले. त्यांपैकीं ६०,००,००० गोण हातमागानें बनविलेले होते. सदरहू आठ कोटि गोणांपैकीं, पांच कोटि सत्तर लक्ष दूरदेशीं निर्गत झालें असून, बाकीचे दोन कोटि तीस लक्ष **वायव्यप्रांत**, मुख्यत्वेंकरून **पाटणा, कानपूर**, वगैरे ठिकाणीं, आणि **पंजाबांत लुधियान** वगैरे ठिकाणीं, रवाना झाले. जो माल दूरदेशीं (५,७०,००,००० ) निर्गत झाला, त्यापैकीं दोन कोटि पन्नास लक्ष बाहेर प्रदेशीं गेला असून, एक कोटी साठ लक्ष **मुंबईस**, एककोटि वीस लक्ष **ब्रह्मदेशांत**, आणि

चाळीस लक्ष इतर बंदरांत पाठविण्यांत आला. इ० स० १८८३ सालीं तर १०,४३,४१,७६२ गोण कलकत्त्याहून रवाना झाले. ह्यांपैकीं ९,९३,२३,५७३ दूर प्रदेशीं गेले असून, ४,५०,१८,१८९ गोण इतर बंदरांत पाठविले. एकंदर पैदा झालेले गोण १२,३२,१९,४७७ असून त्यांत १,६४,७८,६७७ गोण हातमागाचे होते.

कातड्याचे कारखाने.

कातड्याचे हिंदी कृतीचे कारखाने अयोध्या, वायव्यप्रांत, सुरत, मुंबई, वगैरे ठिकाणीं आहेत. कानपूरास तर कातड्याची गिरणी खुद्द सरकारच्या खर्चानेंच चालू आहे. येथें हरतऱ्हेचें घोड्याचें सामान आणि दुसऱ्या कातड्याच्या जिन्नसा तयार होतात, व त्या उत्तम प्रकारच्या असतात. कशिद्याच्या नानाविध चर्मवस्तु गुजराथ प्रांतांतही बनवितात.

कागदाचे कारखाने

थोड्या वर्षांपूर्वी ह्या देशांत कागद तयार करण्याचे जागोजागीं कारखाने असत. हे कागद फक्त टिकाऊ मात्र असत. सफाई, सौन्दर्य, व गुळगुळीतपणा, ह्या संबंधानें त्यांत कांहींच वर्णन करण्यासारिखें नव्हतें. मुंबई व कलकत्ता येथें कागदाच्या गिरण्या झाल्या कारणानें, त्या कागदाचा अगदींच लोप होत चालला आहे. हल्लीं पुणें येथेंही कागदाची नवीनच गिरणी झाली आहे.

हिंदुस्थानांतील जडावाचें काम.

हिरे, माणिकें, रत्नें, आणि इतर मौल्यवान् खडे, यांचे नानाप्रकारचे अलंकार, हरतऱ्हेचीं भूषणें, व अनेक जातीच्या आंगठ्या, **हिंदुस्थानां**त बनवितात. हे दागिने बहुतकरून सोन्याच्या कोंदणांत बसविलेले असून, ते फारच सुबक आणि विचित्र नक्षीनें तयार करितात. ह्यांत मोत्यांची देखील रेलचेल करून सोडतात. त्यामुळें त्यांस फारच रमणीयता व विशेष शोभा प्राप्त होते.

हा देश सुवर्णमयच असल्यामुळें, सोन्याच्या दागिन्यास तर इकडे पारावारच नाहीं. ते तयार करण्यांत कुशलसुवर्णकार आपली कर्तबगारी दाखवितात यांत कांहींच नवल नाहीं. परंतु **मध्यहिंदुस्थानां**तील व **हिमालया**वरील रानटीजाती देखील, या कामांत आपली थोडीबहुत प्रवीणता प्रदर्शित करतात.

सोन्याचे भरींव किंवा लाखेवरील दागिनेही इकडे तयार करतात. अथवा, त्याची लांब आणि बारीक तार काढून, त्याचे अप्रतीम अलंकार बनवितात. ही तार, सोनार लोक

सुवर्णाचें काम.

आपल्या कसबाच्या योगानें इतकी बारीक ओढतात कीं, एक तोळाभर सोन्याची २४०० फूट, किंवा सुमारें १६०० हात लांब तार निघते. नंतर ती गुंफून तिचें भरगच्चीचें अथवा जरतारीचें काम करितात. किंवा भरींव सुवर्णाच्या तुकड्याचें

तिकोनी, चतुष्कोनी, षट्कोनी, अथवा अष्टपैलू कोंदण करून, त्यांत अपरिमित व दीप्तिमान् खड्यांची योजना करितात. कोठें **पाच** तर कोठें **माणिक**, क्वचित् **हिरा** आणि क्वचित् **नीळ**, याप्रमाणें व्यवस्थित बसवून, त्याजवर शोभतील त्याप्रमाणानें, तुरळक तुरळक, किंवा भरगच्च असे, तेजःपुंज मोत्यें लावितात. तदनंतर ही सर्व रचना एखाद्या **रत्नखचित** किंवा सुवर्णपत्रालंकृत **जडावाच्या** कामांत, अति सूक्ष्म पटुतेनें व कल्पनाचातुर्यानें, गुंफून टाकितात. त्यामुळें, कान्तिसौंदर्याची एक तेजोमय मूसच ओंतली आहे कीं काय असें भासमान होऊन, कलावैदग्ध्याचें सकौतुकाश्चर्य वाटतें.

याविषयीं **बर्डवूड** साहेब असें लिहितात कीः—

"But nothing can exceed the skill, artistic feeling, and effectiveness with which gems are used in India both in jewellery proper and in the jewelled decoration of arms and jade."

सोनेरी मुलाम्याचीं, व रत्नखचित जडावाचीं उत्तम आणि नामांकित कामें, **काश्मीर**, **कटक**, व **त्रिचनापल्ली** येथें होतात.

रुप्याचें काम.

रुप्याचें बगरकारागिरीचें साधारण काम, सामान्यतः सर्व ठिकाणींच होतें. परंतु मुलाईमकाम ह्मटलें ह्मणजे, मोठमोठ्या शह-

राशिवाय अन्यत्र कोठेंही होत नाहीं. रुप्याचीं उत्तम प्रकारचीं भांडीं, व हरतऱ्हेचीं उपकरणीं, हीं मुख्यत्वेंकरून त्रिचनापल्ली, कटक, नाशीक, पुणें, कच्छ, आणि काश्मीर येथें तयार होतात. त्रिचानापल्ली येथें ज्या नानाविध वस्तु निर्माण करितात, त्या इंग्रज लोकांच्या आभरुचीस पात्र होतील अशा तऱ्हेच्याच केलेल्या असल्यामुळें, अनुपम कल्पकता, अथवा मुळची पद्धत, किंवा अस्सल नमुना सुटला जाऊन, त्यांत विलायती मिश्रण झाल्यासारखेंच भासतें. कटक येथें जें सुंदर नक्षीचें काम होतें, त्या मासल्याचेंच पूर्वी ग्रीस देशांत होत असून, तसें आज मितीसही माल्टा येथें होतें. कच्छसारखेंच लखनौ व डाका येथेंही काम होतें. काश्मीर देशांत जें मुलाम्याचें व रुप्याचें घडींव काम करण्यांत येतें, त्याविषयीं बर्डवूड साहेब असें लिहितात कीः—

Its airy shapes and exquisite tracery, graven through the guilding to the dead white silver below, softening the lustre of the gold to a pearly radiance, give a most charming effect to this refined and graceful work."

ताम्रपित्तल-भाजनें.

ग्रामसंस्थेच्या नेहेमींच्या उपयोगाचीं सर्व साधारण तांब्याचीं आणि पितळ्याचीं भांडीं, गांवचा तांबटच तयार करितो. परंतु उत्तम भांडीं ह्मटलीं ह्मणजे मोठ-

मोठ्या शहरांशिवाय अन्यत्र कोठेंच होत नाहींत. ताम्र-पितलाच्या भाजनसौंदर्याच्या संबंधानें श्रीक्षेत्र काशी, अमदाबाद, नाशीक, पुणें, मदुरा, आणि तंजावर, हीं ठिकाणें फारच सुप्रसिद्ध आहेत. इंडियाम्यूझिअम् नामक सर्व संग्रहालयांत, कूलु येथील बौद्धांच्या विवरांत सांपडलेलें एक फार प्राचीन पात्र ठविलेलें आहे. हें सुमारें पंधराशें वर्षांचें जुनें असून, त्याजवर सिद्धार्थ राजाच्या मोठ्या थाटाच्या स्वारीचें प्रदर्शन केलेलें आहे.

पंचरस धातु, व बिडाचें काम.

पंचरस धातूच्या, आणि बिडाच्याही, नानाप्रकारच्या वस्तु, हरतऱ्हेचीं पात्रें, व अनेक जातीच्या घंटा तयार करतात. पंचरस धातु ह्मटली ह्मणजे तांबें, कथिल, जस्त, व कधीं कधीं रुपें, आणि क्वचित् सोनें, वगैरे धातूंचें मिश्रण करून ती बनवितात. ह्या धातूच्या घंटांचा ध्वनी फार गंभीर आणि खणखणीत असतो. नाशीक येथं पंचवटींत नारो शंकरची सुप्रसिद्ध घांट असून, ती अतिशय मोठी आहे. पंचरस धातूच्या पात्रावर रुप्याचा आणि सोन्याचा मुलामाही देतात. हीं व दुसरीं बिडाचीं कामें, मोरादाबाद ( वायव्यप्रांत ), भिलवाडा ( संस्थान उदयपूर ), पूर्णिया ( बंगाल ), व मुर्शिदाबाद, येथं होतात. तथापि, दिवसानुदिवस विलायती मालाचा जास्त खप होऊं लागल्यामुळें, हिंदी कळा व हिंदी माल

यांचा उत्तरोत्तर ऱ्हासच होत चालला आहे, असें म्हटलें तरी चालेल.

लोहकर्म व शिकल काम,

बहुतेक प्रत्येक गांवांत, किंवा दहापांच गांवांमिळून एखाद्या खेड्यांत, लोहाराचें दुकान हें असावयाचेंच. कारण कीं, आमच्या देशांत कृषिकर्मावर बहुतकरून सर्वांचा उदरनिर्वाह असल्यामुळें, तत्संबंधींची सामग्री सज्ज ठेवण्यासाठीं, लोहाराची खरी अवश्यकता असते. त्यामुळें लोहाराशिवाय अगदीं चालतच नाहीं आतां, हा लोहार केवळ लोहकर्म करण्यांतच निष्णात असतो असें नाहीं. ह्याला थोडें बहुत सुतारकाम ही येत असतें. त्यायोगानें शेतीचीं आउतें तयार करणें, त्यांची दुरुस्ती व मोडतोड पाहणें, वगैरे गांवांतील प्रजाजनसमूहाचें जरूर तेवढें सर्व काम हाच करतो; आणि तेणेंकरून गांवची उणीव तो कशीबशी पुरी पाडतो. तथापि, मोठमोठ्या आणि प्राचीन शहरांत, लोहकाम करणारे नामांकित कारागीर व शिल्पकार असतात. शिकलगारींत, हिंदुस्थानासारखा नमुना पृथ्वीवर अन्यत्र कोठेंही होत नाहीं.

इकडील तलवारीच्या पाण्याविषयीं ख्याति.

इकडील तलवारीच्या पातींचें पाणी विलक्षण तेजदार असून, तिच्या मुठीला उत्तम प्रकारच्या नक्षीचें व जडावाचें काम केलेलें असतें. कधीं कधीं तिजवरील

कांहीं भागावर नामधेय आणि तिथि कोरून काढितात; किंवा क्वचित् प्रसंगीं मृगयास्थळांचेंही निदर्शन करितात. तोडच्याच्या बंदुका व इतर अग्निशस्त्रें पंजाब, मोंगीर ( बंगाल ), सिंध, आणि विजयानगर ( मद्रास ), वगैरे ठिकाणीं अजूनही तयार करतात. अहमदनगर येथें चांगले भाले होतात ह्मणून प्रसिद्धि आहे.

कशाबतूसारखें चिलखताचें बारीक काम, काश्मीर, राजपुताना, आणि कच्छ, येथें होतें.

शस्त्रास्त्रावराल बदरी क्रिया.

बेदरी काम मख्यत्वेंकरून काश्मीर, सियालकोट ( पंजाब ), गुजराथ, आणि बेदर ( निजाम इलाखा ), येथें होतें. बेदर हें प्राचीन राजधानीचें शहर असून, त्या नांवावरून च तेथें होणाऱ्या हेमरस क्रियेस 'बेदरी' क्रिया असें नांव पडलें आहे.

मृत्तिकेचीं नामांकित पात्रें व इतर वस्तु, मुलतान, लाहोर ( पंजाब ), सयदपूर, बुब्री, हैदराबाद, कराची, तत्त, हाल ( सिंध ), स्कूल ऑफ आर्ट ह्मणजे आद्योगिक शिक्षणशाळा ( मुंबई ), मदूरा ( मद्रास ), आणि बंगलोर, वगैरे ठिकाणीं होतात. मातीचीं सरख आणि हुबेहूब चित्र बंगाल्यांत कृष्णागर येथ, आणि लखनौ व पुणें, या ठिकाणीं, मुख्यत्वेंकरून तयार करितात.

मृद्भांडक्रिया.

दारुतक्षण, व

हिंदुस्थानांतील लांकडाचें कोरींव काम फार प्राचीनकाळापासूनच प्रचारांत असल्याचें दिसतें. बौद्धांच्या ज्या प्राचीन अवशिष्ट दगडी इमारती कोठेंकाठें दिसतात, त्यांतील खोदकाम या पुरातन लांकडी साच्यावरूनच उचलल्याचें समजून येतें. हिंदु लोकांप्रमाणें ब्रह्मी लोकांस देखील तक्षणशिल्पाची अभिरुचि आहे असें दिसतें. कोरींव कामाच्या विशेष उपयोगाचें असें लांकूड म्हटलें म्हणजे चंदन, फणस, किंवा शिसव, होय. सांप्रतकाळीं फार उत्तम असें कोरींव काम सुरत, व अमदाबाद, येथें होतें.

खचित क्रिया.

लांकडांवरील व हस्तिदंतावरील खचितकाम हिंदुस्थानांत नवीनच होऊं लागलें आहे. ही चमत्कारिक व अपूर्व टूम, शिराज येथून गेल्या शतकांतच इकडे आली असल्याविषयीं कल्पना आहे. वायव्य प्रांतांत मैनपुरींत लांकडांच्या पेट्यांवर पितळ्याचें खचितकाम तयार करतात. हस्तिदंताचें कोरींव काम अमृतसर, बनारस, मुर्शिदाबाद, विजयापट्टण, आणि त्रावणकोर, येथें पाहिजेल त्या प्रकारचें, व इच्छित नमुन्या बरहुकूम, तयार होतें.

---

1 But Indian wood carving is an art of very great antiquity.

(Indian Empire P. 607).

# भाग ३० वा.

## आर्यकला.

### वास्तुविद्या व यंत्रकला.

वास्तुविद्या.

अग्निपुराणांत, गृहदेवालयादि रचना, आणि तन्निर्माणचातुर्य, यांविषयीं कांहीं भागांत वर्णन आहे. रथकाराच्या मार्गदर्शनाकरितां शंख नामक विद्वमणीनें रथसूत्र, व वास्तुविद्या हीं केलीं आहेत. व यानेंच कात्यायनावर ही टीका केल्याचें दिसतें. रंगभूमिरचनेविषयीं नटसूत्रांत उल्लेख केला आहे. आणि विश्वकर्मप्रकाश, व विश्वकर्मीय शिल्प, यांविषयीं राजेन्द्रलाल मित्राचे जे स्फूट[1] लेख आहेत, त्यांत बरीच माहिती दिली आहे.

अर्वाचीन भवन सौन्दर्य.

मागें सांगितलेल्या कोरींव लेण्याशिवाय, अगदीं प्राचीन कालचे भव्य प्रासाद, आणि विस्तीर्ण मंदिरें हल्लीं कोठेंही दृष्टीस पडत नाहींत. तथापि, चारशें पांचशें वर्षांच्या

1 See Rájendra Lal mitra. Notices of Sanskrit MSS. II. 17, 142.

अलीकडील कांहीं कामें, अजूनही हिंदुस्थानांत क्वचित् क्वचित् आढळत असून त्यांत रचनासौन्दर्य शिल्पविलास, लावण्यसौष्ठव, अनुपमश्री, आणि अप्रतीम हस्तकौशल्य दिसून येतें. ग्वाल्हेर येथील शिल्पश्रीनें विभूषित असा प्रासाद, श्रीक्षेत्र काशी येथील पुरातन देवालयें, अबूपहाडावरील जैन भवनें, नाशिक येथील पंचवटींतील सुरम्य स्थळें, वांईतील सुरेख आणि अप्रतीम मंदिरें, प्रसिद्ध व जगद्विख्यात नाना फडणवीस यांनीं बांधलेलें मेणवली येथील रमणीय व टुमदार घाट आणि प्रशंसनीय देवालयें, पुणें येथील सार्वभौम पेशवाईंतील प्रध्वस्त झालेला शनवारचा राजवाडा, बुधवारचा नामांकित असा प्रचंड व सर्वांच्या डोळ्यांत भरणारा वाडा, विश्रामबाग, बेलबाग, आणि पर्वती, श्रीक्षेत्र करवीर (कोल्हापूर) येथील देवीचें देवालय, व दक्षिण हिंदुस्थानांतील अनेक भवनें, हीं खरेखर प्रेक्षणीय आहेत. कांहीं कांहीं ठिकाणीं महमदीय शिल्पवैचित्र्याचें थोडें बहुत अनुकरण केल्याचें दिसतें. तथापि हिंदूंची स्वतंत्र कल्पना व अपूर्व रचना, त्यांची कल्पना आणि वैभवश्री, हीं सर्वत्र दिसून येतात. आग्रा दिल्ली, अमदाबाद, विजापूर, वगैरे ठिकाणीं मुसलमानी अमदानींत बांधलेलीं दिव्य मंदिरें, व सुशोभित आणि भव्य मशिदी, अजून देखील दृष्टीस पडतात. ह्या सर्वांत ताजमहालच्या इमारतींत जें कांहीं नक्षीचें

काम व अप्रतीम सौंदर्य ओंतलेलें सांपडों, तसें कचित्च अन्य ठिकाणीं आढळतें. ही सर्व इमारत संगमरवरी दगडाची असून त्यांजवर सर्व कुराण खोदलेलें आहे. आग्रा येथें नि[illegible] पांढऱ्या [illegible] मोतीमशीद नांवाची एक इमारत आहे. तींत [illegible] जुमा मशीद आहे. ह्या सर्व अप्रतीम असून त्यांचें रचनावैचित्र्य फारच मनोहर आहे.

## गंधद्रव्यक्रिया.

गंधद्रव्यक्रिया.

गंधद्रव्यें तयार करण्याच्या संबंधानें स्वतंत्र सूत्रांतच विवेचन केल्याचें दिसतें. भाष्य कालाच्या वेळीं या विषयावर निराळींच सूत्रें होऊन त्यांत हीं द्रव्यें कशीं बनवावीं याविषयीं पृथक् मीमांसा आहे. [illegible] भाष्य याच वर्गांतील होय.

आमचे हिंदी लोक अत्तराचे मोठे षोकी आहेत. ते नानाप्रकारच्या फुलांचीं अत्तरें काढितात. राजेरजवाडे, श्रीमंत, आणि षोकी लोक अत्तराचा, व इतर सुगंधि द्रव्याचा पुष्कळ उपयोग करितात.

अत्तरें अनेक प्रकारचीं आहेत. त्यांपैकीं, इस्तंबूल, गुलाब, मोतिया, पाच, हिना, केवडा, बकुळी, दवणा, अंबर, कस्तुरी, केशर, खस, चंदन, इत्यादि मुख्य होत. अत्तरें काढण्याची मोठी मेहेनत व खटपट आहे.

इस्तंबूल ह्मणून केवळ गुलाबाचा अर्कच असतो; तो सर्वांत उत्तम होय. हा फारच महाग असतो, व तो कुस्तंतुनियेंत पैदा होतो. ह्याची केवळ सोन्याच्या भावाप्रमाणें किंमत असते, आणि ज्या मानानें तो उंची असतो, त्या मानानें त्याला दर तोळ्यास दहा पासून पंचवीस रुपयेपर्यंत किंमत पडते.

भरतखंडांत सांप्रतकाळीं देखील, पूर्वीप्रमाणेंच अत्तराचे कारखाने पुष्कळ ठिकाणीं आहेत.

## पाकशास्त्र.

पाकशास्त्र.

पाकनिष्पत्तीच्या संबंधानें हिंदूंची कीर्ति फार प्राचीन कालापासून आहे. पुराण काळचे भीमपाक आणि नलपाक हे आजमितीसही लहान मुलांबाळांच्यासुद्धां कर्णरंध्रांत दुमदुमत

---

1 "The art of perfumery appears to have been already taught in a special Sùtra at the time of the Bhâshya."

(History of Indian Literature. P. 175).

"The skill of the Indians, * * * in the preparation of essences, and in all manner of technical arts, has from early times enjoyed a world-wide celebrity: and for these subjects also, we have the names of various treatises and monographs."

(H. I. L. P. 275).

आहेत. या विषयावर देखील प्राचीन ग्रंथ आहेत. पाकनिष्पत्ति करण्यांत कुशलता असणें ह्मणजे पूर्वी मोठेंच भूषण समजण्यांत येत असे.

खाद्यपदार्थांत पक्वान्नें व पक्वान्नेतर, यांचा समावेश होतो. पक्वान्नें तयार करण्यास मुख्यत्वेंकरून तूप आणि साखर यांची अवश्यकता असते, आणि पक्वान्नेतरांत तिखट, मीठ, व तुरट, आंबट, आणि कडु, इत्यादि पदार्थांची जरूर लागते.

पक्वान्नें नानाप्रकारचीं आहेत. त्यांत मुख्य ह्मटलीं ह्मणजे घिवर, मोतीचूर, बुंदी, साखरभात, श्रीखंड, जिलबी, बासुंदी इत्यादि होत. ह्यांच्या खालोखालचीं पक्वान्नें तर अनंत आहेत.

पक्वान्नेतर पदार्थ हे तिक्त, कटु, लवण, व आम्ल मिश्रित असल्याकारणानें, ते नानाप्रकारचे व असंख्य प्रमाणानें तयार करितां येतात.

## द्यूतचातुर्य व इतर कला.

द्यूताच्या संबंधानं देखील शास्त्रीय विवेचन केल्याचे

1 "Mention is likewise made of writings on cookery and every kind of requirement of domestic life, as dress, ornaments, the table ;"

(History of Indian Literature. P. 275).

द्यूतादिकला.

संस्कृत ग्रंथांत दृष्टीस पडते. शब्द-कल्पद्रुमांत एकंदर चौसष्ट कलाविषयीं सविस्तर हकीकत दिलेली आहे; आणि ह्या चौसष्ट-कला कोणत्या, तें चवथ्या पुस्तकाच्या विसाव्या भागांत सांगितलें आहे. सबब त्याबद्दल आतां जास्त ऊहापोह न करितां, प्रोफेसर वेबरचें हिंदुकलांविषयीं एकंदर काय मत आहे तें थोडक्यांत देऊन, हा भाग पुरा करितों. ते ह्मणतात कीं:—

"The skill of the Indians in the production of delicate woven fabrics, in the mixing of colours, the working of metals and precious stones, the preparation of-essences, and in all manner of technical arts, has from early times enjoyed a world-wide celebrity: and for these subjects also, we have the names of various treatises and monographs. Mention is likewise made of writings an cookery and every kind of requirement of domestic life, as dress, ornaments, the table; on games of every description, dice, for example;"

(History of Indian Literature by
Weber. P. P. 21, 275).

---

१ पान २१३ पहा.

# भाग ३१ वा.

## आर्यकला.

### लेखनकला.

लेखनकला.

उपयुक्त अशा बहुतेक कलांविषयीं मागील भागांत थोडें बहुत विवेचन केलें असून, आतां फक्त लेखनकलेविषयींच दोन शब्द सांगणें राहिले आहेत. ही कला किती उपयोगाची आहे, व ही नसती तर जगाची केवढी मोठी हानि होऊन, सुधारणेचें पाऊल किती मागें पडलें असतें याविषयीं प्रत्येक सुजाण व सुशिक्षित मनुष्याला चांगली कल्पना होण्यासारखी आहे. सबब त्यापासून होणाऱ्या फायद्याबद्दल जास्त विवेचन न करितां, तत्संबंधीं उदगमाविषयीं उपलब्ध असलेल्या माहितीवरून चार ओळी यथावकाश लिहितों.

तिचा उद्गम.

ज्याप्रमाणें इतर शास्त्रीय विषयांत आणि कला कलापांत, आमचे आर्यलोक फार शोधक आणि उत्पादक होते, त्याचप्रमाणें आपले विचार लेखनद्वारा चिरकाळ राहण्यासाठीं,

हरएक प्रकारें युक्ती काढण्याच्या कामीं देखील, ते अग्रेसरच होते, असें ह्मणण्यास बिलकुल हरकत नाहीं.

आतां ही लेखनकला प्रथमतः आर्यांनींच शोधून काढिली असें प्रतिपादन करण्यास काय आधार आहे, किंवा तें खरे मानण्यास काय प्रमाण आहे, असें कोणी विचारील तर, त्याला श्रुतिस्मृत्यादि ग्रंथसमुहाकडे बोट दाखविलें, ह्मणजे त्याची जिज्ञासा परिपूर्ण होण्यासारखी आहे. मात्र तो शोधक आणि परीक्षक असून, दुराग्रही नसला पाहिजे.

ज्या आर्य लोकांनीं हरएक प्रकारच्या बाबतींत सर्व प्रकारें शोध केले, त्यांना सर्वोपयोगी लेखनकला शोधून काढण्याच्या कामीं कांहींच अक्कल लढविली नसेल, अथवा

---

१ याविषयीं गाल्डस्टकरनें पाणिनीवर जो उत्तम लेख लिहिला आहे, तो खरोखर समग्र वाचण्यासारिखा आहे.

2 "The inference to be drawn from these premises is obvious. It seems to derive some corroboration from collateral fact. The Vedik *writings* from immemorial times being communicated by the teacher to his pupil orally."

"There were authorities, consequently before Pànini's time, who maintained the doctrine that the hymns were revealed-not to the sense of hearing, but to the sense of sight."

(Theoder Goldstucker on Panini.
P. P. 65/64.)

ही लेखनयुक्ति त्यांच्या कुशाग्रबुद्धीच्या अन्वेषणखलां-तून अजिबात निसटून गेली असेल, असें प्रथमदर्शनीं तरी बिलकुल अनुमान होत नाहीं. कारण, ही लेखनविद्या नसली म्हणजे ठिकठिकाणीं अडचण येऊं पाहते, व विद्याभिनिवेशाचा प्रवाह अगदींच बंद पडतो. आणि जर आमचा हा बुद्धिवैभवनिर्झर एकसारखा सुरूच आहे, तर त्याचा चाललेला सतत प्रवाह धारण करण्यास, कांहीं तरी प्रचंड साठवण केलें पाहिजे; अथवा त्याचें प्रस्रवण होण्यास नियमित मार्ग तरी खुला करून दिला पाहिजे. कारण, तो बलवत्तर असल्याकारणानें निरुद्ध किंवा कुंठित होणें तर अगदीं असंभवनीयच आहे.

---

1 "No one, I believe, will easily imagine a people in such a state of civilization unacquainted with the art of writing, though no mention of this art be made in the hymns to the gods. And is it really plausible that even 600 or 700 years later, the greatest grammarion of India composed a most artificial and most scientific system of grammer, utterly ignorant of the simplest tool which might have assited him in his work. Should it be possible to realize an advanced stage of social development without a knowledge of writing, then it is needless, of course, to refer to the arts, sciences, measures, and coins mentioned in the Sutra's of Panini."

(Theoder Gold stucker on Panini P. P. 15/16).

लेखनकलेच्या उद्गमाचीं कारणें.

आतां, आमच्या आर्यांच्या प्रथमावस्थेंतील स्थिति याच मासल्याची होती. प्रथमतः त्यांना जी जी ह्मणून स्फूर्ति झाली; व हें सृष्टिवैभव पाहून त्यांस जो कांहीं आनंद झाला, अथवा आश्चर्य वाटलें; किंवा तत्संबंधीं त्यांनीं जे जे ह्मणून उद्गार काढिले; ते ते सर्व स्मृतिद्वारा, ह्मणजे स्मरणशक्तीच्या योगानें, त्यांनीं आपल्या शिरःकमलांत सांठवून ठेविले. तदनंतर, उत्तरोत्तर त्यांची अभिवृद्धि होऊन, जशी जशी त्यांच्या ज्ञानाची जास्त भर पडूं लागली, तसतसें तें सांठवण संकुल झालें; आणि त्या कारणानेंच सदरहू सांठवणाचें नुकसान न होतां, हा बुद्धिनिर्झर ज्या ज्या उपायांनीं कायम व चिरकाल राहील, त्या त्या उपायांचें अवलंबन करणें अवश्य पडलें; व त्यासाठीं एक निराळीच दिशा पाहणेंही भाग झालें. इंग्रजींत एक अशी ह्मण आहे कीं, "अवश्यकता पडली म्हणजे आपोआपच कल्पना सुचते." त्याप्रमाणेंच, स्मरणशक्तीचें सीमोल्लंघन होऊन, नुसत्या घोंकण्यानें निर्वाह लागत नाहीं असें ज्यावेळीं आमच्या आर्यांस वाटलें, त्यावेळीं त्यांच्य मनांत ह्या लेखनविद्येसंबंधीं प्रादुर्भाव लागलींच उत्पन्न

---

1 Necessity is the mother of invention.

' ——— " [illegible] कल्पनेचें बीज किंवा उगमस्थानच होय."

होऊन, ते तिच्या शोधास शनैः शनैः प्रवृत्त झाले असावे; व पुढें सांकेतिक चिन्हांनीं आपला अडलेला कार्यभाग करून घेण्याची लागलीच प्रवृत्ति पडली असावी, अशी कल्पना आहे. आतां, ह्या सांकेतिक चिन्हांचा उपयोग करण्याचें ठरल्यावर ज्या द्रव्यांच्या योगानें सदरहू ठरींव संज्ञा एकमेकांस समजण्यास सुगम होईल, अशीं द्रव्यें उपलब्ध होण्यास त्या प्राथमिककालीं मोठीच अडचण पडली असेल; व त्या कारणानेंच मूळच्या स्थितींत असलेल्या द्रव्यांवरच कांहीं कालपर्यंत आपली गरज भागविणें अगदीं अवश्यकतेचें झालें असावें. कारण, त्यावेळीं तसें केल्याशिवाय दुसरें गत्यंतरच नव्हतें. आणि त्यामुळेंच फार पुराणकाळचे लेख हे भूर्जपत्र, तालपत्र, किंवा शिला, इत्यादि साधनांवरच बहुतकरून लिहिलेले सांपडतात.

आति पुराण शिलालेख.

उपलब्ध असलेल्या शिलालेखांत अतिप्राचीन शिलालेख ह्मटला म्हणजे **विराट** नगरच्या टेंकडीवर **बर्ट** साहेबांस सांपडलेला होय. हा लेख प्रथमतः, इ० स० १०२२ सालीं **महंमदानें** जुन्या **विराट** शहरावर स्वारी करून, **नारायणपूर** गांवांतील **नारायण देवाचा** ज्यावेळीं विध्वंस केला, त्यावेळीं सांपडला. सदरहू लेखावरून तें **नारायणाचें** देवालय, व तो शिलालेख, अशीं

चाळीस हजार वर्षांपूर्वींची असल्याचें सिद्ध होतें, असें कांहीं पाश्चात्य विद्वानांचें मत[1] आहे.

ऋग्वेद व यजुः संहितेंतील लेखन क्रियेचा अंतर्भाव.

पद्यांतील अक्षरें, या अर्थानेंच अक्षर या शब्दाचा उपयोग ऋग्वेदांत[2] केला असून, यजुः[3]-संहितेंत देखील त्याच अर्थानें, ह्मणजे लेखनक्रियेचा उद्बोध व्हावा असा हेतु मनांत आणूनच, त्याचा उपयोग केल्याचें दिसतें. "क्षर" न होणारें तें "अक्षर". ह्मणजे नाश न पावणारें तें अक्षर, असा धात्वर्थ मनांत आणूनच त्या शब्दाचा उपयोग केला आहे. कारण, "मुखोद्गत" किंवा "आलि-

1 The Buddista Period map, or General Cunningham's Ancient Geography of India.

म. स्थ.

2 "In the Errata to the first German edition it was pointed out, on the authority of a communication received from Professor Aufrecht, that Akshara is twice used in the Rik of the 'measuring of speech', viz. I. 164. 24 (47), and IX 13. 3, and consequently may there mean 'Syllable."

(History of Indian Literature. P. 16).

3 "The connecting link between this primary signification and the meaning 'Syllable', which is first met with in the Samhitâ of the Yajus, might perhaps be the idea of writing, the latter being the making imperishable, as it were, of otherwise fleeting and evanescent words and syllables (?)"

खित " पदें, अथवा त्यांतील अक्षरें, हीं कालांतरानें स्मृतींतून नाहींशीं होणारीं आहेत; सबब तीं लेखनद्वारा "अक्षर" ह्मणजे अमर करावीं, इतक्याच अभिप्रायानें त्यांची अन्वर्थ योजना झालीं असावीं.

सूत्रांवरून लेखनकलेचें अंतः- प्रमाण.

ऋग्वेदांतील गृह्यसूत्रांत, आणि यजुर्वेदांतील मधुकांडांत, सूत्र शब्दाचा उपयोग केल्याचें आढळतें. तसेंच पाणिनींत देखील " सूत्र " व " ग्रंथ " हे

१ थीओडर गोल्डस्टकर यांचें असें ह्मणणें आहे कीं, संस्कृतांतील कित्येक शब्दांवरूनच आर्यांची लेखनकला अतिप्राचीन असल्याचें सिद्ध होतें. उदाहरणार्थ लिपिकार, काम्येष्टिकांड, पत्र, पटल, सूत्र, ग्रंथ, वर्ण, अक्षर, अदर्शनं लोपः, इत्यादि सर्व शब्द लेखनक्रियेचेच केवळ व्यंजक होत.

(Goldstucker on Panini. P. P. 17-20 21-27-34-43-60-65-67).

2 "The word Sùtra in the above sense occurs first in the Madhukànd, one of the latest supplements to the Bráhmana of White Yajus, next in the two Grihya Sutràs of the Rik, and finally in Pánini. It means ' thread ' ' band ', cf Lat. Suere. Would it be correct to regard it as an expression analogous to the German band (volume) ? If so, the term would have to be understood of the fastening together of the leaves, and would necessarily presuppose the existence of writing (in the same way, perhaps, as Grantha does, a term first occuring in Panini) ? "

शब्द दिसून येतात. आणि सदरहू दोन्ही शब्दांवरून लेखनक्रियाच ध्वनित होते. आतां, प्रत्यक्ष अनुभवावरून देखील हें सर्वांसच महशूर आहे कीं, आमचे पूर्वज आर्यलोक हे लिहिण्याच्या कामांत वृक्षपत्रांचा उपयोग हम्मेश करीत असत; आणि तीं अस्ताव्यस्त पडूं नयेत ह्मणून सूत्रानें सर्व एकत्र करून, त्यांचा ग्रंथ[१] बांधून ठेवीत. व असे ग्रंथ अजूनही आपल्या दृष्टीस पडतात. त्यावरून आणि प्रथमारंभीं निर्दिष्ट केलेल्या शिलालेखावरून, आर्यलेखनकलेचें प्राचीनत्व कोणाच्याही ध्यानांत आल्यावांचून राहणार नाहीं.

मनुस्मृतींत तर ह्या लेखनक्रियेचा उल्लेख अगदीं स्पष्टच[२] केला आहे. ऋणविमोचनासंबंधीं विवेचन करीत असतां, हा आद्य स्मृतिकार असें लिहितो कीं, 'ज्याला ऋण फेडण्याचें सामर्थ्य नाहीं, त्यानें पुनश्च लेखीदस्तैवज धनकोस करून द्यावा.' ह्यावरून मनुस्मृती-

मनुस्मृतीवरून लेखनकलेचें प्राचीनत्व.

1 "Goldstücker ( Pànini, 1860, P. 26 ff ) contends that the word Sútra and Grantha must absolutely be connected with writing."

(Weber. H. I. Literature).

२ ऋणंदातुमशक्तोयः कर्तुमिच्छेत् पुनः क्रियाम् ।
सदत्वा निर्जितां वृद्धिं करणं परिवर्तयेत् ॥ १५४ ॥

( मनुस्मृति. अ. ८ )

( पुढें चालू )

कालांतर तर हा लेखीव्यवहार चांगलाच प्रचारांत होता, असें सहजीं लक्षांत येईल.

आतां, **पाणिनीचा** काल इसवी सनापूर्वी ७०० वर्षें असून, **मनु**[1] हा इ० स० पूर्वी १००० वर्षें झाला होता; व **गृह्यसूत्रें**, आणि **श्रौतसूत्रें**, यांचा काल इ० स० पूर्वी सुमारें[2] १९०० वर्षें होता. तेव्हां, सदरीं निर्दिष्ट

( मागील पृष्ठावरून पुढें चालू )

यो धनदानासामर्थ्यात पुनर्लेख्यादि क्रियां कर्तुमिच्छेत्स सत्यतया आत्मसात् रुतां वृद्धिं दत्वा लेख्यं पुनः कुर्यात् ॥

॥ कुल्लूकभट्ट ॥

अर्थेऽपव्ययमानंतु " करणेन " विभावितम् ॥ ५१ ॥
अभियोक्तादिशेद्देश्यं " करणं " वान्युदादिशेत् ॥ ५२ ॥

( मनुस्मृति. अ. ८ )

1 "On a combination of these data, we may perhaps be allowed to fix the age of the supposed Manu, very loosely at some time about half way between Alexander ( in the fourth century before Christ), and the Vedas [in the fourteenth century]."

"This would make the auther of the Code live about 900 years before Christ."

[Elphinstone's History of India].

2 * * * "The Vedic literature in its three well-defined periods, the Mantra, Bráhmana, and Sutra periods, goes back to at least a thousand years before our era."

[What can India teach us ? By Maxmuller].
Vide also Orion by B. G. Tilak. P. 208.

केलेल्या सर्व प्रमाणांवरून, **भारतीयलेखनकला** इसवी सनापूर्वी निदान दोन तीन २०००।३००० हजार वर्षांवर प्रचारांत होती, असें सिद्ध होतें.

आर्य लेखनकला फार प्राचीन असल्याविषयीं नूतन शोध.

**मद्रास** इलाख्यांत **कृष्णा** परगण्यांत, जे कांहीं शिलालेख नवीन शोध केल्यांत मिळाले आहेत, त्यावरून विद्वन्माणि **डॉक्तर बुल्हर**[1] यांचा असा अभिप्राय झाला आहे कीं, **चंद्रगुप्त** राजा **पाटलीपुत्र** येथील गादीवर बसण्यापूर्वी देखील अनेक शतकें, सदरहू लेखनकला **भरतखंडांत** चांगली प्रचारांत होती. आतां, **चंद्रगुप्त** हा इ० स० पूर्वी ३९० वर्षांच्या सुमारास राज्य करीत होता. त्यापूर्वीही अनेक शतकें **हिंदूंना** लेखनकलेचें चागलें परिज्ञान होतें. ह्यावरून इसवीसनापूर्वी सुमारें नऊ दहा शतकें, किंबहुना अधिकही, ती लेखनकला आपल्या **हिंदुस्थानांत** प्रचारांत असल्याचें चांगलें सिद्ध होतें. आणि **बेर्ट** साहेबास सांपडलेल्या शिलालेखावरून

1 "Dr. Bühler belives that the art of writing had been practised in India for centuries 'before the accession of Chandragupta to the throne of Pàtali-Putra', or in other words before the time of Alexandder the Great."

[T. I. 15/6/92].

2 General Cunningham's ancient Geography of India.

तर, ही कला चाळीस हजार ४०,००० वर्षांपेक्षां देखील ज्यास्त प्राचीन असल्याचें ठरतें.

भरतखंडांतून पाश्चिमात्य देशांत लेखन कलेचें गमन.

सदरहू प्रमाणांवरून लेखनकलेचा उद्भव या भरतखंडांतच झाला असून, येथूनच ती विद्या पाश्चिमदिशेकडे प्रसृत झाल्याचें दिसतें. सीरिया, एशियामायनर, आणि ईजिप्त किंवा मिसरदेश, या ठिकाणीं लेखनक्रियेचा बराच प्रचार असून, फिनिशियन लोकांच्या द्वारेंच ही विद्या एशियामायनर[1] मधून ग्रीस देशांतील आयोनियेन[2] लोकांस प्रथम प्राप्त झाली. (इ० स० पूर्वी ६१०–५४७). कदाचित् मिसरदेशाचा स्वतंत्रही शोध असेल.

तथापि, मोक्षमुलर[3] प्रभृतींचे असें मत आहे कीं,

1 "The whole of this incipient literary activity belonged to Asia Minor." * * *

2 "We can well understand that the Phinicians should have taught the Ionians in Asia Minor a knowledge of the alphabet partly for commercial purposes, *i. e*, for making contracts, partly for enabling them to use those useful little sheets, called Periplus, or circumnavigations, which at that time were as precious to sailors as maps were to the adventurous Seamen of the Middle ages."

[What can India teach us ?
By Professor Maxmuller]

3 "Here then we have the first fact, viz. that

( पुढें चालू )

तत्संबंधीं कांहीं पाश्चात्य पंडितांचें मत.

हिंदुस्थानांत इ० स० पू० तिसऱ्या शतकाच्या अगोदर, लेखनकला बिलकुल कोणास देखील माहीत नव्हती; व ती त्यांस शेमी लोकांपासून प्राप्त झाली आहे. परंतु हें त्यांचें ह्मणणें अगदींच सयुक्तिक दिसत नाहीं; आणि वर जीं प्रमाणें दाखविलीं आहेत, त्यांवरून तर सदरीं प्रतिपादन केलेला

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

writing, even for monumental purposes, was unknown in India before the third century B. C. "

"But writing for commercial purposes was known in India before that time. P. 206-207.

[What can India teach us ? By Maxmuller.]

1 "These inscriptions are written in two alphabets — one written from right to left, and clearly derived from an Aramaean, that is a Semitic alphabet ; the other written from left to right, and clearly an adaptation, and an artificial or systamatic adaptation, of a Semitic alphabet to the requirements of an Indian language. That second alphabet became the source of all Indian alphabets, and of many alphabets carried chiefly by Buddhist teachers far beyond the limits of India, though it is possible that the earliest Tamil alphabet may have been directly derived from the same Semitic source which supplied both the dextrorsum and the sinistrorsum alphabets of India."

(India. What can it teach us ? P. 206.)

मोक्षमुलरांचा सिद्धांत सप्रमाणही ठरत नाहीं.[१] कारण, जर हिंदूंनीं ह्या लेखनकलेंत अन्यदेशीयांचें अनुकरण केलें असतें तर, त्यांनीं ह्या घेतलेल्या ऋणाची अक्षरव्यंजकता तशीच कायम ठेविली असती. परंतु तसा कांहींच प्रकार नसून, हिंदूंची लिपिपद्धति, व अक्षरद्योतकता, हीं अगदींच भिन्न आहेत. आणि ह्मणूनच, हिंदूंची लेखनकला देखील त्यांच्याच कल्पकतेचा एक स्वतंत्र विषय होता, असें म्हणण्यास बिलकुल हरकत नाहीं. व आधुनिक विद्वान आणि शोधक गृहस्थांचें देखील तसेंच मत आहे.

जनरल कॅनिंगहम्[२] यांनीं या विषयावर अगदीं स्वतंत्रपणें, व मुद्दाम शोधकबुद्धीनें, आणि विषेश प्रकारचा

---

१ गोल्डस्टकरनें पाणिनीवर लिहिलेला अत्युत्तमलेख पहा. त्यानें मोक्षमुलरचा विसंवादी लेख उघडकीस आणिला. व त्यामुळें, इसवी सनापूर्वी तिसऱ्या शतकाच्या अगोदर, हिंदूंस लेखनकला माहीत नव्हती, असें जें मोक्षमुलरनें प्रतिपादन केलें, तें सर्व त्यानें परत घेतलें. ते पुनश्च असें लिहितात कीं:—

"Pànini was acquainted with the art of writing."

2 "General Cunningham maintains, with Mr. Thomas, the Indian origin of the Indo-Páli character."

(History of the civilization of Ancient India. By Romesh Chunder Dutt. P. 477.)

व्यासंग केला आहे. ह्यांचा अभिप्राय देखील अशाच मासल्याचा असून, यांच्या मतांशीं मिस्तर टॅामस् यांचें

---

1 "A similar process would appear to have taken place in India, as I will presently attempt to show by a separate examination of the alphabetical letters of Asoka's age with the pictures ot various objects from which I believe them to have been directly descended." * * *

"My own conclusion is that the Indian alphabet is of purely Indian origin, just as much as the Egyptian hieroglyphics were the purely local invention of the people of Egypt." * * *

"I admit that several of the letters have almost exactly the same *forms* as those which are found amongst the Egyptian heiroglyphics for the same things, but their *values* are quite different, as they form different syllables in the two languages. Thus a pair of legs, separated as in walking, was the Egyptian symbol for walking or motion, and the same form, like the two sides of a pair of compasses, is the Indian letter *g*, which as *ga* is the commonest of all the Sanscrit roots for walking or motion of any kind. But the value of the Egyptian Symbol is *s*; and I contend that if the symbol had been borrowed by the Indians, it would have retained its original value. This indeed, is the very thing that happened with the Accadian Cuneiform symbols when they were adopted by the Assyrians." * * *

"But as the Indian symbols have totally dif-

( पुढें चालू )

मत मिळतें आहे; आणि हे असें प्रतिपादन करितात कीं, भरतखंडांतील पालिलिपि स्वयंभू, व अतएव आर्यनिर्मितच आहे.

जनरल कनिंगह्म्‌ची अशी कल्पना आहे कीं, पालिलिपींतील कित्येक अक्षरें वस्तुद्योतक, अथवा क्रियाद्योतक, आहेत. उदाहरणार्थ, "ख" ची आकृति कुदळीसारखी अ-

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू )

ferent values from those of Egypt, it seems almost certain that the Indians must have worked out their system quite independently, although, they followed the same process. They did not, therefore, borrow their alphabet from the Egyptians." * * *

"Now, if the Indians did not borrow their alphabet from the Egyptians, it must have been the local invention of the people themselves, for the simple reason that there was no other people from whom they could have obtained it. Their nearest neighbours were the peoples of Ariana and Persia, of whom the former used a Semitic character of Phænician origin, reading from right to left, and the latter, a cuneiform character formed of separate detached strokes, which has nothing whatever in common with the compact forms of the Indian alphabet."

(General Cunningham's Corpus Inscriptionum Indicarum. vol. I. 1877. P. P. 52-53. 60-61.)

सून, त्या अक्षरापासून खननक्रिया प्रदर्शित केली असावी. तसेंच, **य** ( यवाकृति ), **द** ( दंताकृति ), **ध** ( धनुषाकृति ), **प** ( पाणि ह्मणजे हस्ताकृति ), **म** (मुखाकृति ), **व** ( वीणाकृति ), **र** ( रज्ज्वाकृति ), **ह** ( हस्ताकृति ), **स** ( श्रवणाकृति ), इत्यादि अक्षरें, ते ते वर्णध्वनित किंवा व्यक्त करण्याच्या हेतूनें, शनैः शनैः योजण्याचा प्रचार पडला असावा.

मोक्षमुलरच्या मताचें निरसन.

**शिकंदरानें हिंदुस्थानावर** इ० स० पू० ३२७ सालीं स्वारी केली होती; व त्यावेळीं त्याच्याबरोबर **नियार्कस** नामक नौकाधिपतीही होता. हा इहवृत्त लिहितांना असें वर्णन करितो कीं, "हिंदु लोक कार्पासपटावर पत्रव्यवहार करितात." त्यावरून त्याकालीं, व त्याच्या अगोदरही अनेक शतकें, ही लेखनकला **भरतखंडांत** खचित जागृत होती, असें मानण्यास कांहींच हरकत नाहीं.

शिवाय, दिवसानुदिवस सतत चालत असलेल्या शोधावरून, भूमिनिक्षिप्त असलेले जे जे शिलालेख किंवा ताम्रपत्रें सांप्रतकाळीं उदग्यास येत आहेत, त्यावरून **पाश्चात्यपंडितांची** देखील अशी खात्री होत चालली आहे कीं, **शिकंदराची हिंदुस्थानावर** स्वारी होण्यापूर्वी देखील **अनेक शतकें, ही आर्यलेखनकला** या देशांत चांगल्याप्रकारें **प्रचारांत होती.**

"Dr Bühler has succeeded in deciphering the inscriptions on the relic caskets which Mr. Rea, Archæological Surveyor to the Madras Government, had recently the good fortune to discover, in an old tope, already searched in the Kistna district. Mr. Rea had noticed that the caskets found by the explorers who preceded him were at the side rather than at the centre of the mound, and a judicious further exploration led to the discovery of these additional caskets. The inscriptions on the caskets are, according to Dr. Bühler, not later than 200 B. C., and may be a little older. They reveal a system of writing which is in some respects radically different from the writing on the rock of Asoka's edicts at Junagar and elsewhere, and prove, therefore, that these cannot be, as they have been supposed to be, the earliest attempts of the Hindoos to write. Dr. Bühler believes that the art of writing had been practised in India for centuries "before the accession of Chandragupta to the throne of Patali putra," or, in other words, before the time of Alexander the Great. There is something strangely pathetic in the records, that thus, thanks to Mr. Rea and Dr. Bühler, leap in these latter days to light. We quote one which declares that "Kura, Kura's father, and Kura's mother have joined to defray the cost of this casket and box of crystal in order to hold some

relics of Buddha." The casket and the box of crystal have kept their charge till now; and there is little reason to doubt that the dust and fragment of bone they have now given up are the dust and the bone of the great Teacher."

(Times of India. 15-6-92.)



# शुद्धिपत्रक

—:o:—

| पृष्ठ. | पंक्ति. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ३ | २३ | मार्कंडयेय. | मार्कंड्येय. |
| ६ | १३ | मोटं. . | मोटे. |
| १० | १९ | विद्वांसो विद्वांसो. | विद्वांसो. |
| १२ | १२ | आज भितिस. | आज मितीस |
| १३ | १ | युवास्थेपर्यंत. | युवावस्थेपर्यंत |
| १४ | ४ | ८९।९० | ८८।८९।९० |
| १५ | १ | Howfor | How far |
| ,, | ८ | Brahamans. | Brahmans. |
| ,, | २४ | वरीष्ट. | वरील. |
| १७ | १७ | यांस राक्षस, | यांस, राक्षस |
| १८ | १८ | स्मुति | स्मृति |
| ,, | २० | वेदाध्यायन | वेदाध्ययन |
| ,, | २१ | भतयज्ञ. | भूतयज्ञ. |
| १९ | ८ | अश्रमांत | आश्रमांत |
| ,, | १० | त्याचा | त्यांचा |
| ,, | ११ | त्याची | त्यांची |
| २० | २ | वर्ज | वर्ज्य |
| ,, | १० | पाहिजेत | पाहिजेत. |
| २१ | ६ | पुत्रोत्पादन | पुत्रोत्पादन, |
| २४ | ४ | अत्मसंयमन | आत्मसंयमन |
| ३० | ९ | मात्रला | मात्राला |
| ३३ | ३ | starting | starting |

| पृष्ट. | पंक्ति. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ४१ | १४ | सामुग्री | सामग्री |
| ,, | १८ | सामुग्री | सामग्री |
| ,, | २१ | सामुग्री | सामग्री |
| ४२ | ५ | षड्ध्यायी | षडध्यायीं |
| ,, | १९ | बुद्धिहंकारो | बुद्धिरहंकारो |
| ४३ | १५ | अप | आप |
| ४५ | २१ | चतुष्टय | चतुष्टय |
| ५५ | १४ | मिथ्या, ब्रह्म, | मिथ्याब्रह्म, |
| ५६ | १० | यावत् | जावत् |
| ६० | १२ | त्रिण्डं | त्रिदण्डं |
| ,, | १३ | पारुषहानानां | पौरुषहीनानां |
| ६१ | १५ | धर्माचें | धर्माचे |
| ६४ | १३ | Subtile | Subtle |
| ६७ | ४ | lunor | lunar |
| ८५ | २२ | आता | आतां |
| ८९ | १६ | यूराप | यूरोप |
| ९९ | २८ | पेुढ | पुढें |
| १०४ | २ | सांगितलें | सांगितले |
| १०७ | २० | औषधांचें | औषधांचे |
| १०९ | १ | ३२ वा | २३ वा. |
| ११३ | ४ | होते | होतें |
| ११४ | ७ | उत्तरस्थान | उत्तरस्थान. |
| ११६ | १७ | याचे | याचें |
| १२९ | ८ | वाहत, जाऊन | वाहजजाऊन, |
| ,, | १९ | त्यानें | त्यांनीं |
| १३० | ९ | कालिल | कलिल |
| १४६ | १४ | माठ्या | मोठ्या |

| पृष्ट. | पंक्ति. | अशुद्ध. | शुद्ध. |
| --- | --- | --- | --- |
| १५२ | ४ | स्वरांतर | ४ स्वरांतर |
| १५५ | २१ | नत्तं | नृत्तं |
| १५८ | १३ | वहवः | बहवः |
| ,, | १६ | पति | पतिः |
| १६२ | १० | चित्रशास्त्र. | चित्रकला. |
| १६३ | ५ | दुष्यत | दुष्यंत |
| ,, | ८ | दुंष्यन्त | दुष्यन्त |
| १६५ | ९ | प्रतिद्ध | प्रसिद्ध |
| १६८ | २२ | तें | ते |
| १६९ | २१ | फिरस्त्याचें | फिरस्त्याचे |
| १७१ | २३ | leries | series |
| १७५ | १० | अंगांत | अंगास |
| १८० | १९ | होतो | होतो. |
| १८६ | १ | लागलीं, | लागलीं. |
| १९० | २१ | रोमन, यांचा | यांचा |
| ,, | २२ | 1 | २ |
| १९१ | ११ | घमटा | घुमटा |
| ,, | १२ | स्तपांचें | स्तूपांचें |
| ,, | १३ | निमाण | निर्माण |
| १९२ | २३ | sacificial | sacrificial |
| १९६ | २१ | I | In |
| २०६ | ३ | रोप्य | रौप्य |
| २१६ | ६ | आभिरुचीस | अभिरुचीस |
| २३० | ९ | ज्ञानाची जास्त | ज्ञानाची त्यांत जास्त. |
| ,, | १८ | त्यांच्य | त्यांच्या |
| ,, | १९ | उत्पन्ना | उत्पन्न |